अखिल भारतीय हिंदु महासभा, अधिवेशन १७ वें

# हिंदु समाज-दर्शन

संपादक

लक्ष्मण बळवंत भोपटकर,

एम्. ए., एल्एल्. बी.

शके १८५७ ] किंमत १ रुपया [ इ. स. १९३५

# प्रास्ताविक

प्रस्तुतचें पुस्तक म्हणजे कांहीं स्वतंत्र ग्रंथरचना नव्हे. हिंदु महासभेच्या प्रचारकानीं आपल्या कामांत उपयोगी पडण्यासारखा विश्वसनीय असा कांहीं मजकूर हाताशीं ठेवणें हें प्रचारकाला आवश्यक असतें. केवळ भावनात्मक बोलल्यानें भागत नाहीं. एक तर तसलें बोलणें फार वेळ बोलतां येत नाहीं, कारण कीं, भावना तरी पुन्हा पुन्हा उद्दीपित करावीच लागते; आणि ती उद्दीपित करण्याला पुरेसें इंधन जवळ नसलें तर वक्त्याचा आवेश एकदम ढिला पडतो. श्रोतेही कांहीं वेडे नसतात. भावनेचें बोलणें ते कांहीं काळपर्यंत ऐकून घेतात पण वक्त्याचा सगळा भर भावनेवरच आहे असें जर का त्यांस दिसून आलें तर वक्त्याच्या विचारदारिद्र्याची त्यांस कींव येऊं लागते. हा मनुष्य अभ्यस्त नाहीं असें ते आपआपसांत बोलूं लागतात व हळु हळू श्रोतृसमुदाय अस्वस्थ बनूं लागून शेवटीं सभेचा बेरंग होऊं लागतो. म्हणून भावनेनें अंकित होऊन बोलणारांना सुद्धां स्वतःची व श्रोत्यांची भावना प्रज्वलित करण्यास साक्षात् ज्ञानसंग्रह हातीं असावयासच लागतो. पण प्रचारकांना दिसून आलें असेल कीं या भावनावश भाषणांनीं श्रोत्यांना जरी कांहीं वेळ हस्तगत करतां आलें तरी त्यांच्या मनावर कायमची मिठी बसावयास त्यांची बुद्धिच कबजांत घ्यावी लागते. एकदां त्यांची बुद्धि कबजांत आली म्हणजे आपण व ते एकरूप झालों असें मानावयास हरकत नसते. दुसरें असें कीं, श्रोत्यांच्या बुद्धीला आवाहन करणारे माहितीचे तपशील त्यांच्यापुढें सांगावयास हवे हा मुद्दाही प्रचारकाला पटला असला तरी आपल्या विषयाचीं सर्व तऱ्हेचीं ज्ञानें स्वतांच निवडून काढून एकत्रित करणें निदान प्रत्येक प्रचारकाला कधींही शक्य नसतें. त्याला अनुभवानें ज्ञान मिळवितां येईल हें खरें पण तें बहुश्रुतपणाच्या अभावी तोटकें पडतें. म्हणून त्याच्या हातीं प्रतिपादनांत उपयोगी पडण्यासारखा भरगच्च मजकूर असावयास हवा. शिवाय वक्ता गांवांत आला आणि गांवकऱ्यांच्या मनावर कांहीं एक संस्कार करून निघून गेला तरी त्याचा त्यांना कायमचा उपयोग होत नाहीं. विषयासंबंधानें कांहीं एक प्रकारचें कुतूहल त्यानें

उत्पन्न केलें येवढाच अर्थ शेवटीं शिल्लक राहातो व जर लोकांना तो विषय अधिक अभ्यासावयाचा असला तर त्यांच्या हातीं कांहींच सामग्री शिल्लक राहात नाहीं. वक्त्यानें दिलेलें चुटपुटतें ज्ञान, वक्ता निघून गेल्यानंतर जीं वादविवादाचीं रणें सुरू होतात, त्यांच्या निभावणीला अपुरें पडतें; म्हणून जो ज्ञानसंग्रह वक्त्यापाशीं असावयास हवा तोच, कुतुहल जागृत झालेल्या श्रोत्यापाशींही असावयास पाहिजे. यासाठींच प्रस्तुतचें पुस्तक तयार केलें आहे.

वास्तविक पाहतां प्रस्तुतचें पुस्तक पुढें दिलेल्यापेक्षां जास्त सविस्तर व जास्त विविध माहितीनें भरलेलें असावयास हवें होतें. परंतु पुस्तक तयार करण्याची कल्पना फार उशीरा निघाली. त्यामुळे या विषयाला जीं अनेक अंगें आहेत त्या सर्वांच्या विषयींचें यथास्थित वाचन करून योग्य त्या त्या सर्व मजकुराचा संग्रह करणे अवघड झाले. शिवाय तेंही जरी करतां आलें असतें तरी महाराष्ट्रांतील मध्यम स्थितींतील लोकांची पुस्तकें विकत घेण्याची ऐपत फार थोडी आहे हें वारंवार सिद्ध होत आलेले आहे. म्हणून थोडक्यांत करतां येईल तें येथें केलें आहे.

हिंदु समाजावर मुसलमानांचें व ख्रिस्त्यांचें कसे जोराचें आक्रमण होत आलें आहे व आजही त्याचा ऱ्हास कसा होत आहे हें दाखविण्यास उपयोगी पडणारीं शेंकडों स्फुटें पुढील मजकुरांत दिलेलीं आहेत. उत्तरेकडे मुसलमानांची व दक्षिणेकडे ख्रिस्त्यांची पीडा हिंदु समाजाला हाडयात्रणासारखी जिकीर करीत आहे. कांहीं अंशीं आपल्या भोळसटपणामुळें, कांहीं अंशीं आपल्या स्वाभिमानशून्यतेमुळें व कांहीं अंशीं परकी सत्तेचा जोर आपल्याला बाधक ठरत असल्यामुळें ही सर्व पीडा होत आहे. याचें प्रत्यंतर पुढील मजकूर वाचला असतांना सहज मिळू शकेल. एकही सहामाही अशीं जात नाहीं कीं हिंदु समाजाला कोठें ना कोठें जोराचा धक्का बसला नाहीं आणि मुसलमानांना शेफारून ठेवणाऱ्या सरकारच्या उदासीनतेमुळें झालेला अपमान निमूटपणे गिळून बसावयास लागलें नाहीं. ही सर्व हकीगत जिज्ञासूला येथें वाचावयास मिळेल. आपण वर्तमानपत्रें वाचतों व वाचतांना ज्यामुळें हृद्रोग उत्पन्न व्हावा अशीं शेंकडों स्फुटें वाटेनें आढळतात. पण नित्य नवीं प्रकरणें उत्पन्न होत असल्यामुळें पहिलीं सर्व विसरून जातात. या विसरलेल्यांची स्मृति जागृत ठेवणें जरूर असतें. कारण त्याशिवाय एकाद्या गोष्टीचा साकल्येंकरून व प्रतिपक्षाच्या वर्तनांत जें एक

योजनापुर:सर उत्पन्न केलेलें सूत्र असतें तें ध्यानांत भरत नाहीं. वर्तमानपत्रांत भेटणारा एखादा परिच्छेद त्याच्या फुटकळपणामुळें विसरून जातो. पण वास्तविक पाहातां प्रतिपक्षाच्या आंखीव धोरणाचा तो निश्चित निदर्शक आहे हें आपल्या मनांत बिंबावयास हवें असतें. ही प्रतिपक्षाची योजना व तिची प्रत्यहीं दिसून येणारी स्फुट प्रत्यंतरें वाचकांच्या मनांत चांगलीं भरण्यासाठीं अनेक स्फुटें एकत्र केलीं आहेत. हें जसें वर्तमानकालीन गोष्टींविषयीं तसेंच भूतकालीन गोष्टींविषयींही केलें आहे. हीं दोन्ही प्रकरणें वाचल्यावर ध्यानांत येऊन चुकेल कीं हिंदु समाजाची उपेक्षा अशीच होत राहिली तर कालांतरानें हिंदुसमाज नष्ट होऊन जाईल. उत्तरोत्तर राजसत्ता म्हणजे लोकसत्ताच होत चालली आहे आणि जे लोक संख्येनें इतरांहून जास्त आहेत ते इतरांना हातीं आलेल्या सत्तेच्या जोरावर गिळल्याशिवाय कधीही राहाणार नाहींत. उत्तरेकडून मुसलमान व दक्षिणेकडून ख्रिस्ती हे दोघे हिंदुसमाजाचा ग्रास करीत चालले आहेत म्हणून हिंदु समाजानें आपला सोशिकपणा टाकून दिला पाहिजे. अभिमानवृत्ती बाळगून आपला ग्रास करणारांच्या प्रतिकारास उभें राहिलें पाहिजे. बायकापोरें खोटीं आहेत, आणि जिणें नश्वर आहे, ह्या रडक्या वेदांताने हिंदु समाजाचें घरच्या घर खाल्लें आहे. म्हणून तसला वेदांत टाकून देऊन श्रीकृष्णानें प्रतिपादिलेला महान् तेजस्वी आणि इहलोकींचें जिणें सुखाचें करणारा वेदांत आपण पतकरला पाहिजे. ख्रिस्ती किंवा मुसलमान प्रतिपादक, त्यांच्या धर्माची चांगली बाजू तेवढी आपल्या इकडील अडाणी लोकांच्या पुढें जोरानें मांडतात. पण प्रस्तुत पुस्तकाच्या वाचनानें दिसून येईल कीं भोळ्या समजुती व अडाणी चालीरीती ह्या आमच्याप्रमाणें इतरांतही आहेतच. आजवर हिंदुधर्माचीं वैगुण्यें कोणतीं हें सांगण्याचा धडाकाच सुधारकांनी चालू ठेविलेला आहे. आपलें बरें व्हावें यासाठीं जरी हा प्रकार केला असला तरी इतर धर्माच्या प्रतिपादकांची पोळी त्याने आयतीच पिकत आहे आणि हिंदु समाजाच्या तत्त्वज्ञानराशींत, इतिहासांत आणि समजुतींत उत्तेजक, तेजस्वी आणि चेतना उत्पन्न करणारें असे कांहीं नाहींच असा भ्रम सामान्य लोकांत उत्पन्न होत आहे; म्हणून हिंदु समाजाची चागली बाजू प्रस्तुत पुस्तकांत दिलेली आहे. प्रतिपादकांना तिचा फार उपयोग होईल. वर म्हटल्याप्रमाणें याही दृष्टीनें वेदकालापासून तों तहत आतांपर्यंत प्रत्येक कालमानांत उत्पन्न झालेलें जें जें कांहीं उत्साहवर्धक वाङ्मय असेल किंवा जे प्रसंग घडून आले असतील तें वाङ्मय व त्या

प्रसंगांचीं वर्णनें हीं सर्व एकत्र करून आपण आपल्या मुलामुलींच्या हातीं द्यावयास हवींत. हा येवढा विस्तृत प्रयत्न केव्हां व्हावयाचा असेल तेव्हां होईल. दरम्यान या विचाराची दिशा प्रतिपादकाच्या व वाचकाच्या मनांत बिंबविण्याइतका मजकूर प्रस्तुत ठिकाणीं एकत्र केला आहे. अनुक्रमणिकेंतील विषयवारी जिज्ञासूंनीं बारकाईनें पाहावी, म्हणजे वरील लिहिण्याचें मर्म त्यांच्या ध्यानीं येईल. प्रत्येक प्रकरणाच्या आरंभीं थोडा थोडा प्रस्तावनारूप मजकूर जोडलेला आहे तो त्या त्या प्रकरणाची उपयुक्तता स्वतंत्रपणें पटवून देईल असें वाटतें. त्या सर्व प्रस्तावनांचा उल्लेख या प्रकरणांत केला असतां तीं प्रकरणें व त्यांना अनुलक्षून लिहिलेला प्रास्ताविक मजकूर हीं एकमेकांपासून फार दूर पडलीं असतीं व त्या मजकुराची उपयुक्तता नष्ट झाली असती, म्हणून तो मजकूर योग्य त्या त्या स्थळींच दिलेला आहे.

पुणें,
२५-१२-३५

ल. ब. भोपटकर

---

# हिंदु समाज-दर्शन

## अनुक्रमणिका

# हिंदु-समाज-दर्शन

## हिंदुस्थानांत आल्यापासून
## मुसलमानांचे हिंदुधर्मीयांवरील अघात

### स्वाऱ्या, कत्तली व लूट

मुसलमान लोकांचा पाय हिंदुस्थान देशांत पडल्यापासून हिंदू लोकांच्या कत्तलीस धार्मिक मुद्यावर सुरवात झाली. एकानें दुसऱ्याचा युद्धांत पराभव केला व शत्रूचें बळ पुरें मोडावें म्हणून त्यानें त्यांच्या फौजेची कत्तल केली तर तिला निराळा अर्थ आहे. पण मुसलमान लोकांनी केलेल्या कत्तली या सर्व धार्मिक मुद्यावर झालेल्या आहेत. हिंदू लोक हे मूर्तिपूजक आहेत आणि मूर्तिपूजकांचा संहार करणे हें आपलें ब्रीद आहे असें महंमदानें सांगितलें आहे असें मुसलमान लोक मानीत आले आहेत. जितके मूर्तिपूजक मारावे तितकी दुनिया पवित्र होत जाते व मारणाऱ्याच्या आत्म्याला सद्गति मिळते अशा प्रकारचा इतर धर्मीयांची हत्या करण्याला प्रोत्साहक संदेश त्यांना धर्मपुस्तकांतूनच मिळाला असल्यामुळें हें सर्व हत्याकांड मुसलमान नेत्यांनीं चालू ठेविलें आहे. पराजित लोकांच्या स्त्रिया ही जेते मुसलमान मालमत्ता मानतात. म्हणून, त्यांना त्यांच्या जनानखान्यांत दाखल करण्यांत येई व जे पुरुष असतील ते काफर म्हणून त्यांची हत्या करण्यांत येई. अशा या कत्तलींनीं मुसलमानी इतिहासाचीं पानेंच्या पानें भरून गेलेली आहेत. वरील उपपत्ति ज्या लोकांना माहीत नाही त्यांना असें वाटतें की, मुसलमान लोकांनीं इतक्या कत्तली कां केल्या असाव्या ? याचे उत्तर असें आहे कीं, मुसलमानी धर्मतत्त्वाप्रमाणें मुख्यत: मूर्तिपूजक हे काफर आहेत व त्यांना मारल्यामुळें मारणारांना सद्गति मिळते. समोरासमोर उभे राहिलेल्या शत्रूची कत्तल झाली तर त्यांत इतकेंसें वाईट वाटण्यासारखें कांहीं नसतें. कारण पराभूत झालेला माणूस तरी मर्द म्हणूनच रणावर आलेला असतो पण जे कोणी सैनिक नव्हेत अशांच्या कत्तली केवळ धर्माच्या मुद्यावर करणें हें मोठेंच पाप आहे; हें तत्त्व मुसलमान लोक ज्या दिवशीं शिकतील त्या दिवशीं त्यांचीं धर्मतत्त्वें खरीं उजळ झाली असें मानावें लागेल. धर्माच्या नांवाखालीं मुसलमानांनीं केलेल्या परधर्मीयांच्या कत्तलीचें स्वरूप पुढील ऐतिहासिक प्रमाणांवरून सहज समजून येईल.

## महमद् कासीमची सिंध प्रांतावर स्वारी

वलीद खलीफा बगदाद येथे अरब खिलाफतीवर असता त्याची हद्द सिंध प्रातास पोचून हिदूशी त्याच्या कलागती चालू झाल्या त्यावेळी सिंधच्या उत्तर भागावर दाहर नामक रजपूत राज्य करीत असून रोहरीच्या अग्नेयीस पाच मैलावर अरोण गाव (त्यावेळचे नाव अलोर) तेच त्याची राजधानी होते ठठ्ठाचे वायव्येस २० मैलावर देवल नावाचे बदर सिधूच्या काठी होते तेथे रजपूत लोकानी एक हजार मुसलमान पकडून ठेविले होते, ते दाहर राजाकडून मुसलमान अधिकाऱ्यानी परत मागितले देवल बदर दाहरचे ताब्यात नसल्याने त्यास मागणी कबूल करता येईना तेव्हा बसरा प्रातातून अरबी फौज खुष्कीच्या मार्गाने चालून आली तिचा मुख्य महमद कासीम होता ७१२ च्या उन्हाळ्यात त्याने देवल येथील देवालयावर हल्ला करून ते ताब्यात घेतले देवालयात पुष्कळ ब्राह्मण होते त्यानी सुता करून मुसलमान व्हावे असे महमदाने बोलणे लाविले ब्राह्मणानी ते नाकबूल केल्यावर सतरा वर्षावरील सर्व ब्राह्मणाची महमदाने कत्तल करून इतरास गुलाम करून स्वदेशी पाठविले कत्तलीनतर पुढे दाहरची व महमदाची लढाई झाली —मु रियासत भाग १ पृ ५९–६०

* * *

**तयमूरलंग** —स्वारी करण्याचा हेतु आत्मचरित्रातील पुढील उताऱ्यावरून दिसून येतो —

" हिदुस्थानच्या काफर लोकावर स्वारी करून त्यांस इस्लामी धर्मांत आणावे, त्याची मदिरे व मूर्ती नाहीशा कराव्या, आणि गाजी हे सन्मान्य पद मिळवावे, अशी माझी फार इच्छा आहे" १३९८ च्या मार्च महिन्यात तयमूर समर्कंद सोडून निघाला. अटकजवळ सिधुनदी ओलाडून चिनाब व रावी याच्या सगमावरील तुलब शहरांत शिरून सर्व लोकास त्याने कापून काढिले तेथून शहानवाज शहरी जाऊन पाहिजे तेवढे सैन्य आपणांस घेतलें. पुढे आपल्या नातवास मिळून ते दोघे भाटनीर (हनुमानगड) येथे आले. तेथे असख्य निरपराधी लोकाचे प्राण घेऊन सरस्वती, फत्तेबाद, राजापूर अशा अनेक ठिकाणी असेच घोर अनर्थ करून, १३९८च्या डिसेबरात ही टोळधाड दिल्लीकडे येऊ लागली या वेळी सर्व लोक भयभीत होऊन जगलात पळून गेले पानपतावर मोगलास कोणी अडविले नाही तेव्हा ते तसेच थेट दिल्लीवर आले त्यावेळी महमूदशहा हा नामधारी सुलतान दिल्लीस राज्य करीत होता थोडया लोकानिशी तयमूर दिल्लीची तटबदी पहावयास गेला असता महमूद शहाचा वजीर इकबाद शहा याने त्याजवर हल्ला केला तयमूरचे ताब्यात या वेळी लाखो लोक गुलाम करून आणिलेले होते दिल्लीचे बादशहाने तयमुरास अडचणीत गाठले असे पाहून त्यानी आनद प्रदर्शित केला ही गोष्ट तयमुरास कळताच त्याने एकदम हुकूम सोडून पधरावर्षांवरच्या सर्व लोकांची एकजात कत्तल करविली त्यात मुख्यत हिदु जातीचे लोक होते. पुढे फिरोजाबादचे मैदानात तैमूरने तळ दिला व गुडघे टेकून प्रार्थना केल्यावर अल्लाने आपली विनति मान्य केलीसे दाखवून तो उठला आणि रणवाद्ये वाजवून त्याने लढाईस सुरवात केली काही वेळ निकराचे युद्ध होऊन तयमूरच्या फौजेस जय मिळाला महमूद तुघ्लखाचा पराभव होऊन तो रातोरात गुजराथकडे पळून गेला तेव्हा झगडा सोडन देऊन सर्व लोक तयमूरास शरण आले तयमरने दिल्लीचे बादशाहीपद धारण करून स्वत चे नावाने खुद्बा वाचविला व दिल्ली शहरातून मोठी खडणी वसूल करण्याचा हुकूम केला. त्यावरून त्याचे काही लोक शहरात शिरून लुटालूट करू लागले ही लूट पाच दिवस चालली होती तयमुरास तिची वार्ता कळली नव्हती. शहराबाहेर राहून तो विजयोत्सव करीत होता. इकडे शहरवासीयास लुटीचा उपद्रव सहन न होऊन ते बायकामुलास ठार मारून घरादारास बत्ती लावून शस्त्रास्त्रानिशी परकीयाबरोबर लढण्यास तयार झाले तेव्हां तर तयमूरच्या लोकानी एकसारखा शहरात रक्तपात चालविला. रस्त्या-

तून जाण्यास मार्ग नाही इतक्या प्रेतांच्या राशी शहरभर पसरल्या. हिरे, माणके, मोत्ये, सोने, चांदी वगैरे लूट किती जमा झाली ह्याची तर गणतीच नाही. तयमूर ह्यास ही हकीगत समजली तेव्हा तिजबद्दल त्यास काहीच वाटले नाही पकड, लूट व मारहाण ह्याशिवाय कोणास कांही सुचेना प्रत्येकाने निदान पचवीस गुलाम पकडून आणिले सर्व दिल्ली शहर ओस पडले पधरा दिवस दिल्लीत राहून नतर त्याने स्वदेशी गमन केले (१ जानेवारी १३९९) हिदुस्थानातील कलाकौशल्याने चकित होऊन त्याने इकडचे पकडलेले बहुतेक लोक व कुशल कारागीर स्वदेशी नेले परत जाताना रस्त्यात त्याने मिरत शहरावर फौज पाठविली तयमूरच्या फौजेची तेथील लोकानी थट्टा केलेली त्याच्या कानी येताच तो स्वत तेथे गेला दिल्लीचाच प्रकार येथेही घडून आला विस्तव व तलवार याचा प्रलय त्याने सर्व देशावर परत जातानाही चालविला पुढे तयमर हरद्वारवर गेला तेथे गोमुखातून गगा पडते ही आख्यायिका ऐकून त्याचे पित्त खवळले आणि त्याच्या समजुतीबद्दल हरद्वारच्या लोकास चागलीच अद्दल घडली लाखो लोकास त्याने यमसदनास पाठविले इस्लामच्या एकनिष्ठ सेवकानी ओझीच्या ओझी लूट पैदा केली तयमूरने मोठ्या समारभाने परमेश्वराची आभारपूर्वक प्रार्थना केली, आणि गुडघे टेकून आनदाश्रूंच्या भरात बोलला "देवा! हिदुस्थानातील माझी कामगिरी त्वा सिद्धीस नेलीस दोन गोष्टीसाठी मी येथे आलो. एक काफर लोकाशी लढून परलोकसाधन करावे आणि दुसरी सपत्ति लटून इहलोक साधावा धर्माकरिता लूट करणे हे मुसलमानांचे बाळकडू आहे." यानतर नगरकोट व जम्मू शहरे लुटून व लाहोर काबीज करण्यास सैन्य पाठवून १३९९ च्या मार्चमध्ये तयमूर हिमालयाच्या बर्फाळ खिंडीतून आला तसा हा हा म्हणता नाहीसा झाला

—मुलमानी रियासत, भाग १ १७४-१७८

* * *

## तयमूरच्या स्वारीची पद्धत

तयमूरलंग एकाद्या नवीन शहरी आला म्हणजे तेथील सर्व लोकापासून सपत्तीची दरडावून मागणी करी, नतर ती लुटून आणण्यास आपली फौज पाठवी व सर्व लोकास पकडून तो एके ठिकाणी जमा करी अशा लोकातून कारागीर व विद्वान् असे जे कोणी असतील त्यास वेगळे काढून राज्यातील एकाद्या प्रदेशात वसाहत करण्यास पाठवी इतराचा जीव घेऊन त्याच्या शिराचा एक मोठा ढीग शहराबाहेर रचण्यात येई. बगदाद शहर घेतले त्या वेळेस अशा शिराचे मनोरे १२० झाले होते केव्हा केव्हा जिवत माणसास चुन्याने आणि विटानी चिणून त्याचा तट बाधण्याचे काम तयमूरचे कुशल कारागीर करीत 'मोगल लोक येत, नासधूस करीत, जाळीत, कत्तल करीत, लुटीत व निघून जात' या एका वाक्यात तयमूरच्या सर्व स्वाऱ्याची हकीगत येते (पृ. १८०-८१)

* * *

**बाबर**—फत्तेपूर शिक्रीच्या लढाईत वीरश्रीने उन्मत्त होऊन रणागणात सापडलेल्या रजपुताची शिरे कापून मुसलमानानी त्याचे ढीग रचिले या जयाचे द्योतक असे 'गाजी' हे नाव बाबरने आपणाला घेतले आरबी भाषेत गाजी शब्दाचा अर्थ काफराचे पारिपत्य करणारा असा आहे

* * *

**औरंगजेब**—सौर मानाचे वर्ष अकबराने सुरू केले होते, ते अग्निपूजकानी शोधून काढल्यामुळे अशास्त्र आहे या सबबीवर औरगजेबाने बद करून चाद्रमान वर्षाची सुरवात केली मूर्तीपूजेच्या डामडौलाचे ढोग बद करण्याकरिता एक मुल्ला त्याने नेमिला, आणि अम्मल बजावणीकरिता त्याच्या हाताखाली घोडेस्वाराची मदत दिली १६६९ हे वर्ष हिंदूच्या छळाचा पहिला आरभ होय त्या वर्षी त्यास विशेषत अशी खबर लागली, की बनारस व इतर ठिकाणचे ब्राह्मण आपला धर्म मुसलमानांसही शिकवीत आहेत. लगेच त्याने बनारस

येथील हिंदुधर्माध्यक्षाची नेमणूक बद करून सन १६६९ च्या ता. ९ एप्रिल रोजी सर्व राज्यात असा सक्तीचा हुकूम फर्माविला की, हिंदूच्या पाठशाळा, मठ, देवालये, वगैरे सर्व जमीनदोस्त करावी काशी येथील विश्वनाथाचे मदिर सप्टेंबरात जमीनदोस्त झाले बुदेला राजा नरसिहदेव याने मथुरा येथे तेहतीस लाख रुपये खर्चून केशवाचे भव्य मदिर बाधिले होते, ते सन १६७० च्या जानेवारीत पाडून तेथील मूर्ति आग्र्यास आणिल्या आणि त्या मशिदीच्या पायऱ्याखाली पुरून टाकिल्या योगी व सन्यासी लोकास हिंदुस्थानात थारा राहिला नाही उद्धव बैराग्यास कैदेत टाकिले काठेवाडातील सोमनाथाचे मदिर पुनरपि पाडून टाकण्यात आले हिंदूचे सर्व सण व यात्रा बद करून त्यास नोकरीतून बडतर्फ करण्यात आले दिल्लीसारख्या राजधानीच्या शहरातही वर सागितलेल्या जुलुमामुळे हिंदु लोक वरचेवर दगा करू लागले एकदा एका मत्रविद्येचे ढोग करणाऱ्या बाईने दिल्लीतील लोकास चिथवून प्रत्यक्ष बादशहासही पदच्युत करण्याची वेळ आणिली होती (औरगजेबाने) कुराणातील वचने भाल्याच्या टोकास बाधून आपल्या लोकास चेव आणून बडवाल्याचा फडशा पाडिला

अशाच प्रकारचे बड औरगजेब अफगाण स्वारीतून परत येत असता घडून आले दिल्लीनजीक नार्नोळ शहराच्या आसपास सत्नामी नावाचे हिंदू गोसावी रहात असत त्याचे वर्तन सोम्य होते तरी त्याजला कोणी त्रास दिल्यास तो ते मुकाट्याने सोसून घेणारे नव्हते एकदा क्षुल्लक कारणावरून त्याचा व कोतवालाचा तटा झाला. त्यावेळी कोतवालाने सौम्योपचाराची योजना न करता लष्कर जमविले. त्यामुळे जबरदस्त रणकंदन माजले. सतनामी लोकानी फौजदाराचा पराभव करून नार्नोळ शहर हस्तगत केले (मे १६७२) त्याजवर शस्त्र लागू पडत नाही अशी मुसलमानी फौजेची समजूत झाली. तेव्हा औरगजेबाने कडेकोट तयारीनिशी त्या बैराग्यावर चाल केली आणि सर्वांची कत्तल करून टाकिली

हिंदु लोकास अत्यंत अपमानकारक गोष्ट म्हटली म्हणजे जिझिया कर द्यावा लागणे ही होय अकबराने हा पूर्वी बद केला होता ता २ एप्रिल १६७९ रोजी औरगजेबाने हा कर पुन्हा सुरू केला याबद्दल बादशहाकडे दाद मागण्याकरिता लाखो लोक दिल्लीच्या राजवाड्यासमोर व रस्तोरस्ती जमा झाले अशा स्थितीत एका शुक्रवारी बादशहा मशिदीत जात असता त्यानी त्याचा रस्ता अडविला. तेव्हा त्याच्या अगावरून हत्ती नेऊन हजारो लोकास बादशहाने ठार केले

* * *

## अबदल्लीनें बल्लमगड घेतल्यानंतर केलेल्या कत्तलीचें वर्णन

(या किल्ल्यात त्या वेळी सुरजमल जाटाचा मुलगा जव्हारसिग, समशेर बहादूर व अन्ताजी मानकर हे सरदार होते ते किल्ला पडल्यावर पळून गेल्यामुळे बचावले.)

किल्ल्यातील सर्व सामुग्री व सपत्ति गोळा करून सरदारात वाटून झाल्यावर शहाने कत्तलीचा व लूट करण्याचा हुकूम केला हा कत्तलीचा हल्ला करण्याकरिता सैन्य मध्यरात्री तळातून बाहेर पडले प्रत्येक स्वार दहा पासून वीस गुलामाना आपल्या घोड्याच्या शेपटीस बाधून ओढीत नेई सकाळी कत्तल करून सैन्य परत आले तेव्हा सर्वात पुढे स्त्रिया व इतर गुलाम असत गुलामाच्या डोक्यावर कत्तलीत मारलेल्या लोकाची डोकी बाधून गाठोडी दिली होती प्रत्येक स्वाराचा घोडा लुटीने लादलेला होता

दुपारची प्रार्थना झाल्यावर मारून आणलेल्या डोक्याची नोदणी होई प्रत्येक डोक्यामागे मारणारास पाच रुपये मिळत नतर त्या मस्तकाचे ढीग किंवा मनोरे रचण्यात येत

नतर सगीनीवर अगर कट्यारीवर मस्तके अडकवून ती प्रमुख प्रधानाचे तबूकडे नेली जात

जे जिवत गुलाम आणले असतील त्याचेकडून प्रथम दळून घेण्यात येई व इकडली मोजदाद सपल्यावर त्याचीही कत्तल करण्यांत येई

हा कत्तलीचा प्रकार अबदल्ली अकबराबादेस येईतो दररोज चाले

—(The Indian Antiquary, Ahmed Shah Abdali and the Indian Wazir Imad-ul-Mulk. 1756–57 by William Irvine pages. 55–56 )

* * *

## अहमदशहा अबदाल्ली

**तिसरी स्वारी** — अबदाल्लीने दिल्ली सर करून बादशहास व गाजीस कैद केले गाजी-उद्दीन 'दुआब प्रात लुटून आपणास भरपूर पैसा आणून देतो' असे कबूल करून सुटला अबदाल्लीने आपला सरदार जहानखान यास जाठांचा मुलख लुटण्यास पाठविले आणि स्वत: दिल्लीस राहून तेथे लूट व कत्तल करून अनर्थ उडविला. दुआबां-तून गाजीने थोडी लूट आणिली. परतु जाठानी अफगाणाची खोड मोडली तसेच आग्र्याच्या किल्लेदारानेहि अबदालीस दाद दिली नाही त्याचा सूड घेण्यासाठी अब्दालीने पुरातन धनाढ्य शहर मथुरा याजवर मोर्चा फिरविला त्या क्षेत्रावर एकाएकी छापा घालून हजारो ब्राह्मण, साधुसत, तापसी, बैरागी, बायका मुले, वगैरे जे जे पुढे आले त्याची त्याने कत्तल केली, लोकाची घरे व देवालये लुटली, स्त्रियाची अप्रतिष्ठा केली गाई मारून त्याच्या रक्ताने देवास स्नान घातले

---

# मुसलमानांचे दंगे

मागें दिलेली कत्तलींचीच उपपत्ति या दंग्यांना सुद्धां लागू आहे. गाय मारणें हेंच बकरीदच्या दिवशीं जरूर आहे असें मुळींच नाहीं. अरबस्तानांत व इतरही मुसलमान देशांत इतर पशूंचेंच बलिदान होतें. पण येथें हिंदुस्थानांत मात्र गाय मारण्याचाच मुसलमानांचा आग्रह असतो. याचें कारण तर इतकेंच आहे कीं गाईस हिंदु लोक पवित्र मानतात; व हिंदु लोक हे काफर आहेत! इंग्रज सरकारच्या अमलाखालीं पूर्वींच्या पद्धतीच्या कत्तली होणे हें आतां तितकेंसें शक्य नसल्यामुळें कांहीं तरी कुरापती काढणें आणि दंग्याला सुरवात करून काफरांची कत्तल करण्याची संधि साधणें हा एकच हेतु या दंग्याच्या बुडाशी असतो. हिंदुस्थानांतल्या या बाटग्या मुसलमानांपेक्षां खरे खानदानीचे असे मुसलमान पश्चिम आशियांत पुष्कळ आहेत. पण मशिदीपुढें वाद्यें न वाजविण्याचा आग्रह ते कधींही धरीत नाहींत. हिंदुस्थानांतील मुसलमानांनीं मात्र हा आग्रह सारखा चालू ठेविला आहे आणि तो पुरा पाडतां आला नाहीं म्हणजे तें दंग्यास प्रारंभ करितात आणि दंगा सुरू झाला म्हणजे काफरांची कत्तल करण्याची जी त्यांची वासना ती तृप्त करून घेण्याचा प्रयत्न करितात. या दंग्यांच्या हकीकती व विशेषतः त्यांत जखमी झालेल्यांच्या व मेलेल्यांच्या संख्या पाहिल्या म्हणजे वाचणाराला असें वाटतें कीं, मुसलमान लोक मोठेच शूर असावेत आणि म्हणून हिंदू लोक जास्त मरत असावे. पण हा केवळ भ्रम आहे. त्याच दंग्यांच्या हकीकतींत आपणांस पुन्हां पुन्हां असें सांपडेल कीं, हिंदू माणसें सहज इकडे तिकडे जात असतां व त्यांना आपल्या भावी खुनाची यत्किंचितही कल्पना नसतांना त्यांना भोसकण्यांत आलें आहे. असल्या ह्या बेसावध लोकांना भोकसून मारण्यांत मारणाराला काय पराक्रम वाटत असेल तो असो. वास्तविक यांत हा केवळ भेकडपणा आहे. हा भेकडपणा पतकरून हे भोकसाभोकशीचे प्रकार मुसलमानांतील गुंड कां करतात याचें उत्तर हेंच आहे कीं, काफराला ठार मारण्यानें पुण्य लागतें असें त्यांना त्यांच्या महंतानें शिकविलेलें असतें.

दंग्यांत हिंदु लोक जास्त मरण्याचीं आणखीही कारणें आहेत. हिंदु लोक हत्यारें किंवा हत्यारवजा शस्त्रें घेऊन कधींहि हिंडत नाहींत. पण मुसलमानांतील गुंड नेहमी हिंडतात हें त्यांजकडून होणाऱ्या अत्याचारावरून सहज दिसून येतें. अशा प्रकारें लपून छपून हत्यारें बाळगण्याची निदान या गुंडांची तरी पद्धति असल्यामुळें हिंदु लोक अकस्मात बळी पडतात व लोकांस उगाचच वाटतें कीं मुसलमान लोक शूर आहेत, व हिंदु लोक निर्बळ म्हणून जास्त मरतात.

मुसलमानांतील सुशिक्षित लोक असल्या दंगेखोरांच्या व खुनी इसमांच्या धिक्काराला कधींही उभे राहात नाहींत. पं. नथुरामाच्या खुनाच्या वेळीं उभ्या हिंदुस्थानांत खुनी इसमाच्या धिक्काराला अवघा एक मुसलमान पुढारी सिद्ध झाला हें जगजाहीर आहे. अर्थात् आपण करतों ही गोष्ट बरोबरच आहे व म्हणून आपला हे लोक धिक्कार करीत नाहींत असें हे गुंड मानूं लागतात व यामुळें दंग्याची इच्छा वाढत जाते.

इंग्रज सरकारचें धोरण या बाबतींत असावें तितकें मूलग्राही नाहीं हेंहि दंग्यांच्या वाढीचें व प्रसाराचें आणखी एक कारण आहे. दंगा झाल्यानंतर धरपकड करणें व चौकाचौकांत नाकेबंदी करून कांहीं लोकांना ठाणबंद करून टाकणें येवढयानें भागतें असें सरकारास वाटतें. उलट इंग्रज माणसावर हात उचलणाऱ्या लोकांना नेस्तनाबूद करण्यासाठी सरकार काय इलाज योजितें व कल्पना करतें हें सर्वांना माहीत आहे. तशाच प्रकारचे इलाज व त्याच कल्पना या दंगेखोरांवर नीट पाळत ठेवून सरकारनें उपयोजिल्या तर मग या दंगेखोरांचें काय बळ आहे हें दिसून येईल. हिंदू लोकांच्या जीविताविषयीं थोडें फार उदासीन असलेलें सरकार जर थोडें कडक झालें तर मुसलमान सहज वठणीवर येतील हें त्यांना कोणी इतरांनीं सांगावयास नको. हें जोपर्यंत होत नाहीं व केवळ तुरुतदानाचे उपाय सरकार योजितें तोंपर्यंत दंगे होणार, म्हणून हिंदु तरुणांनीं आपल्या समाजाच्या रक्षणासाठीं सदैव सज्ज असलें पाहिजे व त्या रक्षणासाठीं जरूर असलेल्या सर्व विद्या हस्तगत केल्या पाहिजेत. गेल्या दहा वर्षांत घडलेल्या दंग्यांपैकीं कांहीं अगदीं ठळक ठळक दंग्यांची त्रोटक माहिती पुढें दिली आहे त्यावरून वरील विधानाची सत्यता दिसून येईल.

### १ फेरोजाबादचा दंगा

—फेरोजाबाद हे गाव आग्र्यापासून २६ मैलावर आहे तेथे हिंदु–मुसलमानात वाद्याच्या व मिरवणुकीच्या बाबतीत तेढ आहे या बाबतीत पूर्वी तडजोड झाली होती, पण ती आपणास मान्य नसल्याचे मुसलमानानी डि मॅजिस्ट्रेटास सागितले होते

येथे राधाकृष्णाचे देऊळ व गुसावजीचे देऊळ ही दोन हिदूची प्रमुख मदिरे आहेत या देवळातील आरती ता १४ एप्रिल रोजी निर्विघ्नपणे पार पडली त्यानतर मुसलमानाची फकिरी मागण्याची मिरवणूक निघाली. १४४ कलम लाविले असताहि मिरवणूक काढण्यात आली होती. दग्याच्या भीतीने पोलीस बदोबस्त होता. मिरवणूक राधाकृष्णाच्या देवळाजवळ येताच कोणाच्या तरी घराच्या गच्चीवरून विटकराचा टोला आला एवढयावरून मुसलमानानी राधाकृष्णाचे देऊळ व त्याला लागून असलेले डॉ जीवराम याचे घर याजवर हल्ला करण्यास सुरवात केली. डॉ जीवराम याचा दवाखाना त्यांच्या घरातच असल्यामुळे कौटुबिक माणसे व रोगी मिळून १३ मनुष्ये होती मुसलमान घरावर चालून येत आहेत हे पाहून त्यानी घराची दारे घट्ट लावून घेतली. तेव्हा मुसलमान घरावर चढले. मुसलमानांनी कोणीहि हातास लागत नाही हे पाहून घराला

चोहोंकडून आग लाविली व बाहेर पडणाऱ्या माणसांवर हात टाकण्याकरितां बाहेर टपून बसले पोलिसांनी डॉक्टरांना हाक मारल्यावर त्यांची ओ न आल्यामुळें दुसरीकडील दगा शमविण्याकरितां पोलीस गेले त्या दिवशी ४–५ ठिकाणी दगे होऊन डॉ जीवराम याचे घर राधाकृष्णाचे मदिर, कासाराचे दुकान व दाणे बाजारांतील तीन दुकाने जाळली गेली सर्व जागी पोलिसानी गोळ्या घातल्या त्यात १ मुसलमान मेला दग्यात ५०।६० जखमी होऊन १ हिंदू मरण पावला डॉ जीवराम याचे घरी ११ माणसे जळून मेली दगा केल्याबद्दल ६७ मसलमान व २० हिंदूना पकडण्यांत आले

—केसरी ता २६–४–३५

* * *

## २ मालेरकोटला येथील दंगा

—ता ७ व ८ मे रोजी असमतुल्ला नावाचा मुसलमान कथेच्या जागी जाऊन 'कथा बद करा, कथा म्हणजे नुसता बकवा आहे कथा बद न केल्यास त्याबद्दल वाईट परिणाम भोगावे लागतील' अशी धमकी देऊ लागला, लाला किशोरीमल याच्या घरी ही कथा चालू होती त्यानी ती बद केली पुढे हिंदू मुसलमानाच्या तडजोडीचा प्रयत्न झाला, पण कथा चालल्यास प्राणत्याग करूनहि ती बद पाडू अशी भाषा मुसलमान गुड बोलू लागले ता. १२ रोजी उभय जातीच्या पुढाऱ्यांना बोलावून मुख्य न्यायाधीशांनी कथा अगर नमाज यावर कोणीच नियंत्रण न घालता उभय ज्ञातीनी त्याच्या धर्मभावना न दुखविल्या जातील असे वागावे असे सागितले परंतु जय बजरग या जयघोषाने दगा व जाळपोळ झाली।

—केसरी ता ४–६–३५

* * *

## ३ मोहरमचे दिवशीं झालेला गुलबर्गा येथील दंगा

गुलबर्ग्यास श्रीशरणबसवेश्वराचें पुरातन देवालय आहे. त्याची पालखी दरसालप्रमाणे गेल्याचे मागील सोमवारी निघाली असतां मुसलमानांनी ती मिरवणूक अडवून ठेविली, आणि त्यानतर दोन दिवसानी आपणच काही कुरापत काढून बुधवारी रात्री ३।४ हजार मुसलमान बसवेश्वराच्या व इतर देवाल्यांतून घुसले व त्यानी एकूण एक देवळे भ्रष्ट केली हिंदूच्या घरात शिरण्याचा, दुकाने लुटण्याचा व जाळण्याचाहि काही ठिकाणी प्रयत्न झाला हा दगा चालू झाल्यावेळी पोलिसानी गोळ्या झाडल्या व त्यायोगे दोन तीन मुसलमान मयत होऊन काही जखमी झाले या दग्यात किवा गोळीबारात हिंदूचा काहीच सबध नाही हिंदु लोक आपली घरे व दुकाने बद करून आपल्या जीविताचा व वित्ताचा कसावसा बचाव करीत आहेत, आणि मुसलमान दगेखोर मात्र रस्त्यातून धुमाकूळ घालीत असून अद्यापि त्यांना पकडले नाही व त्याचा बदोबस्तहि झालेला नाही। हैदराबादेहून आता लष्कराच्या तुकड्या तेथे गेल्या आहेत व निजाम साहेबानी एक चौकशी कमिशनही पाठविले आहे पण त्या कमिशनमधील कांही इसमावर जनतेचा विश्वास बसण्याजोगा नाही यास्तव विश्वासार्ह कमिशन नेमण्याविषयी निजामास सल्ला द्यावा अशी व्हाइसरॉय साहेबाकडे विनति करण्यात आली आहे —केसरी १०–८–२४

नतर कमिशनपुढे साक्षी पुरावे होऊन या दग्यात मारगम्मा देवालयासबधात २४ पैकीं १४ इसमांवर आरोप ठेवण्यात आले कांचनबसवा या देवालयासबधात २२ पैकी ११ जणावर आरोप ठेवण्यात आले —केसरी १६–९–२४

* * *

## ४ मुंबईंतील दंगा

ता ३ फेब्रुआरी पूर्वी आठवडाभर मुबई–नगरात, बडोदा येथे बाधकाम चालू असलेल्या पुलाकरिता पठाण लोक मुले पळवून नेत आहेत अशी सारखी, या नाही त्या भागात, लोकात कुणकुण चालली होती. लोअर परळ येथील सन

मिलच्या बाजूला एक हिंदू जात असतां काही मशयावरून सुमारे तीन हजार कामगारानी त्याला घेरून इतके मारले की तो इस्पितळात जातांच मरण पावला त्याच दिवशी दुपारी एक ग्रीक इंजिनिअर भेंडी बाजारामध्ये ट्राममध्ये बसत असता एका उचल्या पोराने त्याच्या खिशात हात घालताच त्याने त्याचा हात धरला हात धरणारा हा कोणी पोरे पळविणारा असावा असे समजून शेकडो लोक त्याच्या वरच तुटून पडले। कामाठीपुऱ्यात एका पठाणाला कामाठयानी असाच बेदम मार दिला व ठाकूरद्वारला एका गुरख्यास तो पठाण समजून मार देण्यात आला सायकाळी लालबागला पाच पठाणांवर लोक तुटून पडले

ता ४ रोजी सकाळी गिरणी भागात एका कामगार स्त्रीला पठाणानी पळविले व दोन मुलेहि नाहीशी झाली, ही बातमी उठताच करीमभाई ग्रुपच्या गिरण्यातील सुमारे ३० हजार कामगार हातात दडुके घेऊन बाहेर पडले सुमारे दोन तासात एक लक्ष कामगार पठाणावर सूड घेण्याच्या उद्देशाने बाहेर पडला. काळा चौकीजवळ कामगारानी एका पठाणाच्या झोपडीस आग लावून दिली कामगार इतके बेफाम झाले होते की पठाण दिसला की त्यास चोपीत ३ वाजता किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटलपाशी सुमारे १ हजार कामगारांनी पठाणाची वस्ती असलेल्या एका इमारतीवर दगडाचा पाऊस पाडला इमारतीतील ५० पठाणांची व त्याची जगी झटापट होऊन तीत ७ पठाण बेशुद्ध झाले. वरळी हिलच्या बाजूला २ हजार कामगारानी दोन पठाणाना जागच्या जागी ठार करून चाराना मरणप्राय घायाळ केले. आपणास कामगार मारतात हे पाहून पठाणानी भोईवाड्यातील अबू बिल्डिंगमध्ये सर्वांनी एक जुटीने राहण्याचे ठरविले

मगळवार ता ५ रोजी सकाळी ८॥ च्या बेतास एका पठाणाने एका बाईस चिरली, आळवे ह्याच्यावर हल्ला केला व यूनियनचे ऑफीस पाडले अशी अफवा उठताच करीमभाई ग्रुपमधील सुमारें साठ हजार कामगार गिरणीत जें दिसेल ते घेऊन बाहेर पडले. परतु कामगार पुढाऱ्यानी विनवून विनवून त्यास कामावर लावले याच दिवशी पाचशे पठाण पोलीस कमिशनरकडे सरक्षण मागण्यास गेले होते त्याच्या मुख्याचे व पोलीस कमिशनरचे बोलणे चालले असता एका मशिदीवरून हल्ल्याची हूल उठली त्यामुळे पठाण शेख मेमन स्ट्रीटमध्ये घुसले. पोलीस कमिशनर व इन्स्पेक्टर साबाजी यानी पठाणाचा पाठलाग करून त्या पठाणास जुम्मा मशिदीत कोंडले ह्या धादलीत पोलीस कमिशनरलाहि काठयाचे तडाखे मिळाले रात्री भेंडीबाजारातहि पठाणानी हिंदूवर भयकर हल्ले केले त्या दिवसापर्यंत १८ लोक मेले व १०० जखमी झाले

टाइम्सने महमद अल्लीची मुलाखत घेऊन ह्या परिस्थितीचे रूपातर हिंदु-मुसलमानांच्या दग्यात होईल काय ? असा प्रश्न विचारताच "अर्थात् होईल स्वसरक्षणाच्या हेतूने मी मुसलमानाना सघटित करणार आहे" असे महमद अल्ली म्हणाल्याचे जाहीर केले. ह्या मुलाखतीने हिंदू व पठाण याच्यामधील भाडणाचे रूपातर हिंदु-मुसलमानाच्या दग्यात झाले शौकतअल्ली मुसलमानाना सघटित करण्यासाठी २-३ दिवस मुसलमान मोहल्यातून हिंडत होते

बुधवारी ह्या झगड्यास हिंदुमुसलमानाच्या दग्याचे स्पष्ट स्वरूप प्राप्त झाले भेंडी बाजाराच्या कोपऱ्यावर एक हातगाडी हिंदू नेत असता मुसलमानांनी त्यास भर रस्त्यांत ठार मारले त्यामुळे हिंदु-मुसलमानांचा जमाव जमला लष्कराने गोळीबार केल्यावर लोक हटले भेंडी बाजाराच्या बाजूस गल्ल्यातून जाणे म्हणजे प्राणाला मुकणें होय अशी परिस्थिति पठाणांच्या सुरे भोसकण्याने झाली एक घायाळ झालेला हिंदु गाडीतून इस्पितळात नेला जात असतां मुसलमान गाडी जाऊ देईनात. लष्कराने गोळीबार करून बऱ्याच जणास घायाळ केले

नगराध्यक्ष डॉ देशमुख यांनी सर्व ज्ञातीच्या प्रमुख लोकांची गुरुवारी सभा भरविली असतां

कामाठीपुऱ्यावर मुसलमानांनी हल्ला केल्याचा टेलिफोन आला एक शातता कमिटी नेमण्यांत येऊन सर्वांनी दग्याचे भागात जावयाचें ठरविले

नॉर्थब्रुक्स गार्डन येथे मुसलमान पोरानी हिंदूच्या घरावर गोफणीने मारा चालविला होता पठाण स्ट्रीटमध्यें हिंदूवर दगड टाकून मुसलमान पळून गेले. गल्लीतील हिंदू तळ मजल्यावर राहतात. त्यामुळे पाठीमागून आलेल्या सोल्जराच्या गोळ्याना तेच नेमके बळी पडले डोंगरी व चिंचबंदर येथे पठाणानी हिंदूना एकएकटें गाठून मारण्याची शिकस्त केली कुंभारवाड्यात फार दंगल माजली म्हणून लष्कराने गोळीबार केला श्री नरिमन कामाठीपुऱ्याकडे गेले असता एक पठाण त्याचे अगावर आला त्याने मारलेला लाठीचा तडाखा त्याच्या दडास लागला इस्पितळे घायाळ लोकानी भरून गेली किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटलमध्ये तर बाहेरच्या रोग्याना आता घेण्यात येत नाही,

पारशी स्टॅचू, टू टॅक्स, जे जे हॉस्पिटल, भेंडीबाजार, जेकब सर्कल, चिंचपोकळी, करीरोड, पोयबावडी, डोंगरी येथे गोरे लष्कर ठेवण्यात आले आहे मोठा जमाव दिसला व मॅजिस्ट्रेटचा हुकूम मिळाला तर गोळीबार करतात.

शुक्रवारी प्रार्थनेनतर दगा वाढणार म्हणून गिरगावांतील दक्षिणी ब्राह्मण, मराठे, पाठारे प्रभू, सारस्वत व आद्यगौड ब्राह्मण, व क्षत्रिय समाज लाठीबद बनून प्रतिकारार्थ सज्ज होता दुपारी ३ वाजेपर्यंत किरकोळ सुरी भोसकीच्या प्रकारापलीकडे काही नव्हते सुमारे दोनशे दगेखोर गुडानी शातता कमिटीतील ऐट आणून 'हिंदु-मुसलमानकी जय' असे ओरडत गिरगाव व काळबादेवीवरून जाण्याचा प्रयत्न केला! तेथून जात असता त्याच्यावर दगड फेकले गेले 'हिंदु-मुसलमान की जय' ओरडणारे 'दीन दीन' म्हणून ओरडं लागले सर्व नगरात मारामारीस मध्याकाळी एकदम रंग चढला मदनपुरा, कामाठीपुरा, भेंडी बाजार इकडे मुसलमानाची गुडगिरी प्राण घेण्याचा व्यवहार करीत होती कामाठीपुऱ्यातील कामाठ्यानी मुसलमानांना असा निकराचा प्रतिकार केला की, त्याना आठवणच रहावी शुक्रवारी एका दिवसात ३६ माणसे ठार होऊन १२९ जखमी झाली

श्री हॉर्निमन व व्ही व्ही देसाई हे मदनपुऱ्यात गेले असता त्याच्या देखत एका हिंदूला त्याची मान चिरून टाकून दिले हॉर्निमन यानी त्याचे गाऱ्हाणे काय आहे असे विचारता, "डांगे, निमकर, सिलम, पुप्पाला याना आमच्याकडे धाडा त्याच्याशी आम्ही बोलू" असे त्यांनी सांगितले शनिवारी ता ९ रोजी दुपारी १२ पासून नागदेवी स्ट्रीटमध्ये दग्यास आरभ झाला बारभाय मोहल्यात एका मुसलमानाच्या घरास आग लावण्यात आली नागदेवी स्ट्रीट व बारभाय मोहोल्ला येथे मुसलमानानी ह्या दिवशी हिंदूची दुकाने दिवसभर लुटली सकाळी कामाठीपुऱ्यात सहा हिंदूना सुरे भोसकून ठार मारण्यात आले फोरस रोडवर तर व्हिक्टोरिया हाकणारे लोकच हिंदूवर तुटून पडू लागले सर्व शहरातील ट्रामगाड्या बद पडल्या असून पोस्ट देखील वाटणे धोक्याचे झाले आहे इलेक्ट्रिक कपनीचे नोकर भिऊ लागल्यामुळे लष्कराच्या रक्षणाखाली दिवाबत्तीचे काम होत आहे गेले आठ दिवस मुंबईतील व्यापार बद पडला आहे

ता ९ रोजी दुपारी डॉ देशमुख याच्या नेतृत्वाखाली शातता-मडळाच्या मध्यवर्ती कार्यकारी कमिटीने गव्हर्नरसाहेबाची भेट घेऊन त्यास काही सूचना केल्या, गव्हर्नरानी सूचना अमलात आणू असे आश्वासन दिले मुंबईच्या चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटानी १४ दिवसापुरती कर्फ्यू ऑर्डर पुकारली

शनिवारी दुपारी जे जे हॉस्पिटलच्या नाक्यावर एका मुसलमानाने एका हिंदूचा खून केला येथे लष्कर व पोलीस हजर होते त्याना काही करता आले नाही हा खून पाहून एक सोल्जर बेशुद्ध झाला खून करणारा इसमहि पकडला गेला नाही —केसरी ता. १२-२-२९

* * *

## ५ नागपुर येथील दंगा

--रविवार ता ४ रोजी शहरच्या निरनिराळ्या भागांतून हातात लाठ्या व भाले घेऊन मुसलमानांच्या दोन दोनशे तीन तीनशेच्या तुकड्या वाद्ये वाजवीत दोन वाजता नबाबपुऱ्याकडे जाताना दिसू लागल्या बऱ्याचशा हिदूना मुसलमानाच्या मिरवणुकीची आगाऊ काहीच माहिती नसल्यामुळे हिदु लोक काय चालले आहे हे पाहण्याकरिता बाहेर आले नबाबपुऱ्यात मुसलमान एकत्र जमल्यावर मिरवणुकीस सुरवात होऊन डॉ मुजे याचे घरासमोर ती चालू लागली मिरवणुकीत सामील होण्याकरिता तुकड्या येत असता व सघटित मिरवणूक चालू असता मुसलमानाच्या चेहेऱ्यावर व वागणुकीवर पुढील दग्याची स्पष्ट चिन्हे दिसत होती डॉ मुजे याचे घराजवळील बोळात मुसलमानानी किरकोळ मारामारी केली श्री काळीकर याचे घराला जाणाऱ्या गल्लीसमोर काही हिदू मिरवणूक पाहण्यास उभे आहेत असे दिसून येताच त्याजवर त्यांनी हल्ला केला तेथे दोघात थोडी देवाण-घेवाण झाली मुसलमानाचे साधावे तसे तेथे न साधल्यामुळे ते चिडले व जवळच असलेल्या श्री वाईकराच्या घराच्या बद असलेल्या दारावर लाठीचा मारा सुरू केला काही मुसलमान वाईकराच्या बोळात शिरले पण याहि ठिकाणी हिंदूनी हल्ल्यास तोड देऊन मुसलमानाची डाळ शिजू दिली नाही तेथून पुढे बाजारात आल्यावर मुसलमान जो हिंदू भेटेल त्यास मारीत सुटले रविवारी सुटी असल्याने बरीच मडळी सामान खरेदी करिता बाजारात गेली होती मुसलमानाच्या हल्ल्यातून म्हातारी माणसे बाया, लहान मुलेसुद्धा सुटली नाहीत महालाजवळ, पाताळेश्वराजवळ, सडकेच्या बाजूस उभे असलेल्या हिदूवर हल्ले करून त्याना मार दिला डॉ हरदास याचे बोळात पाध्ये या नांवाचे दुकानदार सहज उभे असता एका मुसलमानाने पाठीमागून येऊन त्याचे हातात भाला भोसकला!

मिरवणूक चिटणीस पार्कजवळ आली. तेथें काही हिदू जमलेले पाहतांच त्यांचेकडे वळून लाठ्या जमिनीवर आपटणे, 'आ जाव' अशा तऱ्हेचे आवाज देणे वगैरे चेष्टा सुरू झाल्या डी सी, डी. एस् पी, सिटी मॅजिस्ट्रेट, पोलीस सुपरिंटेडेंट वगैरे ऑफिसर ह्या लीला पाहतच होते शेवटी मिरवणूक पुढे लोटण्यात आली मुसलमानानी केलेल्या हल्ल्याची बातमी सर्व शहरभर पसरली व मोहल्या-मोहल्यांतून उभय पक्षात मारामाऱ्या सुरू झाल्या त्या दिवशीची सबध रात्र जागून काढून लोकानी कसाबसा आपला बचाव केला

सोमवारी सकाळी एका हिदूचे प्रेत नबाबपुऱ्यातून चालले असता मुसलमानानी त्याचेवर हल्ला केला हिदू त्याचा निषेध करावयास जमताच मुसलमानानी तरवारी, लाठ्या, भाले घेऊन हल्ला केला लोकाचा जमाव वाढू लागला एका मुसलमानाने घरातून गोळीबार केला त्यामुळे ९ हिदू जखमी झाले एक तरुण त्यास मेयो हॉस्पिटलमध्ये नेत असताच मरण पावला नतर लोक प्रक्षुब्ध झाले व त्यानी मुसलमानाच्या लहान सहान झोपडीवजा घराना आगी लावल्या नाल्या हैदर सबारीचे झोपडे व एक मसजीद हीहि जाळण्यात आली गोळीबार करणाऱ्या ३ मुसलमानास व आगी लावणाऱ्या ४ हिंदूस पकडण्यात आले दुपारी आदितवारीत बगाली पजाजवळ मुसलमानानी गोळीबार केला गोळीबारात ३ मेले व ९ जखमी झाले इतवारीत इस्माईल नावाच्या पेहेलवानास चोप दिला. तो दवाखान्यात मरण पावला

मीताबर्डीवर खानसाहेब अफज्ल हूसेन नावाचे पेन्शनर सबइन्स्पेक्टर रहातात त्यानी आपले घरातून हिदूवर गोळीबार केला. त्याने कोणीच जखमी झाले नाही हिदूनी त्याचेवर व त्याचे दोन मुलावर हल्ला करून त्यास चागलाच चोप दिला तिघानाहि इस्पितळात पोचविण्यात आले मगळवारी सकाळी मिलमध्ये जाणाऱ्या हिंदू मजुराना मुसलमानानी जखमी केले तेव्हा मिलला सुटी देण्यात आली. गावात मिलिटरी शिपायांचा

पहारा सुरू होता किरकोळ मारामाऱ्या सुरूच होत्या

बुधवारी महालाजवळ केळी बागेतील मंदिरांत थोडेंसे मांस पडलेले आढळले हिंदुसभेच्या मंडळीनी तेथे जाऊन ते जबाबदार अधिकाऱ्याला दाखवीपर्यंत हलवू नये असे मागितले व ते गेले. एका गणपतिभक्त रावबहादूर रावसाहेबानी ते फेकून देवविले दंग्यात एकदर २२ तरुण मरण पावले व सुमारे १५० लोक जखमी झाले

—केसरी ता १३–९–२७

* * *

## ६ कानपूर येथील दंगा

—हा दंगा उत्पन्न होण्याला नैमित्तिक कारण भगतसिंग–राजगुरू याच्या फाशीनिमित्त हरताळ पाडण्यांत झाले असे सांगण्यात येते पण वस्तुस्थिति तशी नाही. ता २३ रोजी हरताळ पाडण्याचे बाबतीत कांग्रेसचे लोक खटपट करीत होते. शहर व सिव्हिल लाइन्स यामध्ये मालरोड म्हणून एक प्रमुख रस्ता आहे. या रस्त्यावर पोस्ट, तार ऑफिस, युरोपियनाची काही दुकाने व कांही युरोपियनांची वस्ति आहे हरताळाची बजावणी करण्यात लोकांनी वाहनातून जाणारांना त्यांतून उतरवून पायी चालण्यास भाग पाडले. कोणी तसे करण्याचे नाकारले तर दगडविटा मारण्यापर्यंतहि मजल गेली. एका युरोपियन स्त्रीस अशा रीतीने जखमा झाल्या. कांग्रेसच्या लोकानी हरताळ कडकपणे पाडावा म्हणून खटपट केली; तरी वरील अत्याचार त्यांजकडून झाले नाहीत.

ता. २४ दुपारपासून दंग्याची आग सर्व शहरभर पसरू लागली. मुळगंज म्हणून शहरात प्रमुख बाजारपेठ आहे तेथे हरताळासंबधाने बाचाबाची होऊन हातघाईवर प्रसंग आला तेथील कॉंग्रेस कमिटीचे एका काळी असलेले सर्वाधिकारी श्री ग. गो जोग हे शांतता स्थापन करण्याच्या प्रयत्नांत असतां त्यास मुसलमान गुंडानी हल्ले करून जखमी केले त्यावेळी त्यांना बारा जखमा झाल्या दंगा शहरांत सर्वत्रच सुरू झाला. कोणासच घराबाहेर पडता येईना बेगमगंज ह्या मुसलमानी मोहोल्ल्यात ४ वाजता दंगा लोटला रस्त्यातून हिंदू दिसला की मार अशी स्थिति झाली ३–४ हिंदूना तर चराचरा कापून टाकल्याचेहि हिंदूनी पाहिले त्यावेळी तेथे एक पोलिस हजर होता त्याने काहीच प्रतिकार केला नाही तेथीलच एका हिंदू वाण्याच्या दुकानाला घरात बायका मुले असता त्यासुद्धा आग लावण्यात आली मोठ्या मुष्किलीने आतील माणसाचा बचाव करण्यात आला सायकाळी ६ वाजता कर्फ्यू ऑर्डर पुकारली परंतु रात्री २ च्या सुमारास ५०–६० मुसलमान एका पोलीस इन्स्पेक्टराच्या अंगावर धावून गेले असताही त्याना कर्फ्यू ऑर्डर मोडल्याच्या आरोपावरून पकडण्यात आले नाही

ता. २५ रोजी सकाळी बेगमगंजमध्ये हिंदूच्या घरावर दगडविटाचा वर्षाव सुरू झाला व लागलीच त्याना आगहि लावण्यात आली घरातील लोकाना घराबाहेर पडणे धोक्याचे झाले व घरांत रहावे तर जळून मरणार अशी स्थिति प्राप्त झाली अखेर पोलीसास फोन केल्यानतर घरातील माणसाची सुटका झाली

तोफखाना बाजार पेठेत मुसलमानानी सनातनधर्मभवन या सस्थेच्या इमारतीस आग लावली याप्रमाणे जवळच्या दुसऱ्या हिंदूच्या इमारतीना आगी लावण्याचा प्रयत्न झालेला आढळून आला शहरात डेप्युटी–पडाव या मुसलमानी भागांत तर मुसलमानानी गोरगरीबाची सर्व घरेच जाळून फस्त केली खेरीज सिसामऊ ग्वालटोल, बेगमगंज या भागातील हिंदूची जी हानी झाली ती वर्णन करणे अशक्य आहे

कर्फ्यू ऑर्डर निघाली असताहि मुसलमानानी ती पोलिसाच्या देखत मोडली तरी त्याना अटक करण्यांत आली नाही मुसलमान गुंडानी दंग्यात बंदुकीचा सरसहा उपयोग केला तरीहि पोलिसानी त्याची चौकशी केली नाही पीलखान्याजवळ एका हिंदूच्या घराला आग लावण्यांत आली.

ती विझविण्याचा प्रयत्न हिंदू करीत असता त्याच्यावर दगेखोरांनी गोळ्या घातल्या, त्यामुळे तिघे जखमी झाले. ए बी रोडवर एका हिंदु मदिरावर मुसलमानानी हल्ला चढविला व हिंदू लोक त्याचा प्रतिकारहि करीत होते परतु त्या ठिकाणी शेकडो सशस्त्र पोलीस व त्याचे अधिकारी हजर असता त्यानी तिकडे सर्वस्वी दुर्लक्ष केले शातता रक्षणाचा प्रयत्न श्री विद्यार्थी हे करीत असता त्याच्यावर हल्ला झाला व अखेरीस ते मुसलमानाच्या हल्ल्यास बळी पडले

लोकाच्या अदाजाप्रमाणे ७००–८०० माणसे ठार व १००० ते १२०० माणसे जखमी झाली असावीत यात हिदूचीच हानी अधिक झाली आहे हिदूची २५ मदिरे मोडली फोडली अगर जाळण्यात आली मशिदी १० हिदूची घरे ५०० वर जाळण्यात आली मुसलमानाची सुमारे ५० मालमत्तेचे नुकसान हिदूचे ५० लक्षापेक्षा जास्ती झाले मुसलमानाचे जास्तीत जास्त २ ते ३ लक्ष. दगेखोराच्या गोळीबाराने जखमी झालेल्या हिदूची सख्या २१० सिद्ध झाली तर मुसलमानाची ती सुमारे २५ आहे मॅक रॉबर्ट दवाखान्यातील जखमी माणसावरून पाहिले तर जखमी हिदू २४५ व मुसलमान ९६ होते कानपूर शहरात हिंदु–मुसलमान वस्ती २ १ या प्रमाणात आहे एका हिदूचे शस्त्राचे दुकान होते त्यावर पोलिसानी मोहोर केली परतु काडतुसे व इतर शस्त्रे असलेल्या मुसलमानाच्या दुकानाकडे त्याची दृष्टी वळली नाही व मुसलमान गडानी या दुकानातील साधनाचा चागलाच उपयोग करून घेतला असा दाट लोकप्रवाद आहे —केसरी ता २१–८–३१

कानपूरच्या हत्याकाडात १८१ लोक मेले व ३८६ लोक जखमी झाले असे स प्रात कायदेमडळात सरकारतर्फे जाहीर झाले आहे दग्यात ४२ हिदू व ९९ मुसलमान ठार झाले व जखमी झालेल्यात २१९ हिदू व १६७ मुसलमान आहेत

—केसरी ता ४–४–१९३१

* * *

### ७ डेरा इस्माईलखान येथील दंगा

ता १२–८–३१ रोजी भगवानदास नावाचा एक मुलगा हातात काठी घेऊन कलन बाजारातील एका गटारातील घाणीशी खेळत होता म्युनिसिपालिटीच्या एका झाडूवाल्याच्या जमादाराचे लक्ष त्याजकडे गेले त्याने त्या मुलाच्या तोडात एक चपराक मारली यावरून त्या मुलाच्या वडील भावाने असे करणे बरोवर नव्हे कारण तो लहान मुलगाच आहे असे समजावून सागितले. पण हे म्हणणे त्या जमादारास न पटल्यामुळे त्याने काफीर अशी शिवी हासडली झगीरामाने त्यास 'सुव्वर' असे सबोधले उभयतात बाचाबाची झाल्यावर बरेच मुसलमान तेथे जमा झाले त्या ठिकाणी थोड्या वेळाने दुसरी एक मुसलमानाची टोळी आली, व त्यानी दुसऱ्या मुसलमान टोळीस हिदूविरुद्ध चिथावण्यास सुरवात केली हिदूनी महमदाला शिव्या देऊन आपली निर्भर्त्सना केली असेहि त्याना सागितले इतक्यात डी सी व अ कमिशनर तेथे येऊन दाखल झाले हिदूना हे प्रकरण विकोपास जाणार असे वाटल्यावरून त्यानी कलन बाजारातील आपली दुकाने बद केली काही दुकानदार आपल्या दुकानातच राहिले ही सधि साधून लगेच मुसलमानानी हिदूच्या दुकानावर रॉकेल ओतून आगी लावण्यास प्रारभ केला पोलिसानी तर या लोकाना तसेच प्रोत्साहन दिले असे एका हिदी गृहस्थाने आपल्या साक्षीत सागितले साधुसिग नावाच्या एका पुस्तके विकणाऱ्याला दुकानातून कुराणाची पुस्तके बाहेर काढून मुसलमान गुडानी कृतघ्नपणे त्या दुकानास आग लावून दिली हे कृत्य तर एका मुसलमान पोलीस अधिकाऱ्याच्या सागण्यावरून झाले ही त्यातल्या त्यात अत्यत आश्चर्याची गोष्ट आहे, या हिन्दु गृहस्थाचे सुमारे ५० हजारावर नुकसान झाले आहे

दुकानाना मुसलमान गुडानी आगी लावल्या तरी पोलीस अगदी निर्विकार मनाने काही एक न करता उभे असलेले पाहून आपल्या दुकानाचे आपण संरक्षण करावे या हेतूने काही हिंदी

व्यापारी आग विझवण्यासाठी आले असता शातता प्रस्थापित करणाऱ्या या राजदूतानी त्यास दूर लोटले, व त्याच्यावरच दडकेहि चालवून त्याना चौकापर्यंत मागे रेटीत नेले सेवासमिती, महावीरदल, व हिदुस्थानी सेवादल या दलातील स्वयसेवक आग विझवण्यासाठी पुढे आले तेव्हा त्यानाहि या पोलिसानी मागे सारले मुसलमानाना मात्र त्याच्या कृत्यापासून त्यानी पराङमुख केले नाही त्याचे आगी लावण्याचे काम त्याच्याच नजरेखाली चालू होते सर्वभक्षक अग्नीने सर्व दुकाने यथासाग व यथावकाश भस्म केल्यावर सुमारे ३ तासानतर आग विझविण्याचे बब आले

दग्यात ८ हिंदू ठार व २१ जखमी झाले मुसलमानापकी २ ठार व १३ जखमी झाल्याचे दिसून आले, हिदची ३०० दुकाने मुसलमानानी जाळन भस्मसात केली एकाहि मुसलमानाचे दुकान हिदूनी जाळले नाही हिदूचे सुमारे एक कोटीवर नुकसान झाले

(लाला शिवराम सेवक, सेक्रेटरी पजाब प्रा सनातन पोलिटिकल लीगचे सेक्रेटरी याचा रिपोर्ट)

——केसरी ता २६–९–३१

* * *

## ८ मुंबई येथील दंगा

दग्यास निमित्त म्हणजे काही मुसलमान, हिदूच्या एका हॉटेलात गेले व त्या हॉटेलाच्या मालकापाशी मोहरमचा पोस्त मागू लागले पोस्त देणे न देणे ही हॉटेलवाल्याच्या मर्जीची गोष्ट असल्यामुळे त्याने तो देण्याचे नाकारले तेवढे निमित्त मुसलमान गुडाना मारामारीवर येण्याला बस्स होऊन तेथेच त्यानी मारहाणीला सुरुवात केली ती मारहाण वाढत वाढत जाऊन आज तिला घनघोर युद्धाचे स्वरूप आले आहे दग्याचे स्वरूप सोमवारी पूर्वीपेक्षाहि जास्त भयानक झाले लुटालुटी, आगी लावणे, खून, हाणामारी या प्रकारांनी वातावरण क्षुब्ध होऊन सर्व शहरावर मृत्यूची अवकळा पसरली. घरे व दुकाने प्रथम लुटावयाची, त्यातील माणसांना ते आसन्नमरण होईपर्यंत मारावयाचे व नतर घराना व दुकानाना आगी लावून द्यावयाच्या हा प्रकार सोमवारी सारखा सुरू होता. कित्येक जळत्या घरातून बायकामुलाचे प्राण फायर ब्रिगेडच्या लोकानी मोठ्या शर्थीने वाचविले

भुलेश्वरी मुसलमान गुड हिदू लोकाची दुकाने लुटून लोकाना मारहाण करीत होते पोलिसाचेहि ते ऐकेनात तेव्हा पोलिसास गोळीबार करावा लागला. ग्रॅटरोडवर गोलपिठ्याजवळ एक हिदू स्त्री आपल्या पतीसह गाडीतून जात असता काही अधमानी त्या स्त्रीच्या पोटात सुरी खुपसली व नवऱ्याच्या छातीत भोसकले. ती स्त्री मरण पावली तिचे पती अत्यवस्थ स्थितीत पडले आहेत सोमवारी दग्याची लाट गिरगाव भागातहि पसरली तेथे दुकानाची लूट झाली तेथे मुसलमानानी एका मोटारीत बऱ्याच लाठ्या आणलेल्या उघडकीस आल्या गुडानी आपली दृष्टी लोकल आगगाड्यावरहि फिरविली व त्यानी गाड्यावर दगडाचा वर्षाव केला सोमवारी रात्री रात्रीच्या अधाराचा फायदा घेऊन दगेखोरानी बराच धुमाकूळ घातला दग्याच्या भागात या रात्रीच ७ इसम ठार व १०० जखमी झाले रात्री आगीहि पुष्कळ लावण्यात आल्या नळबाजारातील बाबू खोटे रस्त्यावरील जैन मदिर जाळून खाक करण्यात आले मुसलमान गुड हिदूच्या दुकानातून चोरलेल्या कापडाच्या ठिकठिकाणी होळ्या करू लागले

कामाठीपुऱ्यात एका पिराचे थडगे हिदूनी फोडले अशी बातमी पसरताच मुसलमानाच्या टोळ्या तिकडे धावू लागल्या शेवटी त्याजवर ५ वेळा पोलिसाना गोळीबार करावा लागला. रात्री दहाच्या सुमारास सुमारे ५०० लाठीबद मुसलमान मदनपुऱ्याच्या बाजूने कामाठीपुऱ्यांत घुसले पोलिसानी त्यास उधळून लावतांच ते आसपासच्या गल्ल्यात शिरले

मुबईचे गव्हर्नर महाबळेश्वराहून मुबईस येऊन त्यानी सेक्रेटरीएटमध्ये सरकारी अधि-

कार्‍याच्या व मुसलमान पुढार्‍याच्या भेटी घेऊन त्याच्याशी विचारविनिमय केला

सोमवारपर्यंत दग्यात ६६ माणसे ठार झाली त्यात ५२ हिदू होते एक हिदू स्त्री गर्भवती असता तिला भोसकून ठार करण्यात आले मरण पावलेल्या लोकात मुसलमानाच्या अत्याचारामुळे मेलेल्या हिदूची सख्याच जास्त आहे पोलिसानी गोळीबार केला त्यातील १८ वेळा केलेला गोळीबार हिदू वस्तीत झाला

चोर बाजारात मुसलमान गुड भिती चढून हिदूच्या घरात शिरले व आतील लोकाना भोसकून ठार करू लागले सोनापूरकडे एक हिदूची प्रेतयात्राहि मुसलमानानी अडविली अखेर पोलीसानी रस्ता मोकळा करून दिला

गिरगावातील स्वदेशी गिरणीजवळ तर हिदू मुसलमानाची चागलीच जुपली तेथे हिदूनी पठाणाना खूप मार दिला याखेरीज नळबाजार, गोलपिठा, खेतवाडी येथे मारामार्‍या झाल्या येथे पोलिसाना गोळीबार करावा लागला नॉर्थब्रुक गार्डनजवळ हिदु–मुसलमानात मोठी मारामारी झाली तेथेहि पोलिसास गोळीबार करावा लागला

मशीदबदर रोडवर मुसलमान व परदेशी भय्ये याच्यामध्ये खूप कचाकची झाली हिदू मृताची जाळण्याची व्यवस्था हिदू रिलीफ कमिटी करीत होती सोमवारी पोलिसाना नागपाडा, नळबाजार, महारबावडी, सँढर्स्ट रोड, भुलेश्वर, शेख मेमन स्ट्रीट, उमरखाडी, बेलासीसरोड, नॉर्थब्लॅक गार्डन, कामाठीपुरा, धेडवाडी, मशिदबदर रोड, व माडवी इतक्या ठिकाणी २० वेळा गोळीबार करावा लागला सोमवारी पोलिसानी सुमारे २०० सशयित लोकाना अटक केली दग्याच्या भागातील १२ पोस्ट ऑफिसे तात्पुरती बद ठेवण्यात आली

सोमवारी लष्कर व पोलीस यानी विशेष दक्षता घेतली तरी दगा थाबला नाही. सोमवारी रात्री मोठमोठ्या राजरस्त्यावरील चाळीना गुडांनी आगी लावल्या शेकडो दुकाने लुटण्यांत आली जीवित व वित्त याचे नुकसान तर कल्पनातीत झाले. प्राणाच्या भयाने दुकानदार आपली रोकड दुकानात तशीच टाकून वाट सांपडेल तिकडे पळाले

मगळवारी सकाळी एकदम ४ ठिकाणी दग्यास सुरवात झाली भेडीबाजारात मुसलमानांच्या अनेक टोळ्या जमून त्यानी पद्धतशीरपणे लुटालुटीस सुरवात केली हिदूची शेकडो दुकाने लुटली अनेक ठिकाणी आगी लावल्या दुपारी उमरखाडी व भायखळा या भागात दग्याला विशेष जोर चढला माधव बागेजवळ हिदू राहत असलेल्या एका चाळीवर मुसलमानानी हल्ला करून ती पेटवून देण्याचा प्रयत्न केला तेथे अखेर पोलिसाना गोळीबार करावा लागला

भेडी बाजार ते पायधुणीपर्यंत सर्वत्र जाळपोळ, लुटालूट झाली मुसलमान लुटारू इतके धीट बनले की ते आपली मुलेलेकरे स्नेही सोबती बरोबर नेऊन त्याच्या इच्छेस येईल तो जिन्नस दुकानाच्या लुटीतून त्याना देत

महमदअल्ली रोड, मशीदबदर, चकला स्ट्रीट, उमरखाडी, खोजा मोहोल्ला, चिचबदर या भागात पोलीस दिसले की गुड पळावेत, पोलीस दृष्टीआड झाले की पुन लुटालूट, मारहाण, जाळपोळ हे प्रकार चालावेत असा प्रकार चालू झाला या भागात पोलिसानी एकदर ६ वेळा गोळीबार केला, परतु तेवढ्यापुरते दगेखोर पळत की पुन जोराने दगा उसळे

दगेखोराचा बेहोषपणा आता वाढून त्यानी उमरखाडी पोस्टावर चाल करून ते जाळून टाकण्याचा प्रयत्न केला गिरगावात विशेष दगा झाला नाही

कामाठीपुर्‍यात काही पठाणानी एका भय्याला ठार करून त्याला ओढीत आपल्या बिर्‍हाडी नेले हा प्रकार एका अँग्लो इडियन स्त्रीने पाहून पोलीसास कळविले तेव्हा पोलिसानी १२ पठाणाना अटक केली

सर्व शहरभर मारो, काटो काफिरको असे शब्द मधून मधून ऐकू येत होते परिस्थिति आटो-

क्याबाहेर जाणार असे पाहतांच रात्री ८ च्या पुढे कोणीही बाहेर पडू नये व पाच माणसापेक्षा जास्त माणसानी रस्त्यात जमाव करू नये असा हुकूम निघाला. मगळवारच्या दग्यात ३२ माणसे ठार, २२८ जखमी व २४ ठिकाणी जाळपोळ झाली २६ वेळा पोलिसास गोळीबार करावा लागला

मगळवारी कर्फ्यू ऑर्डर लागू करण्यात आली ता १८ रोजी सकाळी पुन दग्यास सुरवात झाली गोल देवळाजवळ प्रथम दगा उसळला पायधुणी, नळबाजार, काळबादेवी, हेन्सरोड, भेंडीबाजार, क्वीन्स रोड, या भागात गोळीबार करावा लागला लष्करी गस्त दिसेनाशी होताच मुसलमान गुड एकट्या दुकट्या हिदूवर हल्ला करून त्यास ठार करीत डिलाईलरोडवर २ भय्ये व हेन्सरोडवर २ हिदू ठार मारण्यात आले

बुधवारी मुसलमान गुडानी नवीन शक्कल काढली हिदूच्या वेषाने हिदूत मिसळावयाचे व सधि सापडताच एखाद्या हिदूला भोसकून पसार व्हावयाचे असाही प्रकार काही ठिकाणी झाला

अबदुल रहिमान स्ट्रीटवर मुसलमानानी एका रॉकेल तेलाच्या दुकानावर हल्ला केला व ते पेटवून देण्यापूर्वी प्रथम फोनच्या तारा तोडून नतर दुकानास आग लावून दिली आग विझविण्यास बब आले असता त्यावर दगडफेक करण्यात आली गोलपिठ्यावरहि अनेक हिदूची दुकाने जाळण्यात आली. शहरात कर्फ्यू ऑर्डर व १४४ कलम लागू केले आहे आता दग्यास उतार पडेल असे म्हणण्यास हरकत नाही

| | ठार झालेले | जखमी झालेले |
|---|---|---|
| शनिवार | ५ | ९६ |
| रविवार | २९ | ३७१ |
| सोमवार | ३८ | ३०६ |
| मगळवार | ३२ | २२८ |
| बुधवार | २४ | १५९ |
| गुरुवार | १० | ५१ |

—केसरी ता २०–५–१९३२

गुरुवारी पाव बिस्किटांची एक हातगाडी ढकलीत दिसण्यात हिदू पण चेहेऱ्याकडे पाहिले तर मात्र इस्लामचा अनुयायी वाटे असा एक मुसलमान हिदु पद्धतीचे कपडे चढवून आपली हातगाडी ढकलीत चालला होता हिदूना त्याची शका आली त्यानी गाडी उभी करून आत डोकावले तो तिच्यात चाकू, दगड, व इतर हत्यारे त्याना आढळून आली 'अरे हा मुसलमान रे मुसलमान' असे हिदू ओरडताच गाडी तेथेंच टाकून पैगबराच्या वच्चाने तेथून पोबारा केला

गुरुवारी सकाळी माधव बागेत एका हिदूवर मुसलमानानी प्राणघातक हल्ला केला इतर हिदूनीहि त्या मुसलमानास पिटून काढले

गुरुवारी सायकाळी डिलाइल रस्त्यावर पठाण व भय्ये याची चकमक उडाली दगड व सोडा वाटरच्या बाटल्या एकमेकावर स्वैरपणे फेकल्या जात होत्या १९ इसम जखमी झाले पोलिसानी ८८ इसमाना अटक केली भायखळा पुलावर एका हिदूवर चोघा मुसलमानानी तो बेसावध असता हल्ला केला शुक्रवारी दग्याला बराच उतार पडत असलेला दिसला तुरळक चोरटे हल्ले, लुटालूट, जाळपोळ इत्यादि अत्याचार चालूच होते शनिवारअखेर दग्यात एकदर मेलेल्याची सख्या १५८ असून जखमी झालेल्याची सख्या १६५७ आहे या १६५७ त ८२९ हिदू, ८०५ मुसलमान व अन्य जातीचे २३ आहेत

—केसरी ता २४–५–३२

* * *

## ९ कलकत्ता येथील दंगा

कलकत्ता येथे वड्या बाजारात नकोडा मशिदीवरून आर्यसमाजाची एक मिरवणूक गेल्या शुक्रवारी ता २ रोजी चालली असता मुसलमानानी तिला विरोध केला, परतु विरोधाला कोणी जुमानले नाही तेव्हा शब्दावरून शब्द वाढून दगडविटाचा व सोडावॉटरच्या बाटल्याचा वर्षाव सुरू झाला, व दग्याला एकदम भयानक स्वरूप प्राप्त झाले पोलिसानी दगा तात्पुरता शमविला पण सर्व शहरभर दंग्याची बातमी

वणव्याप्रमाणे पसरली. उत्तर–कलकत्ता भागातील मुसलमान बेफाम झाले दंगा वाढतां वाढता मदिर रस्त्याकडे पसरला शिवमदिर मुसलमानानी पाडून मूर्तीचा भग केला ता २ रोजी रात्री शातता होती, पण ता ३ रोजी दग्यास पुन सुरवात झाली हॅरिसन रोड, झकेरिया रस्ता, चितपूररोड, माणिकतोळा, राजाबझार या टापूत दग्याला विशेष जोर होता घराना आगी लावणे, लुटालुटी करणे, हे प्रकार सर्रहा सुरू आहेत दगा आवरेनासा पाहून लष्कराची मदत घ्यावी लागली, व एका प्रसगी गोळीबार करावा लागला मुख्य कटाक्ष आर्यसमाजिस्टाच्या मदिरावर होता त्याच्या शेजारी कालीमदिरावर मुसलमान हल्ला करणार हे समजताच हिंदूनी मोठ्या नेटाने प्रतिकार करून हल्ला परतविला ता ४ रोजी दग्याला पुन सुरवात झाली चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटनी १४४ कलमाखाली बेकायदा लोक जमण्याला प्रतिबधक कायदा पुकारला आहे सायकाळी पाच वाजता एकटा हिंदू पाहून सुरी खुपस, त्याचे डोके फोड, देवळावर हल्ला कर असे प्रकार चालले होते मेडिकल कॉलेज रस्त्यावरील शिवमदिरावर झालेला हल्ला हिंदूनी परतविला मेडिकल कॉलेजजवळील मशिदीवर हिंदूनीही उलट हल्ला केला तो परतविण्यात आला चकमक होऊन उभय पक्षाचे लोक जखमी झाले ता ५ रोजी सकाळी वातावरण शाततेचे होते परतु लवकरच हायकोर्टाजिवळ बाबूघाट येथे दगा झाला. तेथे मुसलमान नावाड्यानी एडनगार्डन पोलिसचौकीवर हल्ला करून लूटमार केली माणिकतोळा येथे मुसलमानानी एका हिंदूच्या घरावर हल्ला केला येथे लष्करास गोळीबार करावा लागला हिंदुमुसलनानाची येथे चागलीच चकमक झाली ता ५ रोजी रात्री नारिकेल डागा या ठिकाणी पाचशे मुसलमानानी एका पिठाच्या गिरणीवर हल्ला केला परतु हिंदूनी त्याचा योग्य प्रतिकार करून त्यास पिटाळून लावले बागमारी, काशीपूर, या भागात शीख व हिंदु याची देवालये विध्वस करण्याचा प्रयत्न झाला. बागमारी येथे शीख देवालयाची थोडी नासधूस झाली पण इतरत्र मुसलमानांना यश मिळाले नाही. ता. ६ रोजी दंग्यास पुन: जोर चढला. चितपूर रोड वगैरे भागांत दगेखोरांनी ट्राम गाड्यावर हल्ले करून त्या बद पाडल्या. लष्कर व पोलीस हजर असताहि दंगेखोरांनी चोपाचोपी चालविलीच होती आर्मेनियन रस्त्यावर मुसलमानानी एका हिंदूवर हल्ला केल्याने दग्यास सुरवात झाली हिंदू जवळच्या मशिदीवर हल्ला करतील या कल्पनेने मुसलमानानी मारामारीस सुरवात केली व तेथे भयकर मारामारी झाली चिलखती गाड्या आल्यावर दगेखोर पसार झाले

ता ७ रोजी ना सर ह्यू स्टीफन्सन हे दग्याची ठिकाणे व दवाखाने समक्ष पाहून गेले त्याच्या सागण्यावरून दग्याच्या भागातील पोस्ट ऑफिसेस उघडण्यात आली मार्क्विस रस्त्यावर मिस् पी. विल्सन नावाच्या एका गोऱ्या बाईवर हल्ला होऊन तिला थोड्या जखमा झाल्या. गौरीपूर येथे एका गिरणीतील मजुरानी सप करून एका युरोपियन असिस्टटावर हल्ला केला

ता ८ रोजी नैहटी येथे बराच दगा झाला. पारसनाथ जैन मदिरावर मुसलमान हल्ला करण्यास गेले असता त्यास लष्कराने पिटाळून लाविले.

ता ९ रोजी शहरात शातता नादू लागली. या दग्यात मृत्यू ३८, जखमी –हिंदु ३१०, मुसलमान ८५, व पकडलेल्यापैकी हिंदु ३१२ व मुसलमान १९२ आहेत —केसरी ता १३–४–३५

—गेल्या महिन्याच्या पूर्वार्धात कलकत्त्यास दंगा होऊन तो शमतो न शमतो तोंच गेल्या आठवड्यात दग्याने पुन. उचल खाल्ली ता २२ रोजी बडा बाजारातून दारूने झिगलेले दोन मुसलमान हिंदना अभद्र शिव्या देत जात असता, हिंदूनी त्यास तसे न करण्याबद्दल बजावले. परतु त्यानी तिकडे बिलकूल लक्ष दिले नाही यावरून शब्दावरून शब्द वाढून दग्यास सुरवात झाली

दुपारी दोन वाजता मुसलमान लोकानी ट्रॅमगाड्यावर हल्ला केला व मारामारीस सुरवात केली असे समजतांच बडाबाजार, चितपूर रोड,

कॅनिंग स्ट्रीट, हॅरिसन रोड येथील दुकाने बंद होऊं लागली; व मुसलमानांच्या टोळ्या रस्त्यात जमूं लागल्या. बडाबाजारांत हिंदूचाहि जमाव जमला. चितपूर रोड व कॉटन स्ट्रीट याच्या नाक्यावर मोठीच मारामारी होऊन त्यात चार इसम मेले व तेरा जखमी झाले गुरखा व युरोपियन लष्कर येऊन त्याने गर्दी मोडली झकेरिया रस्ता व चितपुर रस्ता येथे दगेखोरानी ट्रॅमगाड्यावर दगडफेकीस सुरवात केली पोलीस कमिशनरने गर्दी मोडण्यास सागितले परतु ती न मोडल्याने गोळीबार करावा लागला गोळीबारांत चौघाना जखमा झाल्या. पैकी दोघे मरण पावले

ता २३ रोजी ५०–६० मुसलमानानी नव्या बाजारात कापडाच्या हिदु व्यापाऱ्याच्या दुकानावर हल्ला केला. तीत व्यापाऱ्याना जबर दुखापती झाल्या. फरी स्कूल स्ट्रीटवर शभर मुसलमान गुडानी एक मोठे धान्याचे दुकान लुटले व हिदूवरहि हल्ला केला मुसलमान गुडाच्या तडाख्यातून लहान हिदु मुलेहि सुटली नाहीत

ता. २४ रोजी मारामाऱ्या सुरूच होत्या मछवाबाजारात मुसलमानानी एका हिंदु गाडीवानाला जखमी केले त्यामुळे हिदु–मुसलमानाची चागलीच जुपली सुमारें पाचशें मुसलमान हातात कुऱ्हाडी, लाठ्या घेऊन नगारा वाजवीत आले त्यानी हिंदूंवर दगडविटाचा वर्षाव केला. त्यात आठ हिंदु जखमी झाले. पोलिसानी मोठ्या शिकस्तीने गर्दी मोडली चितपुर रोडवर हिदु–मुसलमानाचा मोठा जमाव गोळा झाला होता दगेखोर तलवारी, कुऱ्हाडी, लाठ्या यानी सज्ज होऊन आले होते. गुरख्यांच्या मदतीने गर्दी मोडण्यात आली. दगेखोरांचा रोख मारवाडी लोकांवर असल्याच्या दाट वदता पसरत होत्या. बौ बाजारात मुसलमानानी एका घरातून पोलिसावर हल्ला केला.

ता. २५ रोजी राजा दिनेंद्र नारायण स्ट्रीटवर दंगा होऊन गोळीबार झाला तीन मुसलमान जखमी झाले मिर्झापूर रस्त्यावर एका हिंदूला मारल्याने उभय पक्षात चागलीच चकमक झडली. पोलिसास येथे गोळीबार करावा लागला. मुक्ताराम बाबू रस्त्यावरहि खूप दगल माजली. पोलीसास येथेहि गोळीबार करावा लागला.

ता २६ रोजी दग्यामुळे सर्वच व्यवहार बद पडल्याने शहरात अन्नाचे दुर्भिक्ष झाले दग्याचे क्षेत्र वाढले फिदरदूर, तालतोला या भागात दगा उद्‌भवला उभयपक्षी बरीच चकमक उडाली पोलीस वेळीच आल्याने दगेखोर पळाले हौऱ्याच्या डि मॅ ने १४४ कलमाचा अम्मल जारी केला

ता. २७ रोजी बौ बाजारात एका हिंदूला मुसलमानानी भोसकले, त्याबरोबर दग्यास सुरवात झाली उभय पक्षीयानी एकमेकावर हल्ले चढविले बरेच लोक जखमी झाले. मछुवा बाजारात एका मुसलमानाने दग्याच्या खोट्याच बातम्या पसरविल्याने दगा झाला. पाचशे मुसलमानाच्या जमावास भरत रॉय या पोलीस अधिकाऱ्याने मज्जाव करताच त्यासच दगेखोरानी गोळी घातली तो तावडतोब मरण पावला हा प्रकार पहाताच २००० बगाली हिदु व उत्तर हिदुस्थानातील हिंदू मुसलमानाशी सामना देण्यासाठी गोळा झाले दग्यात १० माणसे मेली व १५ जखमी झाली लष्कराने दगा मोडला

डलहौसी चौकातील जनरल पोस्ट ऑफिसांतील रेजिस्ट्रेशन कचेरीत सहा मुसलमान शिरले चिलखती मोटारी धावत आल्या त्यानी चौघास अटक केली

ता. २८ रोजी दग्याच्या भुमका उठत होत्या. एकेक असे खून व जखमी मात्र रस्त्यातून सापडतच

ता २९ रोजी मोठ्या स्वरूपाचे दगे कोठें झाले नाहीत, परतु वाटमारीचे प्रकार मात्र सुरूच आहेत. शहरास गुडाचा कायदा लागू केला आहे बगालचे गव्हर्नर हे कलकत्त्यास आले आहेत.

ता. ३० रोजी गव्हर्नरसाहेबानी दग्याच्या भागात हिंडून तेथील स्थिति समक्ष पाहिली. दंग्याचा फायदा घेऊन हिदूची मुले बाटविण्या-

साठी पळविली गेलीं असेहि दिसते. असाच एक हिंदू मुलगा पोलिसांनी नुकताच मुसलमान बदमाषाच्या हातून सोडविला. दंग्यात ५९ इसम मेले व ३८८ जखमी झाले. गुडाना पकडण्याचे काम सुरू आहे —केसरी ता ४–५–२६

* * *

## १० रावळपिंडी येथील दंगा

अलीकडे बरेच दिवस रावळपिडी येथें तेथील मुसलमान व शीख याच्यात तेढ उत्पन्न झाली होती रावळपिडी म्यु चे अध्यक्ष सरदार मोहनसिग याच्या मालकी जागेवर एक सिनेमागृह बाधावे असा विचार चालला होता ही जागा तेथील जुम्मा मशिदीच्या मागे असल्याने तेथे ही इमारत बाधू नये, अशी मुसलमानानी हरकत घेतली; व बाहेरगावचे मौलवी तेथे जाऊन त्यानी जुम्मा मशिदीत व शहरात ठिकठिकाणी व्याख्याने देऊन हिंदू व शीख समाजाविरुद्ध मुसलमानाना खवळिले. परतु काही समजस लोकाच्या प्रयत्नाने ता. २१ व २८ मे रोजी होणारा दगा टळला परतु बाहेरगावच्या मौलवीनी लोकाना चिथवून देणारी भाषणे करण्याचा उपक्रम चालूच ठेविला ता. १३ जून रोजी गुरु अर्जुनदेव याच्या जन्मोत्सवादिवशी वाद्ये वाजवीत जुम्मा मशिदीवरून मिरवणूक जात असता मुसलमानानी हरकत घेतली परतु काही अनिष्ट प्रकार न होता मिरवणूक निर्विघ्नपणे पार पडली

ता. १४ रोजी गुरुद्वारात दिवाण भरला असता बरेच मुसलमान बाहेर जमून 'अल्लाह–अकबर' अशा गर्जना करू लागले व शिखाना आव्हानपूर्वक बाहेर बोलावू लागले कित्येक मुसलमान हातात कुऱ्हाडी घेऊन गुरुद्वारात शिरले व शिखाना चिडवू लागले. या सुमारास गुरुद्वाराबाहेर बरेच मुसलमान जमा झाले होते शीख लोक बाहेर पडून त्यानी मुसलमानाना रेटीत धान्याच्या बाजारातील पोलीस ठाण्यापर्यंत नेले. मुसलमानानी धान्याच्या बाजारातील दुकानाना आग लावली. त्या बरोबर शहरात निरनिराळ्या ठिकाणी दंग्यास सुरवात झाली. हा दंगा रात्री नवापासून अकरा पर्यंत चालू होता. आगीच्या वेळी ता १४ व १५ रोजी दोनहि दिवस फायर-ब्रिगेडची कांही मदत झाली नाही. गंजमंडीमधील बहुतेक सर्व घरे जळाली असून फक्त एका मुसलमानाचे घर तेवढे नेमके वाचविण्यात आले आहे दंग्याची बातमी पसरताच लष्कर आणण्यांत आले व त्याच्या मदतीने दगा शांत करण्यांत आला. शहरांत लष्करी पहारा आहे

या दग्यात ११ मुसलमान, २ हिदू, व १ शीख इतके लोक ठार झाले एकदर ४६ इसम जखमी झाले धान्याच्या बाजारातील १७० दुकाने, १० वखारी, दोन मोटारी व २१ तिजोऱ्या जाळण्यात आल्या

रावळपिडी येथील दग्याचा फैलाव सैदापूर या गावी ता. १६ रोजी झाला. ता १६ रोजी सैदापूर येथे तेथील रहिवासी लछमनदास व त्याचा मुलगा मालीराम याना काही डाकूनी रात्री अनुक्रमे कुऱ्हाडीने व बदुकीची गोळी घालून ठार केले ५ लोक जखमी झाले आहेत व २ आसन्नावस्थेत पडले आहेत हिदूची सुमारे ३५ दुकाने लुटून जाळण्यात आली, पहाटे ४ वाजता पोलीस तेथे आले परतु दगेखोर गाव आधीच उध्वस्त करून पसार झाले होते सुमारे दीडशे ते दोनशे दगेखोर होते दगेखोर रावळपिडी हजारा जिल्ह्यांतून आलेले असावेत असे म्हणतात

—केसरी ता २२–६–१९२६

* * *

## ११ कलकत्ता येथील दंगा

ता ८ रोजी दरसालप्रमाणे श्रीराजराजेश्वरीच्या मूर्तीचे विसर्जन करण्यासाठी मिरवणूक निघाली असता हिदू–मुसलमानातील तेढ लक्षात घेऊन पोलीस कमिशनराने आयत्या वेळी मिरवणुकीचा रस्ता बदलण्यास सागितले परतु वहिवाटीविरुद्ध तसे करण्याचे हिदूनी नाकारले व मिरवणूक बद पडली हिदु पुढाऱ्यानी पोलीस कमिशनरची मुलाखत घेतली व त्यानीहि पहिल्या रस्त्याने मिरवणूक काढण्यास परवानगी दिली. मिरवणूक हॅरिसन रोड, सेट्रल ॲव्हेन्यू, बीडन

स्ट्रीट, मनोहरदास रस्ता, स्ट्रँड रोड, व वरिबोहरघाट या मार्गाने जावयाची ठरले

ता. १५ रोजी योग्य वेळी मिरवणूक निघाली. मिरवणुकीबरोबर पोलीसहि तयारीनिशी हजर होते. मिरवणूक हॅरिसन रोडवर येताच दगा होणार याचे पूर्वस्वरूप दिसून आले एप्रिलमध्ये दगा प्रथम झाला, त्या ठिकाणी म्हणजे मारवाडी हॉस्पिटल व दिनुमिया मशीद याचेजवळ मिरवणूक आली. त्याबरोबर मशिदीतून मुसलमान बाहेर पडले परतु पोलिसानी त्यास हाकून लावले मिरवणूक सेट्रल अॅव्हेन्यूजवळ येताच मिरवणुकीसमोर मुसलमान लोक येऊन उभे राहिले व मिरवणुकीवर विटाचा वर्षाव सुरू केला पोलीसासहि ते दाद देईनात. तेव्हा पोलिसानी लाठी चालविली त्याचाहि उपयोग न झाल्याने गोळीबार केला दगेखोरानी एका हिंदूस भोसकले मिरवणूक तशीच पुढे चालू झाली मछुवा बाजारातून मिरवजात असता तेथेहि दगा झाला. परतु मिरवणूक अखेर नियोजित स्थळी म्हणजे मिरबहार घाटावर पोहोचली व तेथे मूर्तीचे यथाविधी विसर्जन झाले

मिरवणूक हॅरिसन रोडवरून पुढे जाताच मुसलमानानी दिसेल त्यास भोसकण्यास सुरवात केली. डे कमिशनर मि हूट हे गर्दी मोडण्यासाठी तेथे गेले असता त्यानाहि दगेखोरानी प्रसाद दिला. दगेखोरानी जोरासकी पोलीसठाण्यावरहि हल्ला केला. मारवाडी हॉस्पिटलवर असाच हल्ला केला व दगडविटाचा वर्षाव केला, व त्यामुळे शस्त्रक्रियेची हत्यारे मोडली एका रोग्याला बरीच दुखापत झाली. हा दगा जाणून बुजून व कायद्याचा उपमर्द करून मुसलमानानी केला असें सर्व अँग्लो इडियन पत्राचे मत आहे

कलकत्ता चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटनी क्रि प्रो. कोडाच्या १४४ कलमान्वये सार्वजनिक ठिकाणी पाचापेक्षा जास्त माणसे जमण्यास मनाई केली आहे दग्यात १४ इसम मेले व सुमारें १२५ जखमी झाले. —केसरी ता. २०–७–२६

ता. १९. रोजी रथयात्रेच्या मिरवणुकीत तीन रथ असून ती बालातचिया भागातून पाईकपारा रस्त्याच्या मार्गाने दुपारी ३ वाजता निघाली मिरवणुकीबरोबर सुमारें ४ हजार हिंदू होते. मिरवणुकीबरोबर पोलीस अधिकारी, गुरखे हेहि हजर होते ता. ११ रोजी ज्या मशिदीजवळ प्रथम दगा झाला त्या ठिकाणाहून नीटपणे मिरवणूक पुढे गेली ती पुढे जाताच राणी रोजजवळ मुसलमानानी मिरवणुकीवर दगड–विटाचा वर्षाव करण्यास सुरवात केली त्यात काही पोलीसहि जखमी झाले दगेखोर आवरेनात तेव्हा पोलिसास गोळीबार करावा लागला त्यात ४ मुसलमान व ३ हिंदू जखमी झाले

मिरवणूक तशीच बराकपूर रस्त्यावरून काजीपूर रस्त्यावर गेली रस्त्यात ठिकठिकाणी मुसलमान लोक गोळा झाले असून घराच्या छपरावरहि बसले होते तेथून त्यानी मिरवणुकीवर मारा करण्यास सुरवात केली मिरवणूक चौरीपारा रस्त्यावरील मशिदीपुढे येताच मशिदीतील प्रार्थना बद होईपर्यंत मिरवणूक थाबवून धरण्यात आली प्रार्थना आटोपताच हिदूनी वाद्ये वाजविण्यास प्रारभ केला. त्याबरोबर मुसलमानानी दग्यास सुरवात केली परतु अखेर मुसलमानाना परतविण्यात येऊन मिरवणूक नियुक्त स्थळी पोहोचली मिरवणूक चितपूर रोडवरून पुढे गेल्यानतर तेथे हिदु मुसलमानाचा बराच दगा झाला.

ता २१ रोजी ताबुताची मिरवणूक असल्याने मुसलमानात बरीच धामधूम सुरू होती. त्यावेळी मारवाडी लोकाच्या छपरावरून मुसलमानावर गोळचा झाडण्यात आल्या

सेट्रल अॅव्हेन्यूमध्ये मारवाडी लोकाची वस्ती आहे तेथे लाठीवाले हजारो मुसलमान सज्ज झाले होते त्या ठिकाणी मिरवणूक येताच मुसलमानानी आरडाओरडीस सुरवात केली. त्या वेळी मारवाडी लोकाची घरे बद असून एकहि हिदु रस्त्यात नव्हता. परतु कालीमदिरातून आपल्यावर दगड आले अशा समजुतीने मुसलमान मदिरावर हल्ला करण्यास गेले पोलिसाच्या सागण्याचा काही उपयोग झाला नाही दंगा मोठाच

झाला असता, परंतु अतिशय जोराची पर्जन्यवृष्टि झाल्याने व तो सर्व भाग जलमय झाल्याने दंगा झाला नाही बडा बाजार येथेहि दंगा झाला पोलिसास तेथे गोळीबार करावा लागला. ३ इसम मेले व बरेच जखमी झाले सेंट्रल अॅव्हेन्यूमध्ये एका हिंदूचें घर लुटण्यात आले

माणिकतोळा रस्त्यावर मुसलमानानी मोठा दगा केला मुसलमान लोक पोलीस अॅ कमिशनर मि सेन याच्या घराजवळ येताच त्याच्या घरावर दगडविटाचा वर्षाव केला. तेथे गोळीबार झाला, त्यांत १ इसम मेला व बरेच जखमी झाले

ता. २१ रोजी पाईकपारा येथे पुन दगा झाला पोलिसानी गोळीबार केला २ इसम जखमी झाले

मोहरममधील मिरवणूकवाल्यानी अपर सर्क्युलर रोड, राजा बझार, व सुखिया स्ट्रीट यातील हिदूच्या घरावर दगडविटाचा वर्षाव केला सर जगदीशचंद्र बोस याच्या घराचा दरवाजा व बाहेरच्या भिती मोडून टाकल्या युनिव्हर्सिटी सायन्स कॉलेज व खासदार मन्मथनाथ बानर्जी याच्या घराची मोडतोड करण्यात आली कित्येक दुकानेहि फोडण्यात आली

दग्यात जखमी झालेले ४० इसम दवाखान्यांत गेले असून ३ हिदू व ३ मुसलमान मरण पावले

—केसरी ता २७–७–१९२६

* * *

[ आजरे, कराची, लाहोर, वगैरे नुकत्याच झालेल्या दंग्याची हकीकत अगदी ताजीच असल्याने येथे घेतलेली नाही. ठिकठिकाणी किरकोळ स्वरूपाचे वाटणारे परतु खरोखर भयकर असणारे दगे किती होतात हे समजण्यासाठी पुढे काही दग्यांची व इतर सकलित हकीकत दिली आहे. ]

—अमृतसर येथे हिदु विद्यार्थी व मुसलमान विद्यार्थी यामध्ये क्रिकेटचा सामना होता. त्यांत आपला पराभव होणार असे पाहून मुसलमानांनी एका शीख शिक्षकावर हल्ला केला ! तेव्हा दगा होऊन बारा विद्यार्थी जखमी झाले

—केसरी ता. २२।१।३५

—धांदरफळ–संगमनेर येथील श्री. मोहोळे हे आपला एक सर्व्हेनंबर दुरुस्ती करीत असतां शेताचे काही भागांत मनुष्याची हाडकें वगैरे निघाली त्यावरून या जागी आमच्या कबरी असून आमच्या धर्मभावना दुखावल्या असे स्थानिक मुसलमान म्हणू लागले आहेत. त्यानी अर्ज दिल्यामुळे फौजदारांनी जागेचा पचनामा केला श्री मोहोळे याजवर ते कायदेशीर इलाज करणार आहेत !

—केसरी ता १२–२–३५

—हुटगी स्टेशनावर ता १२ रोजी दुपारी १०–१२ मुसलमान फकीरांनी आपल्यास फुकट गाडींत बसू दिले नाही या सबबीवर दंगा केला तीन चार इसम गाडीपुढे आडवे पडले पुढे स्टेशन मास्तराने त्याना गाडीत बसवून दग्याची हकीकत रेल्वे पोलिसास कळविली पोलिसानी पुढील स्टेशनावर त्याना अटक केली झडतीत त्याच्याजवळ सुरे वगैरे सामान सापडले —केसरी ता २२-२-३५

—बगळूर येथे टायरंट हा बोलपट दाखविला जात असता मुसलमानांनी त्यास हरकत घेऊन मारामारी सुरू केली अखेरीस पोलिसांस लाठीमार करावा लागला दगलीत ४ पोलीस जखमी झाले आहेत. ४ मुसलमानाना अटक करण्यांत आली आहे

—केसरी ता ५–३–३५

—भोपाळ सस्थानातील बुधवारा नावाच्या एका खेड्यात होळीच्या दिवशी काही हिदू देवालयांत पूजा करीत असता मुसलमान गुडानी त्यावर हल्ला करून त्यांना जखमी केले व देवालयांतील मूर्ती तलावात फेकून दिली. हल्ल्यांत हिदू स्त्री–पुरुष मिळून २० इसम जखमी झाले

—केसरी ता. २९–३–३५

—कराची येथील ताबुताची मिरवणूक निघाली असता एका मुसलमान गुडाने एका हिदु फोटोग्राफरास तो फोटो घेण्याच्या धादलीत असता डोक्यावर काठी मारून जखमी केले. अत्याचारी इसमास पोलिसानी तेथे पकडून त्याची रीतसर चौकशी करून सोडून दिले !

—केसरी ता. १९-४-३५

—दिल्ली येथील कट्टर मुसलमान पुढारी ख्वाजा

हसन निजामी यांनीं पतिआळाच्या महाराजांना पत्र पाठवून दरबारने आपल्या ताब्यांत घेतलेल्या मशिदी परत मुसलमानाच्या ताब्यात देण्याबद्दल विनंति केली आहे विनति अमान्य झाल्यास या झगडधास अखिल भारतीय स्वरूप देण्यांत येईल अशीहि त्यानी महाराजाना धमकी दिली आहे

—केसरी ता. ३–५–३५

—सीलोनमध्ये रहाणाऱ्या पठाणानी तेथील सरकारकडे अर्ज पाठवून त्यात सीलोनच्या कायदे-मंडळांत आपल्याला जागा द्याव्या म्हणून विनति केली आहे. त्याचा धदा म्हणजे पठाणी सावकारी करणें हा होय सगळधा सीलोनमध्ये ह्या पठाणाची वस्ती एक हजार इतकीहि नाही !

—केसरी ता ७–५–३५

—देऊळगांव राजा (वऱ्हाड) येथे मुसलमानानी एक मिरवणूक काढून हिदूवर हल्ला केला चार हिंदू जखमी झाले आहेत हिदूनी हरताळ पाडला आहे. —केसरी ता १२–५–३५

—लाहोर येथे ज्युबिली उत्सवाच्या प्रसगी मुसलमान गुडानी सार्वजनिक जागी स्त्रियाचा बराच उपमर्द केला कित्येक स्त्रियाचे बुरखे फाडून टाकले व एका स्त्रीचे नेसते वस्त्रच नेले मिंटो पार्कजवळ एका हिदु तरुणीस पळवून नेण्याचा मुसलमान गुडानी प्रयत्न केला, पण हिदूचा जोर वाढता झाल्याने गुड पळून गेले

—केसरी ता. १७–५–३५

—गेल्या पौर्णिमेला पैठण येथे हनुमानजीची मूर्ति नाहीशी झाली होती. ती गगा प्रवाहात सापडली. त्या सबधात दोन मुसलमानाना पकडण्यात आले आहे —केसरी ता २१–५–३५

—निजामपूर (ता माणगाव) येथे ता १० रोजी रौप्य ज्युबिली निमित्त बादशहाच्या फोटोची मिरवणूक पालखीतून काढण्यात आली होती मिरवणूक मुसलमानांच्या मोहल्ल्यात आल्यावर मुसलमान गुडांनी हिंदूवर हल्ला केला. मिरवणुकीबरोबर शाळेंतली मुले व मुली पालखीपुढें असल्यानें त्यांच्यावरच प्रथम हल्ला झाला. वाजंत्र्यांनाहि मार बसला. या अनपेक्षित प्रकारामुळें गडबड झाल्याने पालखी रस्त्यावरच ठेवून लोक चालते झाले. पुढें तालुक्याचे मामलेदार आल्यावर पालखीची मिरवणूक निघाली. पालखीबरोबर पोलिस हेड कॉन्स्टेबल, तलाठी व सर्कल इन्स्पेक्टर अशी मडळी असतांना मुसलमानाचा हल्ला झाला

—केसरी ता २४–५–३५

—सुलतानपूर येथे एका मुसलमान माथेफिरूने तेथल्या प्राचीन शिवालयातील घटा फोडली तेथून लोणारला जाऊन तेथल्या अतिसुप्रसिद्ध धारेवरील चुनेगच्ची वृदावनाचा व शिवलिगाचा विध्वस केला. सदर गुडाचा हिदु स्त्रियानाहि उपद्रव होई आता त्याला पोलिसानी अटक केली आहे —केसरी ता. ४–६–३५

—सागली येथे ता २ रोजी जुन्या मुरलीधराचे देवालयात आपण रजपूत आहो असा बहाणा करून एक मुसलमान शिरल्यामुळे तेथील व्यवस्थापकानी त्यास पोलिसाच्या स्वाधीन केले पोलिसानी त्यास तूर्त अटकेत ठेवले आहे

—केसरी ता ७–६–३५

—वेलोर येथे एका पजाबी हिदूची व एका मुसलमानाची कुस्ती झाली तीत हिदू पेहेलवान यशस्वी झाला यशस्वी मल्लाने बक्षिसाची रक्कम मागितल्यावरून दोन्ही पक्षात मारामारी होऊन ४०० लोक जखमी झाले —केसरी ता ७–६–३५

—कराची येथील काही मुसलमानानी हिंदूची स्मशानभूमि नागरली या आरोपावरून त्याच्यावर खटले होऊन सात मुसलमानाना प्रत्येकी ३०० रुपये दड झाला दड न दिल्यास तीन महिने सक्त मजुरीची शिक्षा सागण्यात आली

—केसरी ता १४–६–३५

—बरेली येथील हिदूनी स्टेशनजवळ एक देऊळ व धर्मशाळा बाधण्यास सरकारकडे परवानगी मागताच मुसलमानानीहि मशिदीकरिता ती जागा मागितली अर्थात् सरकारने दोघानाहि ती देण्याचे नाकारले. पण मुसलमानानी स्टेशननजीक विटांचा चौथराहि रचला व प्रार्थना करू लागले हरकत करणाऱ्या पोलिसासच त्यांनी बडवून काढले.

सरकार मुसलमानांवर खटले भरणार असल्याचे कळतें —केसरी ता. २८–६–३५

—मद्रास–कडलूर नजीक मोरारी सादू या गावी हिंदु अस्पृश्य व मुसलमान याची लग्नातील वाद्यावरून मारामारी होऊन ३० इसम जखमी झाले त्यापैकी चार अत्यवस्थ आहेत.

—केसरी ता ९–७–३५

—गुजराणवाला (पजाब) येथील मुसलमानाच्या वस्तीजवळील एका तलावानजिक 'झटका' पद्धतीने तीन मेंढरे मारली गेल्यामुळे मुसलमान व हिंदु याजमध्ये बरीच तेढ माजली आहे हजारो मुसलमान लाठ्या घेऊन त्या जागी जमा झाले. पण कोतवाली नाक्यावरील पोलिसानी वरिष्ठास ही बातमी लगेच कळविल्यामुळे पुढील प्रसग टळला. 'झटका' पद्धतीने केलेल्या हत्येचा निषेध करण्याच्या उद्देशाने ता. २ रोजी म्युनिसिपालटीच्या सभासदाची सभा झाली हिंदू पुढाऱ्यांना बोलावणे केले नाही म्हणून हिंदू सभासदानी निषेध प्रदर्शित केला. मुसलमानानी हिंदूवर बहिष्कार पुकारला आहे पोलिस बदोबस्तहि जय्यत दिसतो —केसरी ता ६–८–३५

—बऱ्हाणपूर येथे नागपचमीच्या दिवशी एक हिंदूची मिरवणूक निघाली असता मुसलमानानी तिला विरोध केला. यामुळे दंग्याची भीति उत्पन्न झाली सबब डे. कमिशनरने १४४ कलम लागू करून त्या दिवशी मिरवणूकबदी केली

—केसरी ता. १३–८–३५

—नवखाली (बगाल) तहशिलातील नाझिरपूर खेड्यात एका हिंदू गहस्थाचे घरी रामलीला उत्सवाचा कार्यक्रम गेल्या आटवड्यात झाला उत्सवानिमित्त गावातील बरेच हिंदु व मुसलमान जमले होते. हिंदूच्या उत्सवात मुसलमानानी भाग घेतला हे न खपून मौलवी मासूम यांनी सदर ठिकाणी प्रवेश करून आपल्या बाधवाची हजेरी घेतली. त्याचा परिणाम फारसा न झाल्याने मासूम प्रभृति ४०।५० गुडानी उत्सवाचे गर्दीतच मध्यरात्री घरात शिरून तेथें जमलेल्या लोकावर लाठीचा हल्ला केला, काहीनी पूजेचें साहित्य लाथाडून दिलें व कांहीनी श्रीकृष्णाची मूर्तिही फेकून दिली. हिंदूनी याबद्दल खटले भरले. मौलवी व त्याचे साथीदार यांना प्रत्येकीं सहा महिन्याची शिक्षा झाली

—केसरी ता. १४–८–३५

—सोलापूर येथील 'विजय पत्राचे बातमीदार श्री एस् व्ही. देशपांडे हे ता. ९ रोजी छापखान्यांतून परत येत असता गुदुभाई नावाच्या एका मुसलमान पेहेलवानाने त्यांच्यावर हल्ला करून जखमी केले विजय पत्र हिंदु संघटनेचा पुरस्कार करणारे असल्याने या पत्रावर मुसलमानाचा दांत आहे —केसरी ता. १३–९–३५

—पनवेलच्या मुसलमान कच्छानी दडेली केल्यामुळे हिंदूनी निग्रहाने मुसलमानी मोहोल्यांतून मिरवणूक नेण्याचा निर्धार केला व ता. १२–९–३५ रोजी मिरवणूक नेली गणपती गौरी विसर्जनाचे दिवशी हिंदूच्या एका मेळेवाल्या मडळीना २०-२५ मुसलमानानी मारहाण केली होती मिरवणूक नेली त्या दिवशी अधिकाऱ्यानी योग्य बंदोबस्त ठेवून हक्क सरक्षणास मदत केली.

—केसरी ता १७–९–३५

—एका इटालियन मिशनऱ्याने सेतुलका (मद्रास) नावाच्या एका खेड्यात हरिजनाच्या देवालयांत शिरून तेथें भजन करीत असलेल्या लोकाना बाहेर घालवून दिले व तेथील श्रीरामाचे चित्र घेऊन ते आपल्या चर्चसमोर जाळले अशी बातमी श्री साबमूर्ति यांनी युनायटेड प्रेसमार्फत प्रसिद्ध केल्यामुळे तिकडील हिंदू समाजात बरीच खळबळ उडाली आहे —केसरी ता. २०–९–३५

—श्रीनगर येथे मुसलमानात दोन तट पडल्यामुळे गावात बरीच अस्वस्थता माजली आहे. त्यात मुसलमानानी हिंदूना पवित्र असलेल्या एका जागेवर मशीद बाधण्याचा प्रयत्न केल्यामुळे जास्तच भर पडली आहे तेथील हिंदूनी या गोष्टीस विरोध केला. श्रीनगर येथील मुसलमान नवजवान सघाचे अध्यक्ष यानी अत्याचारप्रवर्तक भाषणाची मोहीम सुरु केली आहे काश्मीर सरकारने सात दिवसाच्या आत आमच्या मागण्या

न मानल्या तर आपणास चढाईचा मार्ग स्वीकारावा लागेल अशी धमकी दिली आहे दरबारने सदर लोकाना अटक केली असून सर्व शहरात लष्करी ठाणी ठेवण्यात आली आहेत

—केसरी ता २-२-३४

—भोपाळातील मरदानपूर तालुक्यातील मौजे पौलीकरार या गावचे एक सपन्न शेठ गगाराम अग्रवाल हे मरण पावले. त्या बरोबर त्याचा ८ वर्षांचा मुलगा लक्ष्मी नारायण व ५ वर्षांची कन्या मथुरा याना मुसलमान बनविण्यात येऊन त्याची हजारो रुपयाची मिळकत लुबाडण्यात आली. ही निराधार दुर्दैवी बालके अलीजानखा नावाच्या मुसलमानाच्या कबजात काळ कठीत आहेत

—केसरी ता २-२-३४

—भोपाळ सस्थानात इब्राहीमपुरी येथे नोव्हेंबर सन १९३३ मध्ये शिप्याचे काम करीत असलेल्या कोणा अबदूल रहमान खय्यात नावाच्या मुसलमानाने एका तरुण ब्राम्हण स्त्रीस मुसलमान बनविले या स्त्रीबरोबर एक सुदर नावाची आठ वर्षांची बालिकाहि आहे या स्त्रियाबद्दल हिंदु समाजाने मागणी केली असता त्याचा कबजा मिळाला नाही व हे प्रकरण अद्याप पोलिसात पडूनच आहे

भोपाळ येथे डिसेबर १९३३ त एका ब्राम्हण स्त्रीला मुसलमान बनविण्यात आले त्या स्त्रीस दयाराम नावाचा एक ११ वर्षांचा मुलगा होता तो आपला वडील भाऊ सुदरलाल याजपाशी रहात असे. त्यालाहि जबरीने मुसलमान करण्यात आलें सुदरलाल यानी मॅजिस्ट्रेटकडे दाद मागितली, अद्याप दाद मिळाली नाही

—केसरी ता २-३-३४

—ता. २ रोजी गाझीपूर येथे कालीच्या रथाची मिरवणूक निघाली असता मसलमानानी हल्ला करून रथ जाळून टाकला. दग्यांत एक इसम ठार व बरेच जखमी झाले. गांवात १४४ कलम लागू केलें आहे

—केसरी ता. ६-३-३४

—पंजाब विद्यापीठाच्या सेनेटची बैठक कांही दिवसांपूर्वी भरली असतां कांही सभासदांनी असा ठराव मांडला की, सिनेटमध्ये जितके हिंदी सभासद असतील त्यापैकी शें ५० जागा मुसलमानांना मिळतील, अशा रीतीने सेनेटची पुनर्घटना करावी मुसलमानांच्या मागोमाग शीखानीही आपले सभासद शे ३३ या प्रमाणात असावे अशी मागणी केली वरील ठराव नामजूर झाले ते ठराव नामजूर झाले म्हणून मुसलमान सभासद सेनेटमधून उठून गेले

—केसरी ता २७-३-३४

—बेळगाव ठळकवाडीनजीक ता ५ रोजी दोघां पठाणात मारामारी होऊन त्यापैकी एकास भयकर जखमा झाल्यामुळे दवाखान्यात पाठवावे लागले एका पठाणाच्या कुळास दुसऱ्याने कर्ज दिले म्हणून ही मारामारी झाली असे समजते

—केसरी ता १३-४-३४

—रामचोत्रा (मुलतान) येथे मुसलमानानी तेथील देवीच्या मदिराचा जबरीने कबजा घेतला आहे या देवीच्या मदिरात वैशाखीची मोठी यात्रा भरत असते या सबधात हिंदूनी सरकारकडे दाद मागितली आहे

—केसरी ता १७-४-३४

—श्रीनगर येथील भैरवाचे देऊळ काही हिंदू दुरुस्त करीत असता काही मुसलमानानी त्याच्यावर हल्ला केला सरकारी अधिकारी व पोलीस वेळेवर आल्याने दगा थाबला देवालयाची जागा मुसलमान व हिंदू याच्या समाईक मालकीची आहे असा पूर्वीचा निर्णय असल्याने मुसलमानाच्या समतीखेरीज दुरुस्ती करू नये असा मुसलमानांचा आग्रह आहे हिंदूलोक सदर प्रकरणाचा निकाल कोर्टामार्फत लावून घेणार आहेत

—केसरी ता ११-५-३४

—चपारण्य जिल्ह्यातील आखता या गावाहून नेपाळ, तराईकडे २५० गुरे चरावयास नेत असता एका खाटकाने ती पळवून आणण्याचा प्रयत्न केल्यामुळे हिदूचा मोठा जमाव जमला दगा थाववावा म्हणून पोलिसानी व काँग्रेसच्या पुढाऱ्यानी प्रयत्न केला पण तो निष्फळ ठरल्यामुळे पोलिसानी जमावावर गोळ्या झाडल्या गोळीबारांत बरेच लोक जखमी झाले आहेत

—केसरी ता १५-५-३४

—नौपरा (बंगाल) येथे ता १३ रोजी एका मुसलमानाने एका हिंदूस भोसकले तेव्हा उभय पक्षात दगा होऊन तीन मुसलमान ठार व उभयताचे २० इसम जखमी झाले आहेत या सबधात १०० हिंदु मुसलमान पकडले आहेत

—केसरी ता १८–५–३४

—कज्जर (शेखपुरा) येथे एका ख्रिस्ती इसमाच्या घरात लग्न समारभ चालला असता तो पाहण्यास काही मुसलमान व शीख जमले होते मिरवणूक पाहाण्याच्या धादलीत एका शीख मुलाचा धक्का लागून एका मुसलमानाची चिलीम फुटली, मुसलमानाची व शिखाची बाचाबाची होऊन मारामारी झाली दोन शीख अत्यवस्थ आहेत!

—केसरी ता २७–७–३४

—चन्न बसवेश्वराचा अवतार असल्याची बतावणी करणारा मुसलमान सिद्दीक व त्याचे अनुयायी याजवर धारवाड येथे खटला होऊन एक वर्षपर्यंत चागली वर्तणूक ठेवण्याबद्दल त्याजकडून जामीन घेण्यात आला

—केसरी ता २७–७–३४

—ता ३ रोजी गाझियाबाद येथील रस्त्याने हिंदूची एक बैलगाडी जात असता तिचा धक्का लागून मुसलमानाची एक खाट मोडली त्याबरोबर तेथे बसलेल्या मुसलमानानी गाडीवर हल्ला केला शेवटी त्याचे रूपातर दग्यात होऊन १५ लोक जखमी झाले

—केसरी ता ७–९–३४

—आग्रा येथे ता ३ रोजी एका मुसलमानाचा खून झालेला आढळल्यामुळे हिंदु मुसलमानाच्या दग्यास सुरुवात झाली दगलीत दोन माणसे ठार झाली शहरात ठिकठिकाणी पोलीस—पहारा बसविण्यात आला असून लष्करहि आणण्यात आले आहे

—केसरी ता ७–९–३४

—सयुक्त प्रातातील गरगाव येथे गाढवाची उत्तम पैदास व्हावी म्हणून एक वळू गाढव ठेविला आहे त्या गाढवाला 'अहमक' (म्हणजे मूर्ख) असें नाव तेथील पशुखात्यातील लोकानी ठेवले होतें त्या खात्याचे अधिकारी एक शीख गृहस्थ असल्यानें एका मुसलमानाने अशी भुमका उठविली की या शीख गृहस्थांनी मुसलमान समाजाचा अपमान करण्याकरिता त्या गाढवाला 'अहमद' (म्हणजे अत्यत स्तुत्य) असे नाव मुद्दाम दिले मुसलमानी पत्रानी लेख खरडून त्या शीख अधिकाऱ्याविरुद्ध काहूर माजविले त्याच वेळी एका मुसलमानास बिगर परवाना हत्यारे बाळगल्याच्या आरोपावरून दिल्ली येथे अटक झाली त्याने शीख अधिकाऱ्यावर हत्यारे चालविणार होतो असे कबूल केले शेवटी पजाब सरकारने एक पत्रक काढून खुलासा केला. त्या गाढवाचे नाव अहमद असे नसून अहमक असे ठेविले होते. आता ते बदलून बहादूर असे नाव दिले आहे असे जाहीर केले

—केसरी ता २८–९–३४

—मुबई येथे माधव बागेत दोन कबरी असलेल्या जागेत प्रवेश करण्यास सरकारी मनाई हुकूम असूनहि गुरुवारी इस्मायल तारमहमद नावाचा इसम हातात बावटा घेऊन तेथे गेला तेव्हा गर्दी झाली सदर इसमास पोलिसानी अटक केली आहे

—केसरी ता २–१०–३४

—त्रावणकोर सस्थानात वाद्ये वाजविण्यासबधी ख्रिस्ती व मुसलमान लोकात मारामारी होऊन चार ख्रिस्ती बरेच जखमी झाले आहेत

—केसरी ता ११–१२–३४

—बरेली येथील कॉलेजात हिंदू विद्यार्थी पुष्कळ असून मुसलमान थोडे आहेत दोन वर्षांपूर्वी कॉलेज समेलनाच्या वेळी मुसलमान विद्यार्थ्यांनी 'हिंदू विद्यार्थ्यांनी आपल्यास वाढू नये व हिंदु दुकानातून खाण्यापिण्याचे जिन्नस आणता उपयोगी नाही' असा आग्रह धरला त्या वर्षी हा हट्ट चालू न दिल्यामुळे ग्यादरिंग बद पडले पुढील वर्षी प्रिन्सिपालनी हा हट्ट पुरविण्याचे ठरविल्यावर ग्यादरिंगवर हिंदू विद्यार्थ्यांनी बहिष्कार घातला कॉलेजचा जिमखाना व युनियन यात अधिकाराच्या जागा दोन्ही समाजाच्या सभासदात एका प्रमाणात वाटावयाच्या, हिंदु व मुसलमान अध्यक्ष आळीपाळीने निवडावयाचे वगैरे व्यवस्था होतीच पण कार्यकारी मंडळांत

आम्हाला ठरीव प्रमाणांत सभासद पाहिजेत म्हणून मुसलमानानी मागणी केली. प्रिन्सिपालनी असेंब्लीत एक तृतीयाश जागा देतात म्हणून येथेहि त्यांना तितक्या जागा देण्याचे ठरविले!

डिसेबर महिन्यात ग्यार्दरिंगच्या वेळी शहाजहान नाटकात अवरगजेब हा पितृद्रोही दाखविला असल्याने गुडाना बोलावून ते बद करण्यचे ठरविले शेवटी ग्यार्दरिग रद्द झाले

—केसरी ता ११–१२–३४

—उज्जयिनीत अलीकडे २–३ वर्षांपासून अनधिकृत रीतीने व बेकायदेशीरपणाने मनोरे अथवा कबरी बाधण्याचे धोरण मुसलमानानी स्वीकारले आहे गोपाळ मदिराच्या समोर एक मनोरा बेकायदेशीरपणाने व टाऊन इम्प्रुव्हमेंटच्या धोरणाविरुद्ध उभारला. म्युनिसिपालटीने ओरड केली म्हणून भीति दाखविण्याचा सरकारने आव आणला. परतु ती खरी नाही असे पाहून मुसलमानानी चार मनोरे बाधिले आहेत

येथील अपग सेवाश्रमाला सरकारने जागा दिली, ही जागा मूळची म्युनिसिपालटीची अपग सेवाश्रमाच्या जागेजवळ एक लहानशी मशिद आहे. अपग सेवाश्रमाचे डॉ खोचे आपली हद्द आखण्यासाठी जाताच 'मशिदीवर हल्ला करता' म्हणून गुडानी गिल्ला केला. प्रकरण हातघाईवर येणार हे पाहून डॉ. खोचे व म्यु. इजिनियर परत गेले पुढे मुसलमानानी म्यु. च्या हद्दीत मशिदीच्या भिंतीपुढे दोन ओटे बाधले. म्यु अधिकाऱ्याने आगाऊ सूचना देऊन ते पाडण्याचा प्रयत्न केला. मुसलमानानी त्या ठिकाणी आसने ठोकली. अधिकाऱ्यानी काही आडकाठी केली नाही. नतर त्यानी पाडलेला भाग भरून काढला!

—केसरी ता. २५–१२–३४

—अहमदाबाद येथे गेल्या शनिवारी तेथील चन्द्रकात गिरणीत श्री नारायणराव हर्डीकर नांवाचे एक महाराष्ट्रीय नोकर सायकाळी गिरणी सुटल्यावर सायकलवरून घरी येत होते वाटेत गर्दीमध्ये एका मुसलमानाच्या पायाला त्याची सायकल लागली. श्री. हर्डीकर यानी रीतीप्रमाणे त्याची माफी मागितली. गर्दीत असे प्रकार नेहमी होत असल्याने औपचारिक माफी मागितल्याने काम भागतेहि परतु सदर मुसलमान व त्याचे तेथे असलेले १०–१२ मुसलमान सोबती याना तो प्रकार न पाहवून त्यानी शिवीगाळ करण्यास सुरवात केली व एकाने तर श्री हर्डीकर याजवर सुरी उपसली हा प्रसग पाहताच श्री हर्डीकर पायउतार होऊन मुसलमानाशी सामना देण्यास सिद्ध झाले, व दहाहि मुसलमानास धूळ चारून त्यानी सुरा हिसकावून दूर फेकून दिला ही गोष्ट एवढ्यावरच थावली नाही दुसरे दिवशी म्हणजे रविवारी श्री हर्डीकर नेहमीप्रमाणे कामावरून परत येत असता ५०–६० मुसलमान गुडानी श्री. हर्डीकर याजवर अकस्मात् हल्ला करून त्याच्या डोक्यावर व दडावर सुऱ्याचे वार केले शिवाय अगावरहि काठ्याचा मार दिला रक्तबबाळ स्थितीत ते घरी जाऊन पोहोचले व हल्ली अत्यवस्थ स्थितीत डॉ तळवलकर याच्या दवाखान्यात पडून आहेत —केसरी ता २–६–३३

—बहारचे मुसलमान पुढारी मौ मझरूल हक्क यानी हिदु मुसलमानाना उद्देशून एक विनतीपत्र प्रसिद्ध केले आहे त्यात ते हिदूना उपदेश करतात की कशाला तुम्ही मशिदीपुढे वाद्ये वाजविण्याचा आग्रह धरिता? दाखवा ना एवढा उदारपणा, मुसलमानासहि ते तसेच सागतात की, मशिदीपुढे वाद्ये वाजविली म्हणून तुमचे काय बिघडले? दाखवा ना एवढी सहिष्णुता!

—केसरी ता. २७–७–१९२६

—मुस्लीम लीगचे अधिवेशन दिल्ली येथे ता २९ रोजी खा ब शेख अबदुल कादर याचे अध्यक्षतेखाली सुरू झाले स्वागताध्यक्ष पीरजादा महमद हुसेन यानी हिदूच्या मागण्यास तोड देण्याकरिता मुसलमानानी आपले सरक्षण केले पाहिजे असे सागितले मशिदीपुढील वाद्याच्या प्रश्नाच्या बाबतीत अम्मलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्याकडे सर्वाधिकार सोपविण्याच्या सरकारी धोरणाचे त्यानी समर्थन केले. महात्मा गाधी यानी सागितल्याप्रमाणे कुरबानीच्या जनावरांची मिरव॰

णूक काढण्याचे रस्ते ठरविण्याचा प्रश्न हिंदूनी मुसलमानांच्या सौजन्यावर सोपविला असता तर वाद माजलाच नसता. पण महात्मा गाधींचा योग्य उपदेश हिदूनी ऐकला नाही म्हणून वाद माजला असेहि त्यानी सागितले ! डोमिनियन स्टेटस हे हिंदुस्थानचें राजकीय ध्येय त्यानी सागितले पण त्याच्या घटनेत कौन्सिलात व नोकऱ्यात मुसलमानाना प्रमाणशीर जागा देऊन त्या बरोबरच जेथे अप्रभावी अल्पमत असेल तेथेहि मुसलमानाचे एक प्रभावी प्रमाण ठरवावे अशी त्यानी मागणी केली

—केसरी ता ८–१–१९२७

दिल्ली येथे ता ३१ डिसेबर रोजी तबलीघ परिषद झाली बॅ अहमद अमीन यानी आपल्या भाषणात मुसलमानानी आपल्याला लागणाऱ्या सर्व वस्तू मुसलमानाकडूनच घ्याव्या व प्रत्येक मुसलमानाने आपल्या आयुष्यात दहा वर्षात कमीत कमी तीन हिंदू बाटवावेत असे प्रतिपादन केले इतर सर्व चळवळी बद करून मुसलमानानी तबलीघ चळवळ हाती घेऊन मुसलमानाची सख्या १५ कोटी करावी असा उपदेश करून हिंदुस्थानास स्वराज्य मिळेल तेव्हा त्याची सूत्रे मुसलमानाच्या हाती येतील असा आपला विश्वास प्रगट केला ! या कार्यासाठी फड गोळा करण्यात येऊन कित्येकानी दरसाल २०० रु देण्याचे कबूल केले —केसरी ता ४–१–२७

—निजामशाहीतील भोकरधन या गावी तेथील मुन्सीफ अजीजुद्दीन हे तेथील बळवतराव नावाच्या कारकुनाच्या घरी नेहमी जाऊन घरोबा दाखवीत असत बळवतरावाचे घरी त्याची गोदावरी नावाची तरुण मेव्हणी राहात असे तिच्यावर अजीजुद्दिनाने डोळा ठेवून तिला द्रव्याचे आमिष दाखवून पाहिले, पण गोदावरीने हे साफ नाकारले तेव्हा अजीजुद्दीनाने बळवतरावाना आपली इच्छा पूर्ण करण्याबद्दल आग्रह सुरू केला. पण त्यानी ती गोष्ट साफ नाकारली मुन्सिफाने त्यास सेगेदारीच्या जागेवरून नाझरच्या जागी चढविले तरीहि बळवतरावाने अजीजुद्दिनाच्या इच्छेस अनुकूलता दर्शविली नाही, तेव्हां मुन्सिफानें त्यास बडतर्फ केलें बळवंतरावाने असहाय्य स्थितीत अजीजुद्दिनाचे कामवासनेस आपल्या पोटासाठी मेव्हणीचा बळी देण्यास समति दिली तेव्हा आपल्या अब्रूचे रक्षण करणारा कोणीच नाही हे पाहून गोदावरीने विहिरीत उडी घेऊन जीव दिला. सध्या मुन्सीफसाहेबाची कमिशनमार्फत वरील आरोपाबद्दल व आणखी एक दोन आरोपांबद्दल चौकशी चालू आहे

—केसरी ता २२–२–१९२७

—महात्मा गाधी खामगावला गेले असता तेथील आर्यसमाजाच्या श्री सुखदेवजी या कार्यकर्त्यांनी त्याची गाठ घेतली, ती खामगावच्या युगातर पत्रात प्रसिद्ध झाली आहे त्यात महात्माजी म्हणतात "सघटन व शुद्धि याच्या बाबतीत मी साशक आहे. मला तर कोणीच बाटताना दिसत नाही मला शुद्धिसघटनेचा अर्थच कळत नाही मला ते नीट कळून पटल्याशिवाय मी ते हाती कसे घेणार व त्यात आपल्याला साहाय्य कसे देणार ?" —केसरी ता २२–२–१९२७

—रविवार ता २० रोजी सायकाळी मुबई येथे नागदेवीवरून ३०० शिखाची एक मिरवणूक चकला स्ट्रीटने मुसलमानाच्या मोहोल्यातून ग्रथसाहेब बरोबर घेऊन भजन करीत जात होती वाटेत कसाई मशिदीजवळ मिरवणूक येतांच मुसलमानानी वाद्ये बद करण्यास सागितले शीखानी मृदग बद ठेवला पण टाळ बद ठेवण्याचे नाकारले व भजनी मडळी तशीच पुढें गेली नतर काही वेळाने तीच भजनी मडळी परत येत असतां मुसलमानानी कसाई मशिदीजवळ त्यास पुन अडविले, आणि भजन बद करा म्हणून दरडाविले पण शिखानी ते न जुमानल्यामुळे दगा झाला मुसलमानाचा जमाव मोडत नाही हे पाहून रात्री १ वाजता मॅजिस्ट्रेटने गोळीबार करण्याचा हुकूम दिला, परतु त्याने उपयोग होत नाही असे पाहून पुन पुन गोळीबार करावा लागला. दगा पहाटे पाच वाजता मोडला दग्यात ८ इसमांस जखमा झाल्या. —केसरी ता. २२–२–२७

—सिंधप्रांतांत लारखाना येथें एका मुसलमान बाईस हिंदुसभेने शुद्ध करून घेतलें. बाईला तीन मुले होती ती बाईबरोबरच हिंदुधर्मांत जावयाची की मुसलमानी धर्मांत रहावयाची असा प्रश्न उद्भवून कोर्टामार्फत त्याचा निर्णय लावून घेण्याचे ठरले २९ तारखेस खटल्याचा निकाल होता या तारखेस सकाळी नऊ वाजल्यापासूनच ३००० मुसलमानानी कोर्टास गराडा घातला व मुले आमच्या ताब्यात द्या अशी त्यानी मॅजिस्ट्रेटपाशी मागणी केली पण मॅजिस्ट्रेट यानी जिकडे आई तिकडे मुले असा निकाल सागताच त्यानी दगा आरभला जो भेटेल त्या हिदूस चोपून काढीत व दिसेल ते दुकान लुटीत ते चालले ३ वाजता पोलिसाच्या तुकड्या येऊन त्यानी दगा मोडला दग्यात ४७ इसम जखमी होऊन ४ अत्यवस्थ आहेत एक इसम दवाखान्यात मेला

—केसरी ता ५–४–२७

—लाहोर येथे एका शीख स्त्रीची एका मुसलमानाने इज्जत घेतल्यावरून शिखानी खटला भरला. खटला ता ३ रोजी सुरू झाला तेथे उभय पक्षात तडजोड होण्याचे ठरले परतु प्रॉसिक्यूटिंग इन्स्पेक्टरला ही गोष्ट समत झाली नाही तेव्हा खटला पुढे चालविण्याचे ठरले सायकाळी शीख लोकाची सभा भरलेली होती सभा सुरू असताच डबी बाजारात दगा उद्भवला सभेच्या जागी ही वातमी येताच सुमारे २० शीख दग्याचे जागी गेले तेथे मुसलमानात व त्याच्यात तटा होऊन दोन मुसलमान मेले

ता ४ रोजी अनार्कली भागात दगा झाला मुसलमानानी जाणाऱ्या येणाऱ्या हिदूवर हल्ले केले. ता ३ रोजी झालेल्या दग्यात जे मुसलमान मेले त्याचे दफन करून परत येत असलेल्या मुसलमानानी ता ४ रोजी पुन दग्यास सुरवात केली लष्कर बोलावून त्याच्या मदतीने दगा थांबवावा लागला शहराला १४४ कलम लागू केले आहे. जखमी लोकांत ४९ हिदु, २७ शीख, व २३ मुसलमान आहेत —केसरी ता १०–५–१९२७

—बंगाल्यांतील सिलहट जिल्ह्यांतील एका गांवी फैझअल्ली नांवाच्या मुसलमानानें स्त्रियांच्या पातिव्रत्याचा भग करण्याचा धदा आरंभिला होता त्याने कैक स्त्रियाची अब्रू घेतली व कैक स्त्रियानी त्याच्या दहशतीने आपला गांवहि सोडला या गावात पवित्रा नांवाची एका गरीब गृहस्थाची सोळा वर्षांची बायको होती फैसअल्लीने तिला मौल्यवान पदार्थांची लालूच दाखवून पाहिली तरी ती वश होत नाही हे पाहून तो तिच्या खोपटात शिरला तरी तिने नाहीच म्हटले फैझअल्लीने झोपडीतून निघून जाताना तिला व तिच्या आईस जरब घातली की "सभाळा पवित्रा जर न ऐकेल तर तिच्या व तिच्या आईच्या अब्रूची होळीच झाली म्हणून समजा" पवित्रा घाबरली, पण तिच्या शेजारी राहणाऱ्या शशिमोहन डे नावाच्या १८ वर्षे वयाच्या तरुणाने तिचे म्हणणे ऐकून तिला अभय दिले. मध्याकाळ झाली, फैजअल्ली जबरीने घरात शिरला तो पापबुद्धीने पवित्रेच्या अगावर आपला हात टाकणार तोच मागच्या मागे शशिमोहन डेने पकडला शशिमोहन व त्याचे ३ साथीदार यानी लाठी चालवून त्यास बेदम मारले व त्यातच फैझअल्ली प्राणास मुकला शशिमोहन व त्याचे साथीदार यावर खटला भरण्यात आला परतु त्यास निर्दोषी सोडण्यात आले —केसरी ता १९–७–२७

—सिधमध्ये नवाबशहा जिल्ह्यात भीरिया तालुक्यात जलबानी गावचा धनराज नावाचा हिंदु मुलगा ११ जानेवारी १९२५ च्या सुमारास शाळेतून घरी आला नाही सी आय डी च्या अधिकाऱ्याच्या माहितीप्रमाणे धनराज यास मुसलमानी पोषाख चढवून कराची जिल्ह्यातील खाडा या पकडून आणलेल्या हिदु मुलास लपवून ठेवण्याच्या अड्याच्या गावी नेण्यात आले धनराज यास कांही दिवसानी इस्लामी धर्माची दीक्षा दिली खाडाच्या हिदूस धनराज दिसला पण त्यांनी पोलिसात वर्दी देऊन पोलीस वॉरट घेऊन येण्याच्या आत तेथील मौलवीनी धनराजास कराचीस रवाना केले. गुप्त पोलिसांनी शोध शोध शोधलें पण त्याचा पत्ता लागला नाही.

धनराज आज असे सागतो की त्यास इस्लाम धर्माचे शिक्षण देण्याकरिता भावलपूर संस्थानातील एका खेड्यात ठेवले होते. पुढे 'अलवाहिद' या पत्रात जाहीर करण्यात आले की धनराज कचेरीत अचानक प्रकट झाला. धनराजाचे नाव उघडकीस आलेले ऐकून त्याच्या बापाने लावलेला दावा कराची येथील ज्युडिशियल कमिशनरच्या कोर्टात चालू आहे त्याचे म्हणणे धनराज हा खुषीने मुसलमान झालेला नाही कराचीच्या खिलाफतवाल्यानी स्थानिक सिव्हिल सर्जनपुढे धनराजास हजर करून तो १९ वर्षांचा म्हणजे वयात आला असल्याचा दाखला आधीच घेऊन ठेवला होता आज धनराजाचा मुसलमानानी बडेजाव माडला आहे धनराजास सध्या केवढा मान मिळत आहे निमाज पढताना धनराज उभा राहतो व त्याचे शिष्यत्व पत्करून पीर, जमीनदार, मौलवी व मौलाना त्याच्या माठीमागे बसतात त्याच्या हाताचे व झग्याचे ते चुबन घेतात व भर बाजारातून व हमरस्त्यावरून त्यास मिरवीत नेतात

—केसरी ता १८–१०–२७

—पुणे येथे सायपर्स–मायनर्समध्ये खानसाम्याचे काम करीत असलेल्या अल्लारख पिराना नावाच्या मुसलमानाने काही दिवसापूर्वी एका हिंदु स्त्रीला बाटवून तिच्याशी निका लावला नतर गेल्या सप्टेंबरमध्ये सदर स्त्रीने आपल्या एका हिंदु आप्ताच्या घरी जाऊन तेथून एका हिंदू मुलीला काही लालुचीने आपल्या घरी आणले, व तिला मुसलमानी पद्धतीचा पोषाख देऊन अल्लारख अहमदखान नावाच्या इसमाबरोबर तिची सियालकोटला रवानगी करून दिली. मुलीला जरी मुसलमानी वेष दिला होता तरी तिच्या कपाळावर कुकुमादि हिंदु चिन्हे तशीच कायम होती हे पाहून रेल्वेतील एका फिरत्या हिंदु तिकिट–इन्स्पेक्टरला सशय येऊन त्याने तिची सर्व हकीकत समजून घेतली. त्यावरून अहमदखानास अटक करण्यात आली व पुढे चौकशी होऊन तो व त्याचे पुण्याचे साथीदार अलारख पिराना व झेनाबाई याजवर रीतसर खटला होऊन येथील सेशन जज्ज मि वाइल्ड यानी अपराधी मुसलमानास प्रत्येकी दोन वर्षे सक्त मजुरीची शिक्षा ठोठावली —केसरी ता. ५–१–२६

—हैदराबादच्या निजाम साहेबानी हैदराबाद शहर धरून आपल्या राज्यातील सोळा जिल्ह्यात बाटविण्याची चळवळ करण्यासाठी दरसाल १३ लक्ष रुपये खर्च करण्याचे ठरविले असून गेली काही वर्षे याप्रमाणे खर्च चालला आहे या कामासाठी त्यानी एक खातेच काढले असून त्या कामी सहाशेवर मुसलमान नोकर आहेत व त्याना सुमारे ८० हिंदूहि मदत करीत आहेत भ्रष्टीकरणाप्रीत्यर्थ दरसाल गुलबर्गा ७५ हजार, औरगाबाद ७०, वारगल ६५, मेदक ५५, हैदराबाद शहर ६० हजार व इतर जिल्ह्यात त्या त्या मानाने कमजास्त प्रमाणात रकमा तोडून दिल्या आहेत, असे समजते

—केसरी ता ५–१–२६

—गेल्या नाताळात उमरावती येथे ब्राह्मणेतर पक्षाने एकाच परिषदेला चार दिवस चार नावे देऊन चार निरनिराळे अध्यक्ष करून तिच्या चार परिषदा भरविल्या. उमरावतीच्या ब्राह्मणेतरानी मडप भरण्याकरिता ख्रिश्चन, मुसलमान पार्शी इत्यादि वर्गांची भरती करण्याचे योजिले. ख्रिश्चन व पार्शी कोणी आलेच नाहीत पण एक मुसलमान गृहस्थ स्वागत सभेचे उपाध्यक्ष व दुसरे मुसलमान गृहस्थ सेक्रेटरी करण्यात आले स्वागतसभेचे अध्यक्ष रा ब नायडू यानी आपल्या भाषणात असेहि सागितले की वऱ्हाडात हिंदु-मुसलमानाची तेढ उत्पन्न झाली ती सघटनेची चळवळ करणाऱ्या राजकारणी ब्राह्मणाच्या प्रयत्नामुळे झाली. कोल्हापूरच्या छत्रपतीनी सामाजिक परिषदेच्या अध्यक्षस्थानावरून केलेल्या भाषणात, पूर्वीच्या काही रजपूत क्षत्रियानी मुसलमानाशी बेटीव्यवहार केला या त्याच्या उदारपणाचा गौरवपूर्ण उल्लेख केला

—केसरी ता. ५–१–२६.

—गेल्या नाताळात अलीगडला मुस्लीम लीगची

परिषद भरली होती, त्या परिषदेचे अध्यक्ष सर अबदुल रहीम हे होते एका वर्षांत एक कोटी हिंदूना इस्लामी दीक्षा देऊ असा चग बाधून हसन निजामीची चळवळ सुरू झाल्यानतरच, हिंदू लोकांनी शुद्धि-सघटन कार्य विशेष जोराने सुरू केलें, हा प्रकार सर्वत्रास माहीत असूनहि अध्यक्ष सर अबदुल रहीम यानी 'शद्धि-सघटनेमुळें मुसलमानाना आत्मसरक्षणार्थ चळवळ करावी लागत आहे इस्लामी धर्मांतच जन्मलेल्या लक्षावधी मुसलमानाना हिंदु करून घेण्यात येत आहे स्पेन देशातून मसलमानाना जसे हाकून देण्यात आले आहे तसे हिंदुस्थानातूनहि त्याना घालवून देण्याचा हिंदूचा बेत आहे' इत्यादि विधाने केली! मुबईचे बी एफ भरूचा यानी त्यासबधाने सर साहेबाना साधार माहिती प्रसिद्ध करण्याविषयी आव्हान केले आहे परतु त्यानी अद्याप त्यास काहीच उत्तर दिलेले नाही

—केसरी ता १९-१-२६

—श्री न चि केळकर याचे अध्यक्षतेखाली कानपूर येथे सगीत परिषद झाली. भाषणात सगीत कलेचे मनोहारित्व व तिचे व्यावहारिक उपयोग यासबधी त्यानी विवेचन केले लाहोरच्या ऑब्झर्व्हर या मुसलमानी पत्रात या भाषणावर टीका आली असून त्यात असे लिहिले आहे की, "आर्यसमाजिस्ट व हिंदुसभाचे प्रचारक सगीताने मुस्लीम द्वेषाच्या भावना कशा उत्पन्न करतात याची आम्हा पजाबी मुसलमानाना चागली माहिती आहे

—केसरी ता २-२-१९२६

—अक्कलकोट येथे दरसाल माघी पौर्णिमेपासून श्रीअक्कलकोटस्वामीच्या पुण्यतिथीचा उत्सव मोठ्या थाटाने व समारभाने होत असून स्वामीच्या पालखीची मिरवणूकहि काढण्यात येते. स्वामीचा शिष्य सप्रदाय महाराष्ट्रात मोठा असल्याने अनेक ठिकाणाहून भक्तजन उत्सवासाठी गोळा होतात यदा नेहमीप्रमाणे उत्सव सुरू झाला व माघ व १ रोजी पालखीची मिरवणूक निघाली. परतु तेथील मुसलमानांच्या मिरवणुकीच्या रस्त्यावर असलेल्या मशिदीसमोर वाद्यें वाजविण्यास मनाई करावी, अशा तक्रारी अक्कलकोटच्या रीजट राणीसाहेब याजकडे गेल्या राणीसाहेबानी दरसालच्या वहिवाटीकडे दुर्लक्ष करून मशीदीसमोर वाद्ये वाजविण्यास यदा मनाई केली! हिंदू लोकानी आपले म्हणणे राणीसाहेबाच्या कानावर घातले पण त्याचा उपयोग न झाल्याने हिंदु समाजाने यदा मिरवणूकच काढण्याचे बद केले —केसरी ता २-२-१९२६

—अफगाणिस्थानचे अमीर नुकतेच आपल्या देशात दौऱ्यावर हिंडत असता कदाहार येथे गेले होते तेथील अधिकाऱ्यानी राज्यव्यवस्थेसबधी काही सुधारणा सुचविण्याऐवजी धर्माविरुद्ध आगळीक करणाऱ्या मनुष्यास ठार मारण्याची परवानगी व जे हिंदु मुसलमान होतील त्यास बक्षिसे देण्याची परवानगी मागितली परतु अमीरसाहेबानी "पैशासाठी कोणी इस्लामी धर्मांत येत असल्यास तो मनुष्य आपल्या धर्मांत घेऊच नये, व इस्लामी धर्माची तत्त्वे मान्य होऊन कोणी त्या धर्माचा स्वीकार करील तर त्याला बक्षिसाचे आमिष दाखविण्याचे काही एक कारण नाही' असे कदाहारचे अधिकारी नायब-उल-हुकुमा यास स्पष्ट बजावले —केसरी ता २-२-२६

—नेज्दचा वहाबी पुढारी इब्नसौद याने मक्का, मदीना व जेद्दा हे सर्व प्रात जिकून आपल्या ताब्यात घेतले या वहाबी बहाद्दराला मृताच्या थडग्याविषयी आणि मक्केतील काबाच्या मदिराविषयी यत्किंचितहि आदर वाटत नसून असली मदिरे व थडगी समूळ खणून काढून उध्वस्त करण्यात बिलकूल पाप नाही असे त्याचे मत आहे त्यामुळेच मक्केवर आणि मदिनेवर चढाई करून जाताना त्या मदिरावर व थडग्यावर गोळीबार झाला तरी त्याची दिक्कत त्यास वाटली नाही. हिंदी खिलाफतवाल्यानी तर पूर्वीच्या मक्केच्या शेरीफास सोडून इब्नसौद याचीच सत्ता अरबस्तानावर चालावी असे मत स्वीकारले. त्यानी वस्तुस्थिति पहाण्यासाठी एक शिष्टमडळ पाठविले व त्याने इब्नसौदची भेट घेऊन अखिल

मुसलमानांची परिषद भरविण्यास विनति केली. पण ती त्याने झिडकारली व थडगी उकरण्यात मला काहीही पाप वाटत नाही असे स्वच्छ सागितले महमद पैगबराच्या थडग्यावरील घुमटाला दोन गोळ्या लागल्याचेहि या शिष्टमडळाने समक्ष पाहिले —केसरी ता १६-२-२६

—इब्राहिम युसफ यानी "वैदिक इस्लाम" नावाचे एक पुस्तक छापले आहे त्यावर आगाखानाचे छायाचित्र छापून त्यावर 'कलियुगातील श्रीकृष्णावतार' व 'हिंदु-मुस्लीम ऐक्याचे प्रस्थापक' असे शब्द घातले आहेत व खाली "यदा यदाहि धर्मस्य" हा श्लोक व बायबल आणि कुराण यातील उतारे छापले आहेत पुस्तकात आगाखान हे कृष्णावतार आहेत असे सागून "सर्व धर्मान् परित्यज्य" हा श्लोक त्याचे तोडात घातला आहे पीर गाजीउद्दीन याच्या "बुद्ध अवतार" या पुस्तकात अरबस्थानातील मूर्तझा अल्ली हा दहावा अवतार असून त्याने इस्मायल धर्मप्रचार केला असे सागितले आहे

"मुख्य दहा अवतार" या सय्यद इमामशहा याच्या पुस्तकात अल्ली हा दहावा अवतार असे सागितले आहे. ना. आगाखान हे अल्लीचेपासून ४८ वे पुरुष होत असेहि लिहिले आहे याशिवाय "निष्कलकी गीता" "कृष्ण वाणी" 'सत्पथशास्त्र' इ पुस्तके इस्मायली पथामार्फत निघालेली आहेत आगाखान हे शिया किवा सुनी पथाचे नसून 'इस्मायली' नावाच्या शियामधील एका पोटपथाचे मुसलमान आहेत वरील प्रमाणे आगाखानी धर्मप्रसारक पुस्तकाची माहिती देऊन लाला लजपतराय यानी आपल्या पीपल पत्रात लेख लिहून, "या सर्व प्रचारावर आगाखानाचा विश्वास आहे काय ?" असे विचारले आहे —केसरी ता २-३-२६

* * *

## मशिदीवरून तंटे

—शहापूर (जि. बेळगाव) येथे ता २४ रोजी तेथील गिंडे घराण्यातील लोकांनी एका साधच्या पुण्यतिथीनिमित्त दरसालप्रमाणे, सायंकाळी दिंडी काढली.ती नाक्याजवळील मशिदीपाशी आल्यावर मुसलमानानी वाद्ये वाजविण्यास प्रतिबध केला. दिंडी खडेबाजारातून न्यावी की दुसरीकडन न्यावी याबाबत दिडीवाल्यात विचार सुरू झाला दिडी तशीच पुढे गेली मुसलमानानी प्रतिबध केला मारामारी झाली पुढे जोशीगल्लीच्या नाक्यावर रात्री ११-१२च्या सुमारास हिंदु व मुसलमानात मारामारीस सुरवात झाली बेळगावहून शहापुरास काही मुसलमान आले होते पोलिसानी दगा मोडून शातता प्रस्थापित केली आहे १४४ कलम लावण्यात आले आहे —केसरी ता २९-६-३४

—सागली दरबारने शहापूर येथे मशिदीपुढे कर्कश वाद्ये वाजवण्यास मनाई केली आहे मजूळ वाद्ये वाजविण्यासहि आगाऊ परवानगी काढावी लागेल यामुळे तेथील मुसलमान चढेल बनून १५ दिवसात हिंदूनी मुसलमान झाले पाहिजे नाही तर खून करू, अशी धमकीपत्रके शहापुरात डकविण्यात आली आहेत ! —केसरी ता २४-७-३४

—ता. ४ रोजी कोल्हापुरास आषाढी यात्रेनिमित्त हिंदूची मिरवणूक एका मशिदीजवळ आली असता तेथे असणाऱ्या एका खाटकाने हिंदू लोकास शिव्या देण्यास सुरवात केली, तेव्हा हिंदू लोक चिडन त्यानी खाटकाला चागला चोप दिला. पुढे पोलिसानी शातता स्थापन केली —केसरी ता ७-८-३४

—कॉन्स्टटाईन येथील एका मशिदीत एक ज्यू शिरल्यामुळे ता. ६ रोजी मुसलमान व ज्यू याच्यामध्ये मारामारी होऊन उभय पक्षी २ इसम ठार व २० जखमी झाले मारामारीत शस्त्रास्त्राचाहि सर्वांनी उपयोग केला. मुसलमानानी कित्येक ज्यू लोकाच्या घराना आगी लावून लुटालूट केली. —केसरी ता १०-८-३४

—कलकत्त्यापासून २० मैलावर असलेल्या बराकपूर येथील तागाच्या गिरणीच्या जवळील मशिदीवरून ता २ रोजी एक हिंदु प्रेत वाजत गाजत

जात असता काही मुसलमानानी त्याला अटकाव करून त्यावर दगडफेक केली २८ इसमाना पकडण्यात आले प्रेतयात्रा तशीच पुढे गेली
—केसरी ता ७–९–३४

—क्विलन (त्रावणकोर) यथे गोकुळाष्टमीच्या दिवशी हिंदूनी एक मिरवणूक काढली होती ती मिरवणूक एका मशिदीवरून जात असता काही मसलमानानी रथावर दगडफेक केली दगा होऊन परिस्थिति आटोक्याबाहेर गेली शेवटी पोलिसानी दगेखोरावर गोळीबार केला
—केसरी ता १४–९–३४

—कासूर (पजाब) येथे पालराम नावाच्या हिंदूने नमाज पढण्याबद्दल काही उद्‌गार एका पीर महमद नावाच्या मुसलमानाजवळ ता १६ मार्च १९३३ रोजी काढले त्याबद्दल पालाराम याजवर खटला होऊन सहा महिने स म व १५० रु दड झाला होता परतु महमद सिद्दीक नावाच्या मुसलमान तरुणाची तेवढ्याने तृप्ति न होऊन त्याने ता १६ डिसेबर १९३४ रोजी पालाराम यास ठार केले त्याबद्दल महमद सिद्दीक याजवर खटला होऊन त्यास फाशीची शिक्षा देण्यात आली
—केसरी ता ११–१२–३४

—महमद पैगबराचे नाव एका फोटोखाली लिहिल्याकारणाने आपल्या धर्मभावना दुखविल्या म्हणन मुबईस फजली अहमद महमद नावाच्या मुसलमानाने शभू नारायण तिवारी नावाच्या इसमास ठार केले —केसरी ता २-४-३५

—बन्नू आबाखेल येथील एका हिंदु शाळा मास्तराला २ मसलमानानी गोळी घालन ठार मारले हिंदूनी सभा भरवून निषेध केला व सदर गुन्हेगाराना कडक शिक्षा करावी असा सरकारला अर्ज केला —केसरी ता २५–६–३५

—एप्रिल महिन्याच्या २४ तारखेस मुलतान शहरात एका हिंदु व्यापाऱ्याचा खून झाला त्यानतर लागोपाठ तीन हिंदूची प्रेते सापडली त्यानतर एका अडीच वर्षे वयाच्या हिंदु मुलाचा अमानुष रीतीने खून केला गेल्याचे आढळले या खुनाचा पोलिसानाहि शोध लागत नाही हिंदूनी आपला राग व्यक्त करण्याकरिता गेला आठवडाभर हरताळ पाळला आहे सरकारने नेहमीच्या पद्धतीस अनुसरून लाठी–काठी घेण्यास बदी, सभाना मज्जाव वगैरे ठराविक उपायाचा अवलब केला आहे —केसरी ता १०–५–३५

—गोकुळ अष्टमीच्या दिवशी हैदराबाद नजीकच्या सुप्रसिद्ध शिकदराबाद शहरी हिंदूनी सालाबादप्रमाणे देवाच्या रथाची मिरवणूक काढण्याचे ठरविले दरसालच्या मिरवणुकीचा रस्ता लहान असल्यामुळे एका मोठ्या सार्वजनिक रस्त्यावरून मिरवणूक नेण्याचे ठरविले 'त्या रस्त्यावर आमची जुम्मा मशीद आहे त्या रस्त्यावरून मिरवणूक जाऊ देणार नाही', म्हणून मुसलमान गुडानी दगा निर्माण केला मिरवणूक मशिदीजवळ आल्यावर मुसलमान एका रागेत जमाव करून रस्त्यावर उभे राहिले व रस्ता अडविला हिंदूनी त्याच रस्त्याने जाण्याचे ठरविले मॅजिस्ट्रेट येऊन त्याने तडजोडीस सुरवात केली व मिरवणूक एका मशिदीमागच्या गल्लीतून नेण्यास सागितले हिंदूनी रथ तेथेच ठेवला मॅजिस्ट्रेटने पोलिसाकडून रात्री देवळाशी रथ आणन पोचविला दुसरे दिवशी हिंदूनी हरताळ पाडला ता २४ ला पोलिस बदोबस्त असताहि दगा उसळला व अनावर झाला हिंदुमुसलमानाचे थवेच्या थवे आपापल्या जातीना मदत करण्यास धावून आले हैदराबाद सस्थानातील मुसलमान गुड धावून आले तीन दिवस दगा चालू होता तीन दिवसाच्या दग्यात ११० जखमी झाले १–२ मृत्यु पावले पोलिसानी एका मशिदीवर छापा घालून तेथे साठविलेल्या लाठ्या काठ्या जप्त केल्या —केसरी ता ३०–८–३५

—रावळपिडी येथील काश्मीर मोटार स्टॅंड जवळ एका मुसलमान ड्रायव्हरने एका ब्राम्हण मुलास सुरा खुपसून ठार केले या प्रकारामुळे गावातील हिंदु समाजात बरीच खळबळ उडाली आहे —केसरी ता १०–९–३५

—छोटा नागपूर भागातील वन्य जातीना बाटविण्याचा सपाटा ख्रिश्चन मिशनऱ्यानी चाल

विल्यामुळे त्याला आळा घालण्यास हिंदु महासभा व आर्यसमाज या सस्था पुढे झाल्या बिहार सरकारने हिदु सभेचे अध्यक्ष रे. उत्तम याना भाषणबदी केली आठ हिंदु पुढाऱ्याची नावे बिहार सरकारने जिल्हाधिकाऱ्याना कळवून, त्याच्यावर नजर ठेवण्यास सागणारे गुप्त पत्रक बिहार सरकारने काढले होते, असे मि रसेल यानी बिहार सरकारतर्फे सागितले ख्रिश्चन झालेल्या वन्य जातीना शुद्ध करून घेण्याचा प्रयत्न हिदु-धर्म-प्रचारक करतात आणि त्यामुळे जातिविषयक व धर्म–विषयक मत्सर व असतोष होण्याचा सभव आहे, म्हणून हिदुधर्म प्रचारकावर नजर ठेवण्यास सागितले असे मि रसेल यानी सागितले

—केसरी ता १३–९–३५

—कमतगी (तालुके हुनगुद, जिल्हा विजापूर) येथे हिदु मुसलमानामध्ये १४ वर्षांपूर्वी नमाजाचे वेळेशिवाय बाकीचे वेळी मशिदीवरून वाद्ये वाजत जाणेबद्दल हरकत नाहीं असा करार झाला होता. व याप्रमाणें आजपर्यंत वहिवाट चालत आली आहे. २ महिन्यापूर्वी देवांग स्वामीची मिरवणूक मशिदीवरून जाण्यास मुसलमानानी हरकत घेतली. मिरवणूक पार पडली. परतु दुसरेच दिवशी मुलाच्या तट्यावरून त्याचे रूपातर हिंदुमुसलमानाच्या मारामारीत झाले. दोनहि जातीच्या ३० लोकावर खटले होऊन ३ मुसलमान व ७ हिदूस शिक्षा झाली. श्रावणमासी प्रत्येक सोमवारी हुचा पहेनावर यांच्या पालखीची मिरवणूक तीन सोमवारी मशिदीवरून वाजत गाजत पार पडली चौथ्या सोमवारी मिरवणुकीबरोबर ५०० पर्यंत समुदाय होता. पोलीस बदोबस्त होता. कमतगीच्या लोकांनी सघटित रूपाने मिरवणक पार पाडण्याचे ठरविल्याने मुसलमानाकडून अडथळाच झाला नाही.

—केसरी ता. १७–९–३५

# हिंदु स्त्रिया व मुलें यांची पळवापळव



हिंदु स्त्रियांना व विशेषतः लग्न झालेल्या स्त्रियांना पळवून नेण्यांत कांहीं परमार्थ आहे असेंच मुसलमान गुंड समजतात. असल्या एका गुन्ह्याच्या पोटांत जुलूम, जबरदस्ती, अटक, कोंडमारा हीं सगळीं पापें येतात व गुंड लोक तीं सर्व करतात. त्यांना परमार्थ काय लाभणार असेल तो त्यांना इहलोकीं अर्थातच कळण्यासारखा नाहीं पण इहलोकीं कळण्यासारख्या गोष्टी मात्र त्यांचा मोह अनिवार बनवितात हेंच खरें. स्त्रीस पळविल्यानें तिचा आपल्याशीं निक्का लावितां येतो; नाहीं तर कोठें तरी तिचा विक्रय करून चार चवल बनविता येतात हें त्यास माहीत असतें. तसेंच मुलांचाही विक्रा करितां येतो हेहि त्यांस कळतें. हे जे गुंड असतात त्यांना आपल्याला ही स्त्रिया पळविण्याची इच्छा कां व्हावी याचीं कारणें जर कळलीं तर मुसलमान समाजांतील श्रीमंतांना व प्रतिष्ठितांना खरोखरच जाच उत्पन्न होईल. काफराची स्त्री पळविणें हें पुण्य असलें तरी स्त्री पळविण्याची इच्छा उत्पन्न होणें याच्या मुळाशीं दुसरी एक अत्यंत घातक अशी सामाजिक पद्धति मुसलमान समाजांत वागते ती आहे. कोणीही तालेवार व प्रतिष्ठित मुसलमान चार चार बायका करणें यांत धार्मिक प्रतिष्ठा मानतो. वास्तविक पहातां महंमद पैगंबरानें "निदान चार बायकांवर तरी थांबा" असा उपदेश, लुटून आणलेल्या स्त्रियांचीं खिल्लारे जवळ बाळगणाऱ्या रानटी अरबांना केला; पण जी केवळ नाइलाजानें त्यानें सवलत दिली होती तिचा उपयोग हक्कासारखा होऊं लागला. याचा परिणाम मुसलमानी समाजावर असा झाला आहे कीं कांहींना पुष्कळ बायका असाव्या आणि कांहींना मुळींच नसाव्या. प्रतिष्ठितांचें बहुपत्नीत्व या गुंडांना गुंड बनवितें; कारण उभ्या जन्मांत त्यांना लग्नाचा संस्कारच होत नाहीं, म्हणून या गुंडांनीं पहिल्यानें आपल्याच समाजावर रोख धरला पाहिजे व एक पुरुष, एक स्त्री; एक पुरुष, एक स्त्री; अशीं कुटुंबें करण्याचा आग्रह धरिला पाहिजे. त्यांच्यांतील सुधारकांनीं बहुपत्नीत्वविच्छेदाचा कायदा सरकारांतून मुद्दाम मागून घ्यावा. हिंदु धर्मांतील सुधारणा घडवून आणतांना मुसलमान नामदारांचीहि मतें घ्यावयास हरकत नाहीं असें म्हणणाऱ्या हिंदु पुढाऱ्यांनीं आपल्या मुसलमान मित्रांना वरील आग्रह जरूर करावा! दरम्यान सरकारानें स्त्रिया-मुलांना पळविणारांना भर चौकांत फटके मारण्याच्या शिक्षा रूढ कराव्या; मग ते पळविणारे कोणत्याही धर्माचे असोत.

—सिमला येथील एका हिंदु मुलीस पळविल्याच्या आरोपावरून दोघा मुसलमान परिटाना पोलिसानी ता २८–५ रोजी अटक केली

—केसरी ता १–६–३४

—रावळपिडी येथील एका शाळेतील हिंदु मुलीस काही गुडानी ता. २९ रोजी पळवून नेल्यामुळे शहरात बरीच खळबळ उडाली आहे. पोलीस तपास चालू आहे

—केसरी ता ५-६-३४

—सिमला येथे काही महिन्यापूर्वी मुसलमान गुडानी रामदेवी नावाच्या स्त्रीला पळवून तिच्यावर बलात्कार केला हे उघडकीस येऊन त्याच्यावर खटला भरण्यात आला खटल्याच्या निकालात अबदुल गहानी यास रामदेवीला पळविल्याच्या आरोपावरून ७ वर्षे काळे पाणी व २०० रुपये दड झाला. अबदुल गाफर यास पळविल्याच्या आरोपावरून ७ वर्षे काळे पाणी, २०० रुपये दड व बलात्कार केल्याच्या आरोपावरून ७ वर्षे काळे पाणी व २०० रु दड झाला आणखी दोन आरोपीना पळवून नेणे व कोडून ठेवणे या आरोपावरून अनुक्रमे ७ वर्षे काळे पाणी व २०० रु दड व ५ वर्षे कैद व १००० रु दड अशा शिक्षा सागितल्या —केसरी ता १०–८–३४

—ता २४ रोजी इदूर येथे दुपारी भर रस्त्यात एक मुलगी शाळेत जात असता एका मुसलमानाने तिला जबरदस्तीने आवळले सदर इसमास मागाहून अटक करण्यात आली असल्याचे समजते

—केसरी ता. २–१०–३४

—नोखाली (बगाल) जवळच्या एका खेड्यात कुमुदिनी नावाची एक अविवाहित तरुणी आपल्या मातापित्यासह राहात असे एके दिवशी तिचे वडील परठिकाणी गेले असे पाहून मध्यरात्रीच्या सुमारास तिच्या झोपडीत ३ मुसलमान गुड शिरले गुडानी प्रथम तिच्या आईवर हल्ला केला, परंतु कुमुदिनी तिच्या ओरडण्याने जागी झालेली पाहतांच गुडानी तिजवर हल्ला करून तिला उचलून शेजारील शेताकडे चालविली. तिच्या ओरडण्यानें लोक जमा झाले हे पाहतांच गुड पळून गेले. त्यांच्यावर खटला होऊन त्यांना प्रत्येकी सहा वर्षांची स. म. ची शिक्षा झाली. ते गुड कुमुदिनीच्या घराशेजारीच राहात होते.

—केसरी ता १६–११–३४

—बादिन तालुक्यांतील (हैदराबाद–सिंध) परि–जो–गॉथ या खेड्यातील एक हिंदु, त्याची स्त्री व एक पधरा वर्षांची व दुसरी एक नऊ वर्षांची मुलगी इतक्याना एक मुसलमान जमीनदार औषधोपचारासाठी म्हणून घेऊन कराचीस आला व तेथे त्याना मुसलमान बनविले नतर त्या सर्वांना घेऊन तो आपल्या इनामगावी गेला व तेथे त्या हिंदु स्त्रीस हातापायात बेड्या ठोकून एका खोलीत कोडून ठेविले व तिजवर अत्याचार केले आणि जमिनदाराच्या भावाशी निका लावण्याचे तिने मान्य केले तेव्हा तिला मुक्त केले ती पळून आपल्या गावी गेली जमीनदारास हे कळताच तो पुष्कळ लोक घेऊन हत्यारानिशी त्या स्त्रीच्या गावी गेला. त्यानी त्या गावास दोन दिवस वेढा दिला. हिंदू जमीनदाराची लॉरी ही पोलिसाचीच लॉरी असे समजून गुड पळाले. हिंदु जमिनदाराने त्या स्त्रीस आपल्या गावी नेले तेव्हा गुडानी हिंदु जमिनदाराचा गोठा जाळला व त्याच्या पहारेकऱ्यास मुसलमानानी जखमी केले पोलिसानी पुष्कळ मुसलमानास अटक केली आहे दुसऱ्या दोन मुलीचीहि त्यानी सुटका केली —केसरी ता. १६–११–३४

—बेळगाव येथे थोड्या दिवसापूर्वी यकुबाई नावाची डोबारीण स्त्री काही कामासाठी परगावी गेली असता तिची सून बायजा ही नित्याप्रमाणें भिक्षा मागत असता तेथील खंजीर गल्लीत गेली तेथें ती फिरत असता कांही मुसलमानांनी घरात नेऊन तिच्याशी जबरीने निका लावला असे म्हणतात. तिचा नवरा प्राणभयाने खजीर गल्लीतील त्या घरात गेला नाही. ती बाई जो भेटेल त्यास आपली करुण कहाणी सागून दाद मागे. रा. सा. गिलगिंची हुजूर डे. कलेक्टर यानी तिला चौकशी करण्याचे आश्वासन दिलें आहे. —केसरी ता. १६–११–३४

—पुणें लष्करांत राहणारी सावित्रीबाई नावाची विवाहित तरुण स्त्री घरांत एकटी आहे असे पाहून शाबासखान नांवाचा मुसलमान दोन गुंड घेऊन तिच्या घरी गेला व तिला ठार मारण्याचे भय घालून मोटारीतून पळविले व मुंबईस एका वेश्यागृहांत ठेविले पोलिसानी मुलीचा पत्ता लावला, परंतु गुंड शाबासखान मात्र पळाला

—केसरी ता २५–१२–३४

—खोपोली फाटघावर ता. १० रोजी तेथील पोलीस अमलदाराने एका धनगराचे बाईस मुसलमानाच्या हातून सोडविले. सदर बाईस मोटारीतून पुण्याहून पळवून आणले होते असे समजते. —केसरी ता १८–१–३५

—पंढरपूर येथील श्रीपांडुरंगाच्या देवालया-नजीक गेल्या आठवड्यात भर दिवसा एका हिंदू स्त्रीस एका मुसलमान गुंडाने ओढून नेण्याचा प्रयत्न केल्यामुळे रस्त्यावर बरीच गर्दी जमली जमावांतील एका ब्राह्मण तरुणाने सदर स्त्रीस त्याच्या हातून सोडवून तिला सोलापुरास तिच्या भावाच्या घरी पोहोचते केले

—केसरी ता. १८–१–३५

—दादू जिल्ह्यांत (सिंध) मुसलमानांनी पोलि-सांच्या पहाऱ्यातून एका हिंदू स्त्रीला पळविली तेव्हापासून तेथे अस्वस्थता आहे व तेथे १४४ कलमहि लावण्यात आले होते त्याची मुदत ता. ३१ पर्यंत वाढविली आहे

—केसरी ता २२–१–३५

—कराची येथे ता. १३ रोजी रात्री एका मसल-मानाने एका गुजराथ्याचे दोन वर्षांचे मूल चोरून ते आपल्या ओव्हरकोटाखाली लपवून तो चालूं लागला परंतु मूल खाली घसरून रडूं लागले तेव्हा त्या मुसलमानास पकडण्यात आले व त्यास पोलिसांच्या स्वाधीन करण्यात आले

—केसरी ता. २२–१–३५

—रावळपिंडी भागात एका मुसलमानाने मुले पळविल्यामुळे बरीच गडबड उडाली होती. पण पोलिसांनी त्यास सक्करनजीक नुकतीच अटक केली. झडतीत एक पिस्तुल व एक सुरा मिळाला धनगरांच्या दोन मुलांचा खून याच गृहस्थाने केला असल्याचे निष्पन्न झाले आहे.

—केसरी ता २९–२–३५

—ता ८ रोजी पुणे कँपमधील बहादूर नावाच्या अल्पवयी पारशी मुलास एका पठाणाने तोंडांत बोळा घालून पोत्यात बांधले व सायकलवरून चिंचवडकडे त्याला नेले वाटेत जमिनीवर पोते ठेवून पठाण दूर गेला असता मुलाने आपली सुटका करून घेतली व काही लोकानी त्यास घरी पोहोचता केला. पठाण सापडला नाही, असे समजते —केसरी ता. १२–३–३५

—मुंबईहून एक हिंदू तरुण मुलगी आपली आई आजारी असल्याने काश्मीरकडे जाण्यास निघाली होती लाहोर स्टेशनावर ती पोहोचली असता तिकिट कलेक्टरास तिचे सामान जास्त असल्याचे वाटल्यावरून त्याने त्या मुलीस जास्त भाडे मागितले पण जादा भाडे देण्याची आपल्यास शक्ति नाही असे तिने उत्तर दिल्यामुळे त्या मुलीस तिकिट कलेक्टरने खाली उतरविले. पुढे स्टेशनावरील एका फर्मानखान नावाच्या मुसलमानाने तिला तेथून पळवून एका अज्ञात ठिकाणी ठेवली व तिचे सामान लांबविले या अपराधाबद्दल त्यास लाहोर येथे मॅजिस्ट्रेटाने २ वर्षांची स. म ची शिक्षा दिली व त्याच्या साथीदारास तीन महिन्याची शिक्षा सांगितली.

—केसरी ता ९–४–३५

—पुणे येथील भवानी पेठेतील व्यापारी शेठ मावडीकर याचे घरी रायचूरचे पाहुणे आले असता त्याची पाच वर्षांची मुलगी रस्त्यावर उभी होती. तिला एका मुसलमानाने सायकलवरून पळविण्याचा प्रयत्न केला मुलीच्या ओरडण्याने लक्ष वेधून तेथील श्री विश्वनाथ मारुती बिडवे या व्यापाऱ्यानी मुसलमानास हटकून मुलीची सुटका केली. परंतु त्या धादलीत मुसलमान गुंड मात्र पळून गेला —केसरी ता. १६–४–३५

—मिरजेतील एका भोसले नांवाच्या मुलास फकिराने फूस लावून पळवून नेल्याने गांवांत

बरीच खळबळ उडाली आहे. मुलगा शिलाईचे काम करीत होता —केसरी ता १७–५–३५

—मुबई सबर्बन भागात कुर्ला गावाजवळील एका खेडेगावातील देवळाच्या गुजराथी पुजाऱ्याच्या बायकोवर काही मुसलमान (काँग्रेसचे कायकर्ते म्हणविणाऱ्या) पुढाऱ्याच्या घरी असलेला मुसलमान नोकर व आणखी काही हस्तक मडळीनी पाळत ठेवून तिला पळविण्याचे घाटले सदर देऊळ गावापासून थोडे दूर व गावची लोकवस्तीहि विरळ, अशा सधीचा चागला फायदा त्यानी घेतला. या मुसलमानापैकी एकाने सुमारे तीन आठवड्यापूर्वी सदर गुजराथी बाईचे मनगट धरिले व तिला तो फराफरा ओढू लागला, व तोडाने निर्लज्जपणाने म्हणाला की "मी तुझे तोडावर थुकलो आहे ! फिरून आपले बापाकडे तू कशाला जातेस ? " पण बाईने त्या अडदाड मुसलमानाच्या मुर्दाड भाषणाचा धिकार केला व आरडाओरड केली आणि आपली त्या दुष्टाच्या तावडीतून सुटका करून घेतली सर्व लोकासमक्ष तिला उद्देशून मुसलमानानी फिरून तिची वरील शब्दात नाचक्की करण्यास सुरवात केली इतक्यात काही प्रतिष्ठित मडळीनी त्या बाईस देवळात आणले ! मसूर आश्रमाच्या मडळीना बातमी लागताच त्यानी त्या गावी जाऊन माहिती करून घेतली व गावकऱ्याचे सल्ल्याने त्या बाईला व तिचे नवऱ्याला दुसरीकडे नेण्याची व्यवस्था केली —विश्वोद्धार ६।६।३५

—भागूबाई शिदे नावाच्या एका बाईची इज्जत घेण्याचा प्रयत्न केल्याच्या आरोपावरून साहेबखान व अबदुल रहिमान अशा दोघा पठाणावर कर्नल खबाटा याचे कोर्टात खटला चालून दोघाना दंड करण्यांत आला व सहा महिने चांगली वर्तणूक ठेवण्याविषयी जामीनहि घेण्यांत आला. सदरहू पठाण जी. आय पी रेल्वेचे नोकर असून कामावरील हजेरीच्या वेळी वरील गुन्हा घडला असे कळते. —केसरी ता. १४–६–३५

—तीन अल्पवयी हिंदु मुलाना पळवून नेण्याचा प्रयत्न केल्याच्या आरोपावरून मुबईस कमरुद्दीन कानजी नावाच्या मुसलमानास ४ महिन्याची शिक्षा झाली. —केसरी ता. २३–७–३५

—एका हिंदु मुलीस हुसेन आबा फकीर नावाच्या एका मुसलमानाने पळविल्याबद्दल त्याच्यावर सागली येथे खटला होऊन त्यास चार महिन्यांची स म ची शिक्षा झाली

—केसरी ता २६–७–३५

—ता. दर्यापूर मु बाभळी येथील हरिजन समाजातील एक २० वर्षे वयाची तरुणी नवऱ्याने टाकून दिल्याकारणाने बापाचे घरी राहात होती. येथे राहाणाऱ्या सेक बुऱ्हान नांवाच्या मुसलमानाने फसवून तिला जाळ्यात अडकवून तिच्या एका तीन वर्षांच्या मुलीसह घरी नेऊन मुसलमान बनविले बाई २ वर्षे त्या मुसलमानाच्या घरी राहून अखेर मारहाणीस कंटाळून घराबाहेर पडली त्या मुसलमानाने तिच्या मुलीस मुसलमान पद्धतीने वाढविण्याचा प्रयत्न केला ती प. हिरालाल जोशी चालक हिदु अनाथालय परतवाडा यांजकडे गेली. तीस १४–८–३५ रोजी हिंदु करून घेण्यात आले व सबडिव्हिजनल ऑफिसर यांजकडे अर्ज करून मुलगी परत मिळविली तिच्या मुलीस शुद्ध करून ९–९–३५ रोजी हिंदु धर्मांत घेतले.

—केसरी ता. २०–९–२५

# बाटविण्याचे कांहीं प्रकार

मुसलमानांचे बाटविण्याचे प्रकार अर्थात् अनंत आहेत. एकदां बाटून मुसलमान झालेला मनुष्य पुन्हां परत आपले धर्मांत कधींही जाऊं शकत नाहीं असा मुसलमानांचा आग्रह असतो. याला उलट तोड अशी आहे कीं, जो हिंदू आहे तो कोणच्याहि संस्कारानें कधींहि बाटूं शकत नाहीं हें मत सर्व हिंदूंनीं ठासून पतकरावयास हवें. जो आपखुशीनें जाईल किंवा येईल त्याचें निराळें; पण ज्याच्या बाबतींत जबरदस्ती झाली तो कधींहि बाटूं शकत नाहीं हें हिंदु धर्माचें तत्त्व म्हणून मानिलें पाहिजे. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या बाटविण्याच्या ज्या सूक्ष्म पद्धती आहेत त्यांचाच अवलंब मुसलमानांतील कांहीं पंथांनीं आधींच केला आहे व उत्तरोत्तर तो जास्त होत आहे; त्यामुळें हिंदूंची जागरूकताहि तितकीच सूक्ष्म व्हावयास हवी. हिंदूंच्या अवतार–कल्पना ऐन जिनसी उचलून त्यांचें मुसलमानीकरण करून त्या आपल्या पंथाच्या मूळ-पीठिकेंत दाखल करणें असल्या गैरंच्या आगाखानी मुसलमानांनीं कशा केल्या आहेत हें पुढील मजकुरावरून दिसून येईलच. त्याच तऱ्हेवर आतां नवे नवे प्रयत्न सुरू होत आहेत. एकादा उडाणटप्पू फकीर आपणास दत्तात्रेयाचा अवतार म्हणवितो. दुसरा बसवेश्वराचा म्हणवितो व हिंदूंचीं अशिक्षित व सुशिक्षित भोळवटेंहि त्यांच्या नादीं लागतात. या बाबतींत हिंदु प्रचारकांनीं सावध असलें पाहिजे. असा एकादा अड्डा दिसला कीं, तेथें जाऊन त्यांची सर्व माहिती वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करावी आणि भोळवटांचीं नांवें प्रसिद्ध करून त्यांची फटफजीति करावी; म्हणजे हे गंडेवाले व अबीर बुक्कावाले आपापले व्यवसाय बंद करूं लागतील.

### जबरदस्तीनें धर्मप्रसारास कुराणांत आज्ञा नाहीं.

अध्याय ७ सुरा काफेरून

"कुलिया अयोदल कॉफिरूना ला आबूदोमाता बद्दून, वला अंतुम आबेदूना माआबूद, वला अन्त आबदूम आबत्तुं, वलाअतुम आबेदूना मआबूद लकुम दीनकुवलीयदीन."

जो धर्म अनादि कालापासून चालत आलेला आहे व जो सर्वमान्य आहे, त्या धर्माचा कोणी विरोधी होऊ शकत नाही सत्यधर्माचा त्याग कोणी केल्यास त्यास उपदेश करून धर्माचा प्रसार करणे योग्य धर्म म्हणजे कर्तव्यकर्म, त्यास अनुसरून वागणे हे मनुष्यास उचित आहे सत्य धर्माचे अनेक मार्ग आहेत. जो त्या मार्गाने जातो त्यास अडथळा करणें योग्य नाही. ज्याचा मार्ग

त्यास; करितां जुलूम करून आपला कर्ममार्ग कबूल करविणे हे खरें प्रायश्चित्त नव्हे!

(नूरमहमद फकीरमहमद पटेल, कोल्हापूर)
—केसरी २५।९।३३

* * *

## 'खोजा' लोकांनीं अनुयायी कसे मिळविले?

पर्शियामधील 'ख्वाजा' या नावाचा अपभ्रंश होऊन 'खोजा' असे नाव हिंदुस्थानात प्रचलित आहे याचा अर्थ श्रीमत घरदाज मनुष्य किंवा सद्गृहस्थ असा आहे

हे लोक मूळचे इस्माईल धर्माचे इ स १०९४ त ईजिप्तमधील फातिमाईट खिलाफतीच्या वारसासबधी वाद उपस्थित होऊन अल–मुस्तानसिर बिल्ला याच्या थोरल्या मुलाच्या (नझार) पक्षाचे लोक मूळ धर्मांतून फुटून निघाले या फुटून निघालेल्या लोकाच्या विचाराने पर्शियामध्ये चागलेच मूळ धरले या मताचा मुख्य प्रसारक 'हसन साब' होय याने आपल्या धर्माचा प्रसार इतका केला की थोडक्याच अवधीत खुरसाण प्रातापासून सीरिया प्रातातील पर्वत, कास्पियन समुद्र, व भूमध्य समुद्र येथपर्यंतच्या टापूतील राज्यकर्ते व नवमतप्रवर्तक याना 'हसन' चे अनुयायी बाऊ होऊन बसले हा हसन पुढे आपणास 'इमाम' म्हणवून घेऊ लागला आणि आपल्या धर्माच्या मनुष्याचे हातून पाप होणेच शक्य नाही असे सागू लागला. या महात्म्याचे प्रस्थ इतके बळावले की अजून सुद्धा कोणताही खोजा इसम याचे नावाबरोबर 'सलाम' हा शब्द उच्चारल्याखेरीज राहात नाही हिंदुस्थानात आलेला पहिला खोजा पाद्री याच हसनने पाठविला असे सागतात व नामदार आगाखानही आपला 'अली'शी सबध जोडतात तो याच्याच मध्यस्थीने

हिंदुस्थानात आलेल्या पहिल्या खोजा प्रचारकाचे नाव 'नूर सलागर' किंवा 'नूरशहा'. हा प्रथम सुलतान रेझियाच्या कारकीर्दीत इकडे आला.

'तबकत-इ-नझीरी' चा कर्ता 'मिनाज-उस्सिराज' हा आपण नूरशहाला सबंध हिंदुस्थानांत अनयायी भराभर कसे मिळत गेले ते प्रत्यक्ष पाहिल्याचे सागतो इ स १२३७ त तर नरशहाने आपल्या एक हजार सशस्त्र अनुयायासह दिल्लीच्या जुम्मा मशिदीवर हल्ला करून तेथील जमलेल्या लोकाची धूळधाण उडविल्याचा उल्लेख आहे या वृत्तातापेक्षा खोजे लोक स्वत जी हकीकत सागतात ती निराळीच आहे

ते सागतात की नरशहा प्रथम गुजराथेंत पाटण येथे आला. त्या वेळी तेथे दुसरा सोळकी भीम राजा राज्य करीत होता तेथे आल्यावर नूरशहानें हिंदू देवताना आज्ञा करून बोलावयास लाविले व त्याच्याकडूनच आपल्या मताच्या खरेपणाची साक्ष देवविली, आणि ते पाहून अर्थातच त्याला पुष्कळ अनुयायी लाभले! परत जाताना तर त्याने पाटणच्या राजालाच दीक्षा दिली! परतु हा प्रकार गुप्तपणे झाला!

दुसऱ्या खेपेस आल्यानतर त्याने गुजराथचा सुभेदार राजा सुरचद हा नवसरी येथे असे, त्याच्या मुलीशी लग्न लाविले परतु त्याचा हा इतका उत्कर्ष सहन न होऊन त्याचाच एक प्रमुख चेला 'चाच' याने त्यास ठार मारिले खून झाला त्या वेळी नूरशहा समाधि लावून बसला होता. ही समाधीची पद्धत हिंदूना बाटविताना नूरशहाखेरीज इतराना सुद्धा फार उपयोगी पडली

वर मर्तीना आज्ञा करून बोलावयास लावण्याचे सामर्थ्य या इस्माईल पथाच्या लोकांत असल्याचे वर आलेच आहे त्याशिवाय आणखीही युक्त्या त्याचेजवळ होत्या. लोहाण नावाच्या अफगाणी टोळधाचा विश्वास त्यानी तुम्ही रामाचा मुलगा लव याचे वशज आहात असे सागून मिळविला. याहून निराळी एक क्लृप्ति आहे ती अशी. लोहाणाना ठक्कर किंवा ठाकूर असे सबोधितात. खोजे अथवा ख्वाजा लोकानी खोजा हे ठक्कर याचेच भाषातर आहे व त्याचा अर्थ इग्रजीतील 'लॉर्ड' सारखा होतो असे सागितले. याला प्रत्यतर म्हणजे उत्तर काठेवाडात खोजे लोक

ठाकूर म्हणून ओळखले जातात व त्याचेप्रमाणेंच पेहेराव करितात.

* * *

## आगाखानी मुसलमान परनामी मताच्या लोकांस आपणांत ओढूं पहात आहेत.

पन्ना, बुंदेलखड, जामनगर, काठियावाड, सुरत, कमालिया, भावनगर, पाकपटन, मान्ट, गोमरी, लायलपूर, अम्बारा, दिल्ली व नेपाळ इत्यादि ठिकाणी मिळून परनामी मताच्या लोकाची ४ लाख संख्या आहे

या लोकाचा मुख्य औरगजेब बादशहाचे वेळी देवचंद नावाचा एक कायस्थ होता त्याचा मित्र प्राणनाथ याने या लोकाच्या मताचा जोराने पुरस्कार केला याच्या धार्मिक ग्रथाचे नाव 'श्रीकुल-जुम-स्वरूप' असून या ग्रथाचे १८ भाग आहेत सदर ग्रथ आज तागायत दुसऱ्या मताच्या लोकाना त्यातील हकीकत कळेल या भीतीस्तव हस्तलिखित असाच ठेवण्यात आला आहे तो इतका गुप्त ठेवण्यात आला आहे की इतकी वर्षें झाली तरी कित्येकानी तो पाहिलाहि नसेल ग्रंथांची हिंदी, गुजराथी, मारवाडी व पजाबी भाषात रूपातरे आहेत परनामी पथाचे लोक वयाच्या ११ वर्षें व १२ व्या दिवसापर्यंत भगवान् श्रीकृष्णास अवतार मानतात पुढे महमदालाच त्याचा अवतार समजतात कित्येक 'श्रीकुल जुम स्वरूप' या ग्रथाप्रमाणेंच कुराणास पवित्र मानतात. काही पुराणासहि मानतात, परतु पुराण ऐकण्यापलीकडे त्याचा उपयोग करीत नाहीत . विक स्वरूप-नांवाच्या याच्या एका पुस्तकामध्ये श्रीकृष्ण व महमदसाहेब या दोघाचेवरील दोन अत्याचार वर्णन केले आहेत काही भागवतहि मानतात, व सागतात की देवचन्दाने १२ वर्षे भागवत सांगितले होते. यांचा ईश्वर साकार आहे. त्याला १२००० स्त्रिया आहेत; हे मांस-मद्य खातपीत नाहीत. प्रेते पाण्यात सोडतात यांची गुजराथेंत ४२ व पंजाबमध्ये १२ मदिरें आहेत मंदिरांत कुल जुमस्वरूपाची पोथी ठेवतात तिलाच पोषाख वगैरे करितात व तिच्या समोर घंटा वाजवून आरत्या म्हणतात हेतु हा की, हिंदूना ती पोथी म्हणजे मूर्तीच वाटावी. त्या पोथीसमोर डोके टेकून नमस्कार करितात व पुजारी आपल्या मताच्या लोकाना प्रसाद देतो एकमेकास भेटले असता हे लोक नमस्कार करतात कपाळास गध व गळयात जानवे हे लोक घालतात शेंडी सुद्धा राखतात व आपणास हिंदु म्हणवितात याच्यात साधारण ब्राह्मण-उपाध्ये व साधु असे पोटभेद आहेत साधु हे ब्रह्मचारी राहातात याशिवाय मेराजपथ व छज्जूपथ असे उपपथहि याच्यात आहेत राधास्वामीच्या अनुयायाप्रमाणे हे परनामी लोकसुद्धा आपले अस्तित्व सृष्टीच्या उत्पत्तीपासून असल्याचे सागतात फक्त देवचन्द याने ते १६६४ इ स मध्ये प्रकट केले इतकेच. पन्ना या शहरास पद्मपूर व जामनगर यास नूतपुरी म्हणून सबोधितात प्राणनाथ आपणास 'मेहदी' चा अवतार समजतो व त्याचा ग्रथ 'श्री कुलजुम स्वरूप ' हा अपौरुषेय (अस्मानी) आहे असे मानतो

या वर वर्णन केलेल्या लोकाच्या बहुतेक चाली रीति हिदूप्रमाणेच आहेत दिवसातून २।३ दा सध्या व २ वेळ प्रार्थना करितात व आपणास हिदूही म्हणवितात. केवळ याची भाषा मुसलमान आहे, हे महमदास मानतात व त्याच्या ग्रथात त्याची बरीच माहिती आहे येवढयावरच ख्वाजा हसन निजामी याना पक्के मुसलमान करण्याच्या बेतात आहेत ते म्हणतात की, हे लोक आपणास हिदु असे उपपद लावून घेतात ते केवळ त्याची रहाणी केवळ हिदूप्रमाणे असल्यामुळेंच होय महमदास भगवान श्रीकृष्णाचा अवतार मानावा कारण जे कृष्णाचे स्वरूप तेच महमदाचे होते

ख्वाजा साहेबानी या लोकाना आपल्या कळपात ओढण्यासाठी एक मुसलमान प्रचारक नेमिला आहे त्याने प्रेम असे नाव घेतले असून आपल्या कामास आरभही केला आहे. या लोकावर अगोदरच मुसलमानी सिद्धाताचा बराच पगडा बसला

असल्यानें मुसलमान प्रचारकांस बरेच यश येण्याचा संभव आहे त्यातच ख्वाजा हसन साहेब लिहितात की या लोकाची ते आपणास हिंदू म्हणवीत असले तरी दुहेरी गणती होऊ शकत नाही ! ! —भयानक षड्यत्र पृष्ठ ११ते१३

* * *

## गोव्यांतील ख्रिस्तीकरण

गोव्यासारखे समृद्ध शहर व तो प्रदेश अदिलशहाच्या ताब्यात होता तो परत मिळविण्यासाठी विजयानगरच्या राजाने तिमय्या या सरदारास आरमाराचे आधिपत्य दिले होते त्याचा गोमातकात म्हाळ पै नावाचा साथीदार होता त्या वेळी पोर्तुगिजाचे आरमारी वर्चस्व होते सन १५१० मध्ये तिमय्याने आल्बुकर्क याच्या मनात गोव्यावर चाल करण्याचे भरविले २९ फेब्रुवारी १५१० मध्ये अल्बुकर्कने पणजीचा किल्ला सर केला व गोव्यावर हल्ला केला तेथील मुसलमान अधिकारी त्याच्या हल्ल्याची चाहूल लागून पळून गेला, व त्यामुळे पोर्तुगिजाना गोवे रक्तपाताशिवाय मिळाले त्याने सर्वाच्या परपरागत हक्काचे सरक्षण केले जाईल असे आश्वासन देऊन कर कमी करून तो वसूल करण्याचा हक्क तिमय्यास दिला १५११, १५१६, १५२० या सालात अदिलशहाने गोवे घेण्याचे जोरदार प्रयत्न केले पण ते फसले व शिवाय आदिलशहाला सासष्टी, बारदेश, व अत्रूज हे महाल पोर्तुगिजाना द्यावे लागले पोर्तुगिजानी आक्रमण करून गोव्याच्या दक्षिणेस अजनीद्वीप, कानापूर, कोचीन व उत्तरेस मुबई, ठाणे, साष्टी, वसई, दमण, दीव ही नाकी जिकली आणि सारा हिदुस्थान घशात घेण्याच्या बेतात ते आले होते

तथापि याच वर्षी म्हणजे १५३४ साली पोर्तुगिजाच्या वैभवक्षयाच्या अतस्थ कारणाचा उगम झाला हे कारण म्हणजे स्वधर्मप्रचार व तत्पोषक म्हणून परधर्मच्छल याची दुर्दम्य बुद्धि या बुद्धीने त्यांनी सतत २५० वर्षे जो हैदोस हिंदुस्थानात अर्थात् गोव्यांत, घातला त्याचे यथातथ्य वर्णन करणे मूर्तिमत क्रौर्यालाहि अशक्यच होईल ! बिचारे तिमय्या व म्हाळ पै यांची अपेक्षा निदान आशा अशी की, पोर्तुगीज गोवे घेतील आणि फार तर अधिसत्तेपुरते स्वामित्व हाती ठेवून प्रत्यक्ष कारभार हिदूच्याच हाती ठेवतील पण गोवे आपल्या स्वाधीन करण्यास कारणीभूत हिदूच झाले याचे स्मरण ठेवून जो कदाचित् कृतज्ञ राहिला असता तो आफोसु द आल्बुकर्क १५१५ तच निधन पावला गामा १५२४ त तिसऱ्यादा हिदुस्थानात येऊन अल्पकाल राज्यप्रतिनिधिपद भोगून परत स्वदेशास गेला पोर्तुगालच्या सिहासनावर अत्यत धर्मवेडा राजा तिसरा दो जुवाव अधिष्ठित झाला आणि हिदुस्थानवर ज्याना व्हाईसरॉय म्हणून पाठवावयाचे तेही बहुतेक त्याच कोटीचे असू लागले आणि म्हणनच उपर्युक्त साली गोव्यात ख्रिस्ती धर्माधिकाऱ्याची बिशपची गादी स्थापन होऊन पडली १५४१ च्या ३० जूनला असा हुकूम निघाला की, "इतका काळ सैतानाच्या जबड्यात असलेल्या या हिदुस्थानाची व त्यातील लोकाची आमच्या माबाप देवाला आठवण झाली असून त्याने आम्हास तिसवाडीतील एकूण एक धर्मालये जमीनदोस्त करण्याची आज्ञा फर्माविली आहे " या हुकुमान्वये सहा महिन्याच्या आतच एकूण एक देऊळ व मशीद पाडण्यात येऊन गोवे शहरात मोठी व शहराबाहेर छोटी ख्रिस्त–मदिरे उभारण्यात आली आणि हिदू देवळाचे सर्व उत्पन्न त्याना बहाल करण्यात आले असल्याचा कबुलीजबाब व तोही राजीखुषीने ग्रामस्थाकडून त्याच साली लिहून घेण्यात आला. सन १५४२ साली ख्रिस्त धर्मप्रसारक सेट झेव्हियर याचे आगमन झाले आणि सक्तीच्या धर्मांतरास प्रारभ झाला. तेव्हा हिंदू लोक सासष्टी बारदेशात पळून जाऊ लागले. पण दुर्दैवाने थोड्याच अवधीत तेही महाल पोर्तुगिजानी आपल्या राज्यास जोडले. पुढे १५५७ त आदिलशाही सरदारानी आणि १५७० त आली अदिलशहा व निजाम याच्या सयुक्त सैन्याने ते काबीज करण्यासाठी स्वाऱ्या केल्या. पण त्यात त्याना अपयश आल्यामुळें वरील दोन्ही महाल १५४३ सालांत

जे पोर्तुगीजांच्या हातांत पडले ते कायम राहिले असेच समजलें पाहिजे. तेव्हां देवधर्माच्या कार्याकरितां म्हणून मुरगावसह सासष्टी जेसुइटाच्या आणि बारदेश सेंट झेव्हियरच्या फासिस्कनाच्या हवाली करण्यात आले तेव्हा धर्मांतराचे क्षेत्र जसे वाढले तशीच त्याची साधने व त्याबद्दलचा उत्साह हीही वृद्धिंगत झाली १५४८ त धर्माधिकाऱ्याने पाखडयाचे धर्मग्रथ गोळा करून जाळून टाकले १५५७ त धर्मप्रसाराच्या उपायाची योजना आखण्यासाठी पाद्र्याची पहिली धर्म–परिषद भरली व त्याच वर्षी हिदूना सर्व सरकारी नोकऱ्यातून हुसकन लावण्यात आले १५५९ त असा कायदा जाहीर झाला की, मयत हिदूची विधवा व त्याची मुले ख्रिस्ती धर्म स्वीकारण्यास नाकबूल होतील, तर त्याचा वारसा हक्क नाशाबीद धरून मृताचे जे नातलग ख्रिस्ती होतील त्याना त्याची मालमत्ता विभागून द्यावी बेवारशी मृत हिंदूची सपत्ति सरकारजमा करावी आणि पोरक्या मुलामुलीना सक्तीने ख्रिस्ती धर्मदीक्षा द्यावी १५६० च्या जून महिन्यात सुवर्णकारावर हल्ला आला. धातूच्या मूर्ती घडवण्याचे काम त्याच्याकडून होत असल्याने त्यानी ताबडतोब निघून जावे, न पेक्षा त्याची सर्व मालमत्ता जप्त करण्यात येईल व मालमत्ता नसलेल्याना कैदेत ठेवले जाईल असे बजावण्यात आले या वेळेपर्यंत वैयक्तिक स्वरूपाची धर्मांतरे तेवढी होत होती पण याच वर्षाच्या अखेरीस सासष्टीतील चारशेवर लोकाना पकडून आणून "पवित्र श्रद्धा" अभिधानक गोव्यातील ख्रिस्तालयात त्याना सामुदायिक बाप्तिस्मा देण्यात आला ज्याचे नाव घेताच अग रोमाचित होते त्या Inquisitionची किंवा धर्मसमीक्षण सभेची किवा 'पवित्र कामा'ची स्थापनाही याच वर्षी झाली कोकणी बोलीत कोणत्याही भयकर, दुष्ट किंवा अनिष्ट कृत्यास किवा कर्त्यास 'व्हडला' हा 'वरला' 'थोरला' या अर्थाचा शब्द व्याजस्तुतीने लावला जातो 'सर्पास' बायका 'व्हडला' म्हणतात तेंही याच अर्थाने होय या पवित्र गृहास तत्कालीन हिंदूनी 'व्हडले घर' ही सज्ञा दिली होती. यावरून त्याच्या राक्षसी व विषारी कर्तबगारी ी कल्पना थोडक्यात आणून देता येते. हे समीक्षणगृह स्थापन होताच मूळ अनर्थाला ऊत येऊ लागला त्यामुळे लोक घरे दारे सोडून फोडे आदि मुसलमानी व हिदु मलखात जाऊ लागले, आळीच्या आळी निर्जन बनल्या, शेते–भाते ओस पडली, शहरावर मृतकळा आली. पण पूर्वीच हातास आलेल्या अपरपार सपत्तीचा मद चढल्यामुळे आणि कडव्या धर्मप्रसारकानी भलभलत्या रीतीने अधिकाऱ्यास चढवून भुलवून टाकल्यामळे सुरुवातीस ते या दु स्थितीची परवा करीनातसे झाले इतकेच काय, पण दुसरा मोठा साधिक बाप्तिस्माहि त्यानी घडवून आणला दिवाडी बेटातील दीडहजारावर लोक पकडून आणले "त्याना एका पाद्र्याने ख्रिस्ती धर्माचा चागुलपणा व श्रेष्ठत्व, सागणाऱ्याची भाषा पोर्तुगीज तर ऐकणाऱ्याची कानडी–कोकणी असताना समजावून सागितले आणि असे बजाविले की, कोणीही आपल्या खुषीविरुद्ध हा धर्म स्वीकारता कामा नये, ज्याची इच्छा नसेल त्याने बेधडक निघून जावे, सभोवार असणाऱ्या सगीनीची कदर त्याने लवमात्र करू नये, अखेरीस पाद्र्याने प्रश्न केला "आमचा हा पवित्र ख्रिस्तीधर्म स्वीकारण्यास स्वत च्या राजीखुषीने न आलेला कोणी आहे काय ? " तेव्हा एकाच स्वरात उत्तर गर्जले "नाही नाही, आम्ही सर्व केवळ स्वखुषीने ख्रिस्ती होण्यास आलो आहो" या कहरानतर व्यापार–उदीम, शेतीभाती, इत्यादि पार बसून साऱ्या गोवा बेटावर प्रेतकळा आली तेव्हा १५६१ साली हिदूना तेथे परत येण्याबद्दल विनवण्या सुरू झाल्या, घरे बाधण्यास, व्यापार करण्यास, शेते लावण्यास मोकळीक मिळेल आणि सर्व काही सुरक्षित राहील असे आश्वासन देण्यात आले पण धर्माधिकाऱ्यानी पोर्तुगालहून दोन वर्षांच्या आतच उलट हुकुम आणून हे आश्वासन मागे घेण्यास व्हाइसरॉयाना भाग पाडले. तेव्हा खुद्द राजा आपल्या तत्राने वागणारा आहे, हे कळून चुकल्यामुळे पाद्रीशाहीच्या धुमाकुळास पुन. उकळी फुटली. दुर्दैवाने याच समयास म्हणजे १५६५ त बहामनी राज्याच्या पांचही तुकड्यानी

एकत्रित होऊन राक्षसगडच्या रणांगणावर विजयनगरचें 'अविस्मरणीय' हिंदु साम्राज्य 'नष्टस्मृति' करून टाकले. त्यामुळे हिंदूस आता जवळपासही बळवान असा त्राता कोणीच राहिला नाही हे लक्षात घेऊन या उकळीस अधिक जोर आला असावा. कारण १५६६ त तिसवाडीतील हिंदू लोकांचे ग्राम–संस्थातील हक्क हिरावन घेण्यात आले. आणि अत्याचाराची शीग जी गोवा व त्याच्या लगतच्या एकदोन बेटापुरती होती ती सासष्टी बारदेशापर्यंत पसरू लागली १५६७ त रायतूर येथील किल्लेदाराने लोटलीतील श्रीरामनाथ देवालयाला आग लावन ते भस्मसात् करून टाकले महाजनानी न्यायकचेरीकडे तक्रार केली व न्यायाधीश न्यायप्रिय असल्याने त्याने देऊळ स्वत च्या खर्चाने बाधून देण्याचा हुकूम किल्लेदारावर बजावला. पण त्याने व्हाइसरॉयाकडून त्याची अमलबजावणी तर रद्द करविलीच पण उलट सासष्टीतील सापडेल ते देऊळ पाडून टाकण्याची मुभा मिळविली त्याप्रमाणे किल्लेदाराने पाद्र्याचे सैन्य घेऊन त्याच वर्षी एका रात्रीत २८० देवळाचा फडशा उडविला १५६९ त बारदेशातील देवळाची तीच गत करण्यात येऊन त्याचे उत्पन्न ख्रिस्तालयाना देण्यात आले. १५७५ त दुसरी धर्मपरिषद भरली व तिच्या शिफारशीवरून हिंदूनी कोणत्याही प्रकारच्या वाहनाचा उपयोग करू नये असा सरकारी जाहीर हुकूम झाला. याच परिषदेत धर्मप्रसारकानी देशी भाषा शिकणे जरूर असल्याचा ठराव झाला होता, अर्थात् त्या वेळेपर्यंत त्याच्यात देशी भाषा जाणणारे क्वचितच होते असे उघड दिसून येते याच वर्षी सासष्टीतील कुकल्ली गावच्या श्रीशातादुर्गेच्या उत्सवास बदी करण्यात आली तेव्हा तेथील हिदु खवळले व हुकूम घेऊन जाणाऱ्याचा त्यानी खून पाडला. ही बातमी लागल्यावर धर्मप्रसारकाचे सशस्त्र भिरे तेथे गेले आणि तेथील व असोलणे येथील देवळाचा तर त्यानी विध्वस केलाच पण जवळपासची घरेदारे व शेतीभाती हीदेखील उध्वस्त करून टाकली आणि भरीत भर म्हणून गाईंचा वध करून गर्भागारासह देवालयाचें सर्व आवार त्यांच्या रक्तानें माखून काढले. १५८५ त तिसरी धर्मपरिषद भरली आणि १५८७ त हिंदना जानवे वापरण्यास व लग्नसमारभ करण्यास बदी झाली तेव्हा ते परमुलुखात जाऊन लग्ने उरकन घेऊ लागले सबब बाहेर जाणाऱ्यावर डोईपट्टी बसविण्यात आली. १५९२ त भरलेल्या चौथ्या धर्मपरिषदेच्या शिफारशीवरून नव ख्रिस्त्यानी हिदु नापिकाकडून दाढी हजामत करविणे व हिदु इसम नोकरीस ठेवणे गुन्हे मानण्यात येऊ लागले त्यामुळे अर्थातच अनेक हिदु देशोधडीस लागले खरे परतु १६ व्या शतकाच्या अखेरीपर्यत वीस हजार हिदु गोवे शहरात राहिले होते ।

१७ व्या शतकाच्या पूर्वार्धांत हिदुस्थानच्या दर्याकिनाऱ्यावर डच व इग्रज याची, तर आतरभागी दिल्लीपति मोगलाची आक्रमणे जोरावत होती आणि उत्तरार्धांत फ्रेंच व मराठे याच्या सत्ता बळावत होत्या. तशात आपल्या अघोर पापाचरणानी पोर्तुगिजानी स्वत चे नाव बद्द व तिरस्करणीय करून ठेवले होते. या अतर्बहि कारणानी १७ वे शतक त्याना, 'कमावलेले साम्राज्य गमावणारे शतक' म्हणूनच दु स्मरणीय होऊन राहिले १६०३ मध्ये डच लोकानी गोव्याला वेढा घातला आणि तो उठवून लावण्यास पोर्तुगीजास त्याच्याशी महिनाभर झुजावे लागले १६१० त मुसलमानाच्या मदतीने त्यानी पुन हल्ला केला व तोही परतविताना पोर्तुगिजास भारी श्रम पडले १६४३ त त्यानी मुरगाव बदरावर तोफा डागल्या आणि याही खेपेस जरी पोर्तुगिजापुढे त्याना गोव्यात हार खावी लागली तरी मलाका, कोचीन, कानानूर, वगैरे ठिकाणे त्यानी पोर्तुगिजाकडून हिरावून घेतलीच. पोर्तुगालचा राजा चौथा दो जुवाव याच्या दॉन कातारीन ब्रागास नावाच्या मलीशी इग्लडचा राजा दुसरा चार्लस याने विवाह केला त्याबद्दल आदण म्हणून मबई बेट इग्रजाना द्यावे लागले. १६८३ त सभाजी महाराजानी एकाच वेळी सासष्टी व बारदेश या महालावर हल्ला

केला, आणि तो इतका जोरदार की, त्याच्याकडून पोर्तुगीज सत्ता धुळीस मिळविली जाण्याचाही योग दिसला होता पण दुदवाने तो साधला नाही कारण, याच वेळी मोगल मराठी मुलुखात शिरले आणि महाराजाना पोर्तुगिजाकडचा मोर्चा त्याच्या वर वळवावा लागला मराठ्याच्या हल्ल्याचा जोर पाहून फोंड्यास त्याच्यावर चालून गेलेला कोंदि द आलव्होर हा सेनापति पळून जुन्या गोव्याला गेला आणि त्याने उद्वेगाने राजदड सेंट झेवियरच्या शवाच्या हातात दिला पण, सभाजी महाराज जे मागे फिरले ते वर सागितलेल्या कारणामळे नसून सेंट साहेबानी चमत्कार करून त्याना पिटाळल्यामुळे होय, अशी त्यानी आपली समजूत करून घेतली गोव्याच्या व्हाइसरॉयाने अधिकारसूत्रे धारण करताना सेंट झेवियरच्या हातातून राजदड घेण्याचा जो प्रघात अद्यापही चालू आहे तो त्या वेळेपासूनच पडलेला आहे रिपब्लिक झाल्यानतर आलेल्या प्रथमच्या काही गव्हर्नरानी मात्र हा रिवाज पाळला नव्हता तथापि इतक्या कैचीत सापडले असताना देखील पोर्तुगीजाची छलबुद्धि मावळली नाही १६८४ त असा कायदा जाहीर झाला की, पोर्तुगीज मुलुखात वास्तव्य असणाऱ्या यच्चयावत् प्रजाजनानी तीन वर्षांच्या आत पोर्तुगीज भाषेतून बोलले पाहिजे आणि सर्व करार–मदारहि त्याच भाषेत झाले पाहिजेत या मुदतीउपर जो कोणी देशी भाषा बोललेला किवा तीत करार लिहिणारा आढळेल त्याला वाटेल ती शिक्षा फर्माविली जाईल सन १६८६ त मोगलानी विजापूरची आदिलशाही व गोवळकोंड्याची कुतुबशाही खालसा केली आणि १६८९त सभाजी महाराजाचा वध झाला तेव्हा एकदरीत सर्वत्र धामधूमच चालली असल्याने दक्षिण कोकणाच्या काही भागावर मराठ्याची व काही भागावर मोगलाची अधिसत्ता जरी स्थापित होऊ लागली होती तरी ती नावापुरती असून खरे राजे त्या त्या प्रदेशावरील सरदारच होऊन बसले होते आणि ते पोर्तुगिजाना वारवार उपद्रवही देत अशा वेळी प्रजेस सतुष्ट ठेवणें कर्तव्य होते. पण त्याचें धर्मवेडाचे भूत इतके चिवट होते की, ते १७ व्या शतकाच्या अखेरीस ही गाडले गेले नाही इतकेच काय, पण त्याला चेतवण्यास गोऱ्या पाद्र्याबरोबर काळ्या बाटग्याचा गोतावळाही आता मिळू लागला होता त्याच्या जोरावर सरकारने १७०५ साली हिदूच्या शेंडीवर सुमारे आठ रुपये कर बसविला आणि १७१५ त सर्व हिदूनी पाद्र्याच्या प्रवचनास हजर राहिलेच पाहिजे असा कायदा पुकारण्यात आला तो न पाळणाऱ्याच्या घरात शिरून त्याना बायकामुलासह प्रवचनास बळजबरीने ओढून आणण्याचा अधिकारही या कायद्याने पाद्रीशाहीस मिळाला होता आणि यापूर्वीही असलेल्या तत्सम दुसऱ्या अधिकाराचा उपयोग तिच्यातील विषयपिपासू नराधमानी अत्यत हृदयद्रावक प्रकारानी केला ज्या बाया त्याना वश झाल्या त्या तर भ्रष्टल्याच पण ज्या त्याच्या कामवासनेला सहजी बळी पडत नसत, त्याना प्रथम धर्ममठात डाबून ठेवावे आणि बलात्काराने विषयेच्छा भागवल्यावर 'ख्रिस्तधर्म–विरोधक' म्हणून नतर त्याना जिवत जाळून टाकावे येथपर्यंत त्याची मजल जात असे ! ! !

पोर्तुगीजाच्या अत्याचाराची प्रस्तुतची सर्व माहिती नवीन गोव्याच्या हायकोर्टाचे परलोकवासी मुख्य न्यायाधीश आतानियु फ्लोरियानु द नोरोज यानी त्याच हायकोर्टाचे न्यायाधीश असता लिहिलेल्या व गोवा सरकारने स्वतःच्या छापखान्यात छापून स्वतःच्या खर्चाने सन १९२२ साली प्रसिद्ध केलेल्या "गोमतकीय हिदु व पोर्तुगीज रिपब्लिक" या ग्रथाचे जे भाषातर मडगावच्या हिदु साप्ताहिकात १९२५ साली प्रसिद्ध झाले होते त्यावरून घेतलेली आहे अर्थात् ती सर्व सप्रमाण व सरकारमान्यही आहे यात शका नाही

या अनर्थामुळे पोर्तुगीज मुलुखातून उरले सुरलेले हिंदु लोक झुंड्याझुंड्यानी परत्र जाऊ लागले. मुंबई पोर्तुगिजाकडून इग्रजाकडे गेल्यावर थोड्याच वर्षांत तिची भरभराट होऊ लागली होती; आणि या वेळेस तर तेथें व्यापार बऱ्याच

मोठ्या प्रमाणात झाला होता. परागदा गोमतकीय व्यापाऱ्यानी तेथेही आपले बिऱ्हाड थाटले होते व ते उत्कर्षास पावत होते ही स्थिति अवलोकन करून तत्कालीन व्हाइसरॉयानी पोर्तुगालास लिहिले की, हिदु लोकाना जर चागल्या रीतीने वागविले नाही तर पोर्तुगीज मुलूख स्मशानवत् होऊन ते इग्रजाचा आश्रय घेतील याच सुमारास म्हणजे १७३९ त व्यकटराव घोरपडे यानी सासष्टीवर व वाडकर भोसल्यानी बारदेशवर चाल केली पण विशेषत नव ख्रिस्त्याच्या मदतीमुळे पोर्तुगिजानी त्याचा पराभव केला तथापि त्याच साली चिमाजी आप्पाने वसई येथे त्याना दे माय धरणी ठाय करून त्याचे ते बेट व उत्तर कोकणातील दमणखेरीज इतर सर्व ठाणी मराठी राज्यास जोडली तेव्हापासून पोर्तुगिजाच्या अत्याचारास आळा पडत चालला. तथापि धर्मवेडाची जागा भाषावेडाने घेतली आणि आजमितीस पहिले भूत जरी निष्क्रिय झालेले आहे तरी हे दुसरे मात्र पुरे गाडले गेलेले नाही सन १७४५ त ते खुद्द नव ख्रिस्त्याच्याच मानगुटी बसले म्हणजे असे की, " ज्या वधुवराना पोर्तुगीज बोलता येत नाही त्याना आपला विवाहच लावता येणार नाही " असा दडक घातला गेला. तिकडे १७६१ त पानिपतच्या सग्रामातील अपयशाने मराठी सत्ता दिङ्मूढ झाली आणि लगेच नानासाहेब पेशवेही मृत्युमुखी पडले. ही सधि पोर्तुगीजास डोके वर काढण्यास थोडीशी अनुकूल झाली आणि ते शेजारच्या छोटया राजाशी कुरापती काढावयास लागले त्यानी १७६३ त मराठ्याकडून अत्रूज महाल काबीज केला, आणि सौधेचे सस्थानिक इमोडी सदाशिवराव याना वार्षिक खण्डणी देण्याच्या कराराने, त्याच्याकडून शिवेश्वर व पचमहाल हे तालुके हस्तगत केले १७७४ त हिंदूना सर्व पोर्तुगीज मुलखात सुखानें राहता येईल असे जाहीर करण्यात आले १७८१ साली सावंतवाडीचे भोसले याच्याकडून भतग्राम महाल जिकून घेतला आणि १७८२ त वाडीचे खेमसावत याचा पराभव करून भतग्राम महाल पोर्तुगीज मलुखास जोडला. पेडणे महाल हाही वाडकर भोसल्यांचाच. हे भोसले व कोल्हापूरचे भोंसले याच्यामध्ये लागलेल्या भाडणात पोर्तुगिजांनी वाडकरास मदत केली होती. तिचा मोबदला म्हणून १७८१ साली तो त्याना भोगवटचास दिला होता. पण पुढे वाधे निघून १७८८ साली पोर्तुगीजानी तो आपल्या सत्तेत कायमचा समाविष्ट केला यानतर मात्र पोर्तुगिजास हिदुस्थानात आणखी कमाई करता आली नाही त्याच्या जिकीचा जो सक्षिप्त इतिहास वर दिला आहे त्याच्यावरून तिसवाडी, बारदेश, मुरगावसह सासष्टी हे तालुके त्यानी १६ व्या शतकाच्या पूर्वार्धांत आणि इतर अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत काबीज केले हे समजून येते बिनकमाईचा दोन शतकाचा हा दीर्घ कालखड हिशेबी धरून त्यानी पहिल्या तिहींनी बनणाऱ्या प्रदेशास जुन्या काबिजादि व नतरच्यानी बनणाऱ्यास नव्या काबिजादि अशा सज्ञा दिल्या

इग्रजाचा अभिलाप——सन १७८९ मध्ये जगप्रसिद्ध फरेच राज्यक्राति झाली आणि ४।५ वर्षांच्या आतच हिदुस्थानातून फरेच सत्तेची पाळेमुळे खणून काढण्याचे ध्येय डोळचासमोर ठेवलेला मार्क्विस ऑफ वेलस्ली हा ब्रिटिश हिदुस्थानचा गव्हर्नर जनरल म्हणून आला त्याच्या मनात हिदुस्थानातल्या इतर सर्व सत्ताप्रमाणे पोर्तुगीज सत्ताही नष्ट करावी असे आले व त्याने कर्नल सर विल्यम क्लार्क याला सन १७९८ मध्ये गोव्याकडे पाठवून दिले फरेचाच्या हल्ल्याविरुद्ध तुमचे सरक्षण करण्यासाठी आपण आलो आहो असा बहाणा करून त्याने माडवी नदीच्या डाव्या काठावरील ताळगावच्या भूशिरावरचा किवा काबूचा राजवाडा व उजव्या काठावरचा आग्वाद येथील किल्ला हे कबज्यात घेतले, आणि पोर्तुगीज गव्हर्नराने संरक्षणाची जरुरी नसल्याचे निक्षून कळविले असताहि तो तळ देऊन कित्येक दिवस राहिला. इतक्यात युरोपात आमिया येथे इग्लंड व फरान्स याच्यामध्ये तह झाल्याची वार्ता आली तेव्हा फरेचाविरुद्ध सरक्षणाची सबब लगडी पडून त्याला नाखुषीने गोव्यातून पाय काढावा लागला.

तथापि १८०२ मध्यें काही ब्रिटिश सैन्य तोफखान्यासहित गोव्यात पुन. आले पण याच वर्षी वेल्स्ली शिंदे–भोसल्याशी लासवाडीस झालेल्या युद्धाच्या तयारीत गुतला असल्याने त्याने गोव्यात सैन्य ठेवण्यापलीकडे हालचाल केली नाही तदनतर आलेले कार्नवॉलिस व वार्लो या गव्हर्नराचा डोळाहि गोव्यावरून व विशेषत मरगाव बदरावरून निघालेला नव्हता. सबब त्यानी ते सैन्य गोव्यातून उठवले नाही पण तदनतर आलेला पहिला लॉर्ड मिटो या गव्हर्नराने हिदुस्थानावर नेपोलियनची धाड येऊ नये म्हणून ज्याप्रमाणे इराण–अफगाणिस्थानाशी सख्य केले त्याचप्रमाणे पोर्तुगिजाचेहि मन दुखवू नये म्हणून १८१३ च्या सुमारास त्याने गोव्यातून सर्व ब्रिटिश सैन्य काढून घेतले पुढे १८१८ त पेशवाई नष्ट झाली व ब्रिटिश लोक बहुतेक हिदुस्थानचे सम्राट बनले पण मुरगावसारख्या बदरावरची त्याची नजर कशी बाजूस सरावी ? तेव्हा ब्रिटिशाविरुद्ध बड उभारलेल्या वाडकर सावतास आश्रय दिल्याच्या निमित्ताने मुबई सरकारने कॅप्टन आर्थरला १८४२ त लढाऊ जहाजानिशी गोव्याकडे पाठविले त्याने पणजीच्या राजवाड्यावर तोफा रोखून आश्रित सावतास आपल्या ताब्यात देण्याची मागणी केली पण तत्कालीन पोर्तुगीज व्हाईसरॉय धूर्त व स्वाभिमानी होता. त्याने आतरराष्ट्रीय कायदा दाखवून आणि सावतासबधी मध्यस्थी करून त्याला परत पाठविले

तिकडे पोर्तुगालात एकमुखी राजसत्तेला आळा घालण्याचे यशस्वी प्रयत्न चालले होते आणि मिशनऱ्याच्या दुष्कृत्याचा सर्वांसच वीट आला होता त्यामुळे १८१२ मध्ये गोव्याच्या 'धर्मसमीक्षण' सभचे उच्चाटण झाले १८२६ त पोर्तुगालात पार्लमेट स्थापन झाले व गोव्याच्या राज्यकारभारावरहि किंचितसे लोकनियत्रण होऊ लागले. तथापि या समयासहि सुमारे १० हजार पाद्री गोव्यात होते त्याना कह्यात ठेवण्याविषयी पोर्तुगालहून व्हाईसरॉयाना पुन. सूचना देण्यांत येत होत्या. तथापि सूर्यापेक्षा त्याने तापवलेल्या वाळूची प्रखरता जशी अधिक तापदायक, तसेच पोर्तुगालच्या गोऱ्या पाद्र्यांपेक्षा देशी काळे पाद्रीच आता हिंदूना अधिक त्रासदायक होऊन राहिले होते. आणि राजकारणी मुत्सद्याचे धर्मवेड जरी निवळले होते तरी बिशरसाहेबाचे जागृतच होते त्यानी १८३० मध्ये जुन्या काबिजादीत हिदु देवालये बाधण्यास प्रतिबध केल्याचा हुकूम आणून घेतला. १७७५ च्या सुमारास गोव्यातील ख्रिस्त्याना पोर्तुगालच्या ख्रिस्त्याइतकाच राजकीय दर्जा दिला गेला होता आणि त्याचे प्रत्यतर म्हणून पुढे १८३५ त बॅर्नार्दु पॅरिश द सिल्व्ह नावाच्या हिदी ख्रिस्ती गृहस्थाची त्यानी पोर्तुगीज हिदुस्थानचे व्हाइसरॉय म्हणून नमणूकहि केली होती पण नेटिव्ह ख्रिस्ती विरुद्ध लुझो इडियन ख्रिस्ती असे स्वरूप या नेमणुकीला येऊन लुझो इडियनानी त्याला पदच्युत करून कैदेत टाकविले पुढे सत्तरी तालुक्यात अनेक बडे झाली त्यात १८९५ त दादा राणे याच्या आधिपत्याखाली जे झाले ते मोडण्यासाठी तत्कालीन पोर्तुगालच्या राजाचे बध दो आफोसु हे गोव्यास आले होते व काही काळ व्हाइसरॉयाच्या जागेवरहि राहिले होते त्यावेळी त्याचे स्वागत ख्रिश्चनाप्रमाणेच हिदूनी देखील केले व त्यानीही गोड गोड आश्वासने दिली तथापि येथील सरकारी अधिकारी ख्रिस्ती धर्माधिकाऱ्याच्या परधर्मद्वेष्टया लहरीना बळी पडण्याची परपरा पुरी तुटली नव्हतीच २० व्या शतकाच्या सुरुवातीसही हिंदूना त्याच्याकडून हरेक प्रकारचे उपद्रव व अपमान भोगावे लागत कुठे हिदू देवालयासमोर ख्रिस्ती प्रेतयात्रा मुद्दाम उभ्या कर, तर कुठे देवळाच्या मध्यभागीं ख्रिस्तमदीर उभार, श्रीचद्रेश्वर देवालयाची पारोडे गावात येणारी परपरागत पालखी हमरस्ता सोडून तेथील ख्रिस्त मदिराच्या मागून आड वाटेनेच नेली पाहिजे असा हट्ट सरकार विसाव्या शतकात १९१० पर्यंतहि घेऊन बसले होते ! पण इतक्यात म्हणजे १९०८ मध्ये पोर्तुगालचा राजा दो कार्लुश लोकसत्तेच्या पुरस्कर्त्याकडून मारला गेला, आणि १९१० त पोर्तुगीज प्राजक स्थापन झाले. तेव्हां

कायद्याने सर्व धर्मीयास सारखे सरक्षण देण्यात आले १९१७ पासून स्थानिक लोकाना राज्य-कारभाराचे काही हक्कही बहाल करण्यात आले, आणि त्यामुळे धार्मिक छळ किवा अपमान सोसण्याची अघोर शिक्षा जी हिदूना जवळ जवळ चार शतकेपर्यंत भोगावी लागली ती रद्द झाली' तथापि त्याच्या सस्कृतीच्या अनेक अगाना जो मान व जे सरक्षण मिळणे न्याय्य आहे ते त्याना अद्यापहि मिळू लागलेले नाही !

* * *

## गोव्यांतील हिदूंविरुद्ध केलेले जुलमी कायदे

मार्च १५४६ रोजी गोव्याचे अधिकाऱ्यास हुकूम आला त्यातील वाक्ये ––

"गोव्यातील मूर्तिपूजेचा नाश करा, हिदूची देवळे पाडून टाका, हिदूना उत्सव करण्यास बदी करा, ब्राह्मणाना हद्दपार करा, व जो कोणी लाकूड, दगड किवा धातूची मूर्ति करील त्याला शक्य असेल तितके कडक शासन करा व राज्यातील अधिकाराच्या सर्व जागा फक्त किरिस्तावासच द्याव्या त्यापैकी एकही जागा हिदूस देऊ नये"

१५५७ मध्ये गोव्यातील पाद्र्यानी गोव्याच्या गव्हर्नराची भेट घेतली त्याच्या सभाषणातील कांही वाक्ये व त्यानतरचे गव्हर्नराचे हुकूम ––

" . हिदूच्या पाखडाचा उच्छेद करून आपली कीर्ति अजरामर करावी अशी आपणापाशी विनति आहे . जर तुमच्या पूर्वीच्या अधिकाऱ्यानी ख्रिस्ती धर्म स्वीकारणाऱ्यास सवलती दिल्या असत्या, तर सर्व हिदुस्थान इतक्यात ख्रिस्तमय झाला असता"

हुकूम –"आमच्या राज्यातील अनेक खात्यात ब्राह्मण व हिंदू नोकरीवर आहेत त्यामुळे आमच्या आकाशातील बापाच्या कार्यांत फार विघ्ने उत्पन्न होत आहेत म्हणून सर्व कचेऱ्याच्या अधिकारी वर्गास मी असा हुकूम करितो की त्यानी ब्राह्मण व हिंदू जे नोकरीवर असतील त्यास एकदम कामावरून दूर करून टाकावे. एकही हिंदु कोणत्याही कामावर असता कामा नये. सर्व नोकऱ्या किरिस्तावासच दिल्या जाव्या जो कोणी या हुकुमाप्रमाणे वागणार नाही त्यास नोकरीवरून कमी करण्यात येईल. हा हुकूम प्रसिद्ध झाल्यानतर जर एकादा ब्राह्मण किवा हिदु नोकरीवर आहे असे आढळून आले, तर त्याची मालमत्ता जप्त करण्यात येईल, त्याच्या मालमत्तेपैकी अर्धी मालमत्ता ही माहिती देणारास बहाल करण्यात येईल व अर्धी सरकारात जमा होईल"

१५५९ मार्च मधील कायदा ––

(१) जर एकादा हिदु मेला व त्याच्या स्त्रीने व मुलानी ख्रिस्ती धर्म स्वीकारला नाही, तर त्याची सर्व मालमत्ता जप्त करून ती ख्रिस्तीधर्म स्वीकारणारास देण्यात येईल (२) पोरके हिंदू जर ख्रिस्ती धर्म न स्वीकारतील तर त्याची सर्व मालमत्ता जप्त करून ती बाटणाऱ्यास देण्यात येईल

२५ मार्च १५५९ ––

(१) गोवे शहरात किवा लगतच्या प्रदेशात जी हिदूची देवळे असतील, ती जाळून भस्म करण्यात यावी (२) सर्व मूर्ती फोडून टाकण्यात याव्या, यापुढे कोणीही लाकडाची, दगडाची, मातीची, धातूची अगर कसलीही मूर्ति करू नये (३) हिदूना यापुढे खाजगी किवा सरकारी उत्सव करू देऊ नयेत (४) जर एकाद्या खाजगी जागेत मर्ती असल्याचा सशय येईल तर त्याची सर्व मालमत्ता जप्त करण्यात यावी ही जप्त केलेली मालमत्ता ख्रिस्ती मदिरास देण्यात यावी. (५) जे हिंदू इतकेही करून मूर्तीची पूजा करतील, त्यास पकडून जबरदस्तीने गलबतावर खलाशी करण्यात येईल

८ जन १५६० ––

"गोवे शहराच्या व बेटाच्या हद्दीत जे सोनार असतील त्या सर्वांनी दहा दिवसाच्या आंत आपल्या बायका, मुले, पोषाख व जिंदगी यासह हद्दीच्या बाहेर जावे असे त्यानी न केले तर त्याची सर्व इस्टेट जप्त करण्यात येईल" सोनार हे मूर्ति

निर्माण करीत असत म्हणून त्यांची अशी दशा करण्यांत आली.

६ मार्च १५६३ रोजी पोर्तुगालच्या बादशहा-कडन फर्मान आले त्यावरून २७ नोव्हेंबर १५६३ रोजी गोव्याच्या गव्हर्नरानी केलेली घोषणा:—

" पोर्तुगीज मुलखातील सर्व हिदूनी आपापल्या जमिनी व इतर इस्टेट एका महिन्याच्या आत किरिस्तावास विकून बाहेर जावे असे जे न करतील त्याची सर्व मालमत्ता जप्त करून त्यास जन्मभर कैदेत ठेविले जाईल फक्त शेतकरी, वैद्य, सुतार, लोहार, दुकानदार व भडारी याना हा कायदा लागू नाही " यावरून सोनार व ब्राह्मणच काय ते उरले हे स्पष्टच आहे

डिसेबर ४, १५६७— "हिदूनी आपले धर्मग्रथ आपणाजवळ बाळगू नयेत, घरात ठेवू नयेत जे ख्रिस्ती प्रवचनास हजर न राहतील त्यानी अमूक दड द्यावा. त्यास दड भरण्याचे सामर्थ्य नसेल त्याना उघडया पाठीवर वेताचे फटके मारण्यात येतील ! ! "

१५ डिसेबर १५७५ — कोणीही हिदु शहरातून घोड्यावर बसून, वाहनात बसून किवा छत्री घेऊन फिरेल तर त्याच्या त्या वस्तू जप्त केल्या जातील व वर ५० रुपये दड होईल

१५ फेब्रुवारी सन १५८१ चा पोर्तुगालच्या राजाचा हुकूम —

यापुढे हिदूना धर्मकृत्ये करण्यास मनाई करावी. हिदूंना खडास जमिनी देऊ नयेत. सरकारी नोकरीस ठेवू नये व एकादा हिदु मेला तर त्याची मालमत्ता त्याचा मुलगा ख्रिस्ती झाला तरच त्यास मिळावी नाही पेक्षा जो त्याचा नातलग ख्रिस्ती होईल त्यास मिळावी "

१५७५ त ख्रिस्त्यानी एक धर्मपरिषद गोव्यास भरविली तीत हिंदूनी छत्रीसुद्धां वापरू नये असे ठरविले.

या कायद्यांचा परिणाम:—१५९५ च्या रिपोर्टांतील नोंद— " सुपीक, निरोगी व लोकवस्तीने गजबजलेल्या साष्टी प्रातातील सर्व प्रदेश जवळ जवळ निर्जन झाला असून तो लागवडीस आणण्यास तेथे कोणीही राहिला नाही केवळ लढायामुळे असे झाले नसून त्याना बाटविण्यासाठी जे अत्याचार व जुलूम ख्रिस्ती लोकानी केले त्यामुळे हे सर्व लोक निघून गेले

१६३४ मध्ये गोव्यातील अधिकाऱ्याने पाद्रयाच्या विरुद्ध केलेली तक्रार —"पाद्री हे न बाटणाऱ्या हिदू स्त्री-पुरुषाना ख्रिस्ती देवळाच्या समोर फटके मारीत असतात"

१६२० मध्ये जुना असलाच एक कायदा रद्द होऊन पुढील कायदा झाला —

गोवे प्रातात कोणाही हिदूने केव्हाही आपल्या हिदू पद्धतीने विवाह करू नये केला तर त्यास १००० अशर्फ्या दड होईल या दडापैकी तिसरा हिस्सा फिर्यादीस दिला जाईल व बाकीचा आरमाराकडे खर्च होईल

१६७८.—हिदनी आपले लग्नविधी आपल्या घरात करावे त्या वेळी त्यानी घराची सर्व दारे लावून घ्यावी घराबाहेर सरकार सशस्त्र पहारा ठेवील व सर्व पुरोहित वगैरेना आत जाण्यास बदी केली जाईल

याही कायद्याची दुरुस्ती झाली ती अशी.—

हिदूनी आपली लग्ने गोवे प्रातातील जमिनीवर करू नयेत, तर नद्यामध्ये होडया घालून त्या होड्यात करावी होड्यात लग्न केले तर त्यास सरकारची हरकत नाही, फक्त आसपास कोणाहि किरिस्तावास हा सोहाळा दिसता कामा नये ! ! !

—पुरुषार्थ अक ७ व ८—१९३४.

* * *

## ख्रिस्त्यांची स्त्रियांमार्फत प्रचाराची युक्ति

हिदुस्थानात आलेल्या मिशनऱ्याच्या हिदूस बाटविण्याच्या ज्या अनेक युक्त्या आहेत त्यापैकीच हिदूच्या घरी बाटविलेल्या बायका पाठवून त्याच्या मार्फत हिदू स्त्रियास बायबल शिकविणे ही एक होय. या बाडग्या बाया नुसतेच बायबल शिकविण्यास येतील तर त्याना बहुतेक

घरातून मज्जावच होण्याचा सभव, म्हणून या बायाना बायबलापूर्वी शिवणकाम, विणकाम, लिहिणे आणि वाचणे या गोष्टी शिकवन प्रथम विश्वास सपादन करावा लागतो, आणि नतर बायबल दीक्षा सुलभतेने देता येते

—केसरी २१–८–१९२३

—मद्रासच्या ख्रिस्ती धर्माचा प्रसार करणाऱ्या एका बाटग्या बाईने स्वत ची अनुकपनीय स्थिति मद्रासच्या स्वराज्य पत्रात वर्णन केली आहे त्यावरून इतर स्त्रियाची कल्पना सहजच येईल ती बाई लिहिते "मी मद्रास शहरात घरोघर हिंडन बायबल शिकविण्याचे काम करिते दररोज मला निदान सहा घराचे तरी उबरे झिजावे लागतात दर महिन्याच्या पहिल्या शनिवारी सकाळी आठ वाजता आम्ही पगारासाठी मिशनचे जागेत जमतो पगारापूर्वी प्रार्थना होते. पगाराचा वटवडा करताना (आम्हास) शिव्याची लाखोली वाहण्यांत येते ख्रिस्ताकडे आत्मे वळवून न आणिल्याबद्दल व अगावर डागिने घातल्याबद्दल बहुधा ही पुष्पाजलि असते. बाई गोऱ्या व आमच्या वरिष्ठ म्हणून आम्ही ती बोलणी सहन करितो पण उलट बाई मजकुराची मिजास कशी असते ती पहा! त्याचे ते राजवाड्याच्या तोलाचे घर, सोन्याचे घड्याळ व छेडा, पधरा रुपये किमतीची त्याची ती टोपी, अठरा रुपयाचा बूट व शभर रुपयापर्यंतचा झगा! हा थाट ठेविल्याबद्दल बाईची पूजा कोणी बाधावी? तेहि असो, पण आम्हा गरिबाचा सबध पगार त्याच्या बुटाच्या किमतीइतका! तो तरी आम्हास सगळा मिळावा! त्यातूनहि दुष्काळ फड गरीब फड या नावाखाली आमचे २॥ रु कापून घेऊन उरलेला पैसा आमचे हातावर ठेवण्यात येतो"

—केसरी ता २१–८–२३

---

# धर्मांतरानें सामाजिक उन्नति होते हें खोटें

वेडगळ कल्पना व भोळया समजुती या इतर समाजांतहि वाटेल तितक्या आहेत. त्यांपैकीं कांहीं नमुन्यासाठीं पुढें दिल्या आहेत. खिस्त्यांच्या दिल्या नाहींत याचें कारण असें कीं, त्यांना ज्या समाजांतून खिस्ती बनविलेलें असतें त्या समाजांतील सर्व भोळवट मतें खिस्ती बनल्यावरही त्यांनीं उराशीं बाळगलीं आहेत. मुसलमानांतील समजुती मात्र पुढें दिल्या आहेत. तसेंच हिंदूंतील जातिभेदाचा जो डंका इतर समाज माजवीत आहेत तो त्यांच्या समाजासंबधानेहि वाजवितां येण्यासारखा आहे. जातिभेद नसावा व सर्वांना सारखें लेखावे असें त्यांच्या धर्मांत कागदोपत्रीं लिहिलेलें असेल; पण व्यवहारांत तें खरें असें कोणी म्हणेल तर ती शुद्ध बतावणी आहे. मुसलमानांतील अनेक बेटीबंद जातींचीं उदाहरणे इंग्रज लेखकांनीं दिलेलीं आहेत आणि "जात ठेवा पण आमच्या धर्मांत या" असा आग्रह मिशनरी लोक आपल्या इकडील लोकांना करतात हें खुद्द सरकारी गणना कोशांतच नमूद झालेलें आहे. आमच्या येथील हें इतक्या जातींचें भरताड असेंच ठेवावयाचें कीं काय हा विचार आमचा आम्ही करूं; पण आम्हाला शहाणपण शिकविण्याइतपत अभेदाचा आणि समतेचा व्यवहार या इतर समाजांत नाहीं हें हिंदूंनीं खास समजून राहावें.

## मुसलमानांतील जातिभेद

इस्लामी धर्माच्या तत्त्वानी त्याच्या कळपातील सर्व लोकाना सारखेच लेखिले असले तरी हिदुस्थानात मात्र तसे नाही हिदूच्य बरोबरीने व अगदी त्याच्याच तत्त्वावर जातिभेदाचे तत्त्व इकडील मुसलमानात शिरलेले आहे ज्याप्रमाणे मागून आलेले आर्य प्रथम आलेल्या आर्यांपेक्षा आपण कोणी श्रेष्ठ आहो असे समजत, त्याचप्रमाणे परदेशाहून आलेले मुसलमान सुद्धा आपला दर्जा वरचा समजतात तसेच हिदु व मुसलमान या दोनही समाजात दर्जा पूर्वेकडून पश्चिमेकडे वाढत जातो. हिदूत जसा ब्राह्मण श्रेष्ठ, तसा मुसलमानांत अरब, पर्शियन, अफगाण, किवा, मोगल श्रेष्ठ गणिला जातो हिदूप्रमाणेच प्रतिलोम विवाह मुसलमान गौण समजतात अनुलोम विवाह चालतो मुसलमानात सय्यद हा शेखाची मुलगी करील पण शेखाला सय्यदाची मुलगी मात्र मिळत नाही तसेच उच्च वर्णीय परदेशी मुसलमान व इकडील सामान्य मुसलमान याच्यातील विवाह त्याज्य समजतात, व झालाच तर ज्या प्रातात उच्चनीच भाव कमी आहे अशा ठिकाणी आणि ते सुद्धा दारिद्र्यामुळे असा विवाह होऊ शकतो फार तर मुसलमान हिदूच्या इतक्या जाति मर्यादा काटेकोर वृत्तीने पाहात नसतील, परतु त्यामुळें जातिभेदाचे अस्तित्व कमी होत नाही. उत्तर हिंदुस्थानातील मुसलमानात एक म्हण रूढ आहे. "गुदस्ता मी जाहोला होतों,

यंदा मी शेख आहे. व पुढील साली भाव वाढले तर सय्यद होईन " यावरून असे वाटेल की, परिस्थितीवरून जात बदलत असेल पण तसे नाही. मि. गेट लिहितात "Promotion is not so rapid in reality as it is in the proverb."

वरच्या मुसलमानाने आपली मुलगी नेहमी आपल्यापेक्षा उच्च अशा मुसलमानाच्या घरी द्यावी अशी रूढी आहे परतु स्वजातीय सबध ठेवण्याकडेच त्याचा कल असतो खालचे मुसलमान मात्र आपसातच विवाह सबध ठेवतात जातीची पद्धत त्याची व हिदूची सारखीच आहे जातीच्या सस्था व पचायती त्याच्यात आहेत, व वाळीत टाकण्याचीही चाल त्याच्यात रूढ आहे

श्रीयुत गेट याच्या मताप्रमाणे बगाल्यात मुसलमानाच्या मुख्यत दोन जाती आहेत (१) अश्राफ किवा शेरीफ व (२) अजलाफ म्हणजेच अश्राप वरील पहिल्या जातीचे मुसलमान आपणास उच्च मानतात हे मुख्यत परदेशहून आलेले व उच्च वर्णीय हिदूपैकी जे बाटले त्याचे वशज होत दुसरे जे अजलाफ त्याच्या नावाचा अर्थच 'हीन' असा होतो त्याना 'कमीना,' 'इतार,' 'रेझिल' 'कुचकामी' अशीही सबोधने आहेत याच्यात निरनिराळ्या कामधद्यावरून वेगळे ओळखले जाणारे (Functional Groups) मुसलमान, हलक्या हिदूपैकी बाटलेले वगैरे लोक मोडतात या जातीच्या लोकानी पूर्व बगाल्यात आपणास शेख असे नाव घेतले आहे धद्यावरून पडलेल्या जातीची नावे पुढीलप्रमाणे आहेत जोहोला—विणकर, धुनिया—पिजारी, कुळु—तेली, कुञ्रा, भाजी विकणारे, हजाम, दर्जी वगैरे—या सर्व-जाती अजलाफ मध्येच मोडतात इतकेच नव्हे तर काही ठिकाणी मोगल व पठाण यानासुद्धा अजलाफच समजतात

परदेशी जन्मलेला व येथे जन्मलेला यावरून सुद्धा मुसलमानात फरक पडतो अश्राफ मुसलमान हलकी कामें करीत नाही, किवा नागर धरीत नाही. सय्यदाचा धदा उपाध्यायाचा असतो; व पठाण आणि मोगल आपणांस क्षत्रिय समजतात.

या शिवाय आणखीही एक तिसरी जात आहे. त्याना अझराल म्हणजे नीच म्हणतात त्यांच्यांत हलालखोर, लालबागी, अबदल व बेदिया यां-सारख्या पोट जाती आहेत या जाती इतरापासून पूर्ण अलिप्त राहातात याना मशिदीत मज्जाव असतो याची मसणवट वेगळी असते

—THE PEOPLE OF INDIA
*By H. H Risley* च्या आधारे

* * *

## त्रावणकोर संस्थानांतील ख्रिस्ती

अलीकडे त्रावणकोर सस्थानामध्ये उच्च-वर्णीय ख्रिश्चनाचे फार प्रस्थ माजले आहे. या सस्थानामध्ये त्या लोकानी आपली जितकी प्रगति करून घेतली आहे तितकी कोणीहि करून घेतली नाही पण या ख्रिस्त्यामध्येहि स्पृश्यास्पृश्य वाद इतका माजला आहे की, हे ख्रिश्चन अस्पृश्य ख्रिश्चन लोकाशी कसलाहि सबध ठेवण्यास तयार नाहीत नुकतीच अस्पृश्य लोकाची एक परिषद तेथील कौन्सिलचे एक माजी सभासद श्री. जोसेफ कुज पडियार याचे अध्यक्षतेखाली पार पडली अध्यक्ष व स्वागताध्यक्ष यानी आपल्या भाषणात अस्पृश्य ख्रिश्चन लोकाना स्वतत्र वर्ग म्हणून मान्यता द्यावी असा उल्लेख केला. गेल्या शभर वर्षांत त्रावणकोरची लोकसख्या साडेपाच पटीनी वाढली आहे तर ख्रिश्चनाची सख्या पधरा-पटीनी वाढली आहे ख्रिश्चन लोकाची ३०१ चर्चेस होती ती १०० वर्षांत २७२७ झाली आहेत. दरसाल दहा हजार हिदु ख्रिश्चन धर्मामध्ये जात आहेत ख्रिश्चन धर्माच्या दृष्टीने ही प्रगति म्हणून मोठ्या आढ्यतेने सागण्यात येत असून अस्पृश्य ख्रिश्चन समाजाचे हाल मात्र कुत्राहि खात नाही त्याना वरिष्ठ ख्रिश्चन अस्पृश्यच समजतात. त्याना ख्रिश्चन चर्चेसमधून प्रार्थनेला बदी असून स्मशानाचाही उपयोग करून दिला जात नाही

—विश्वोद्धार २५ मे १९३५

## मुसलमान लोकांच्या धर्मभोळे-पणाच्या कल्पना (Superstition)

(The Tribes and Castes of Bombay Vol. III या पुस्तकावरून.)

पृष्ठ ७६

'मार्गी मरदुद ना फतिहा ना दाऊद' या उर्दू म्हणीवरून मूलबाळ नसलेल्या इसमाची स्थिति प्रगट होते मुलगा झाल्याने मुक्ती मिळते व श्राद्ध पक्ष करण्यासाठी मुसलमानाना मुलगा लागतो हेही यावरून सिद्ध होते

मूल होण्यासाठी सिद्धाकडून मत्र व ताईत घेतात. कागदावर मत्र लिहून तो कागद पाण्यात कोळून ते पाणी पितात आमिलानी वेलदोडे लवगा वगैरे देवादिकाच्या नावानी मत्रून दिल्याने वाझपणा नाहीसा होतो असे मानतात.

पृष्ठ ७७

मूल होण्यासाठी स्त्रीच्या ओटीपोटावर अगर गळयात बाधण्यासाठी दोरा देतात

गर्भ रहावा म्हणून स्त्रीच्या जननेंद्रियावर अगर पुरुषाच्या कमरेवर बोटानी नाम अगर मत्र काढतात

गर्भ रहावा म्हणून ताईत धुवून पितात, अगर ते पाणी स्नानाच्या पाण्यात मिळसतात

अहमदाबाद येथील शहा अलमच्या झाडाचे फळ खाल्ल्याने गर्भ रहातो अशी कल्पना आहे

जिला मूल हवे आहे अशी स्त्री एकाद्या साधु-सताच्या समाधीजवळील जाईच्या वेलाखाली जाऊन पदर पसरून बसते जितकी फुले पदरात पडतील तितकी मुले होतील असे ती मानते

पहिले मूल दुसऱ्या मुलाच्या मुळावर असते अशी समज आहे म्हणून दुसऱ्या बाळतपणानतर दुसऱ्या मुलावरून धान्य ओवाळून ते पहिल्यास खावयास देतात

मुलास जन्मत च दात असले तर आई किंवा बाप यापैकी कोणी तरी खास मरणार असे समजतात

पृष्ठ ७८

एकाद्या फकिराच्या कृपेने गर्भ राहिल्यास ती स्त्री अगावर नेहमी चाकू बाळगते अमावास्या, गुरुवार वगैरे दिवशी किंवा तिन्ही साजा बाहेर पडत नाही तसेच झाडी, नदीकाठ वगैरे तिला बाधक समजले जातात

गर्भिणी स्त्री माडवात व लग्नसमारभ, मर्तिक इत्यादिकास जात नाही, तसेच वेस व नदी ओलाडीत नाही

ग्रहणात गर्भिणीने, तिच्या नवऱ्याने व सोय-ऱ्यानी खाणे पिणे वर्ज्य करावे व काही मोडू तोडू नये असे आहे

सात पदरी रेशमी दोरा मुल्ला मतरून गर्भिणी स्त्रीस कमरेस बाधावयास देतो या दोऱ्याला जितक्या महिन्याचा गर्भ तितक्या गाठी असतात या दोऱ्याने गर्भ सुरक्षित राहातो

गर्भिणी स्त्री सुरमा, मेंदी वगैरे लावीत नाही तसेच नरवटी रताळी वगैरेस शिवत नाही तसेच सातव्या महिन्यानतर तिने दागिने घालावे असे आहे

पृष्ठ ७९

मुलगा झाला तर सुईण 'एका डोळयाने आधळी मुलगी झाली असे सागते' मुलगी झाल्याने वाईट वाटत नाही

पृष्ठ ८०

सहाव्या दिवशी सकाळी कुराण उघडून निघा-लेल्या पानावरील तिसऱ्या ओळीतील पहिल्या शब्दाच्या पहिल्या अक्षराने सुरू होणारे नाव ठेवण्याचा प्रघात आहे

पृष्ठ १

सातव्या, चौदाव्या अगर २१ व्या दिवशी मुलाची हजामत करितात व मुलीस एक बकरा व मुलाबद्दल दोन बकरे कापतात

पृष्ठ ८२

मूल ४॥ महिन्याचे झाले म्हणजे त्याला मोठ्या समारभाने मास खायला घालतात

* * *

(Mohommed and Mohommedanism By R. Bosworth smith, M. A)

## चालीरीति

प्राचीन अरब लोकात स्त्रियाना एकाच वेळी पुष्कळ पती असणे किंवा पुरुषाला पुष्कळ पत्न्या असणे सर्रास रूढ होते तीच गोष्ट पुनर्विवाहाची होती विशेषत पुरुषाला ही सवलत त्यातल्या त्यात जास्त असे Omm-Charjet या अरब स्त्रीला ४० पती होते असे वाचण्यात आढळते

पृष्ठ ८२

महमदाने बहुपत्नीकत्व किवा बहुपतित्व (पॉलिगमी) याची चाल तशीच ठेविली, फक्त तीपासून तोटे होऊ नयेत म्हणून सुधारणा केल्या (१९९) कुराणान्वये ४ स्त्रिया असल्या तरी चालतात (या सवलतीचे रूपातर हल्ली हक्कात झाले आहे एवढाच काय तो फरक ! ) पूर्वीच्या अरब लोकात स्त्रियाना कुच किमत असे त्याच्यातील काही रूढ वाक्प्रचार अमेरिकन मिशनऱ्यानी गोळा केले आहेत त्यातील स्त्रियाच्या सबधीचे तेवढे इग्रजीत खाली दिले आहेत महमदाने स्त्रियांना दिलेल्या सवलतींची व या प्राचीन वाक्प्रचाराची तुलना वाचकानीच करावी.

(1) " To send women before to the other world is a benefit. "

(2) "Obedience to women will have to be repented of "

(3) ' The heart of woman is given to jolly '

(4) "Women are the whips of Saitan."

नवरा बायकोच्या हाणामाऱ्या आपल्या समाजात आपणास परिचित आहेतच महमदाने योग्य प्रमाणात बायकोला शिक्षा करण्यास हरकत घेतली नाही स्त्रियाना कोडन ठेवणे त्याला समत होते पॉलिगमीसबधाने त्याने घातलेले नियम इतरासाठी होते तो स्वत त्यातून मुक्त होता युद्धात गुलाम म्हणून मिळविलेल्या स्त्रियाचा उपभोग घेण्यास त्याची मुभा होती, आणि त्याचे अनुयायी तर असल्या बाबतीत त्याचे अनुकरण करण्यास नेहमी सज्ज असत ! (पृष्ठ २०५)

---

# हिंदूंची प्रतिक्रिया

मुसलमानाप्रमाणें हिंदूनाहि धर्मासाठीं जबरदस्ती अगर जोराचा जशास तसा प्रतिकार करतां येणार नाहीं असें नाहीं. परंतु स्वभावत: त्यांचा कल कायदेशीर व सनदशीर इलाजाकडे असतो हें दंग्यांच्या हकीकतीवरून दिसून येतेंच. प्रत्यक्ष सत्ता हातीं असतांना सुद्धां अविचार न करतां सनदा मिळवूनच गोवधबंदी करविणें वगैरे प्रकार हिंदूनीं केलेले आहेत. उदाहरणादाखल महादजी शिंद्यांनीं मिळविलेली सनद येथें दिली आहे. हिंदूनीं प्रतिकार केल्याचीं इतरही कांहीं उदाहरणें दिलीं आहेत.

### हिंदूंना प्रतिक्रिया करतां येते, पण त्यांचे मार्ग भिन्न आहेत.

शहाअलम बादशहाने केलेला गोवधबदीचा हुकूम— (छ १३ जिल्हेज स ३१)

समस्त राज्यप्रबधक खिलाफतचे कार्यकर्ते, तसेच बादशहाच्या कृपेस पात्र असे अमीर व परगणा निहायचे शासक आणि प्रातोप्रातीचे कारभारी व जबाबदार अधिकारी या सर्वांस कळविण्यात येते की, बादशहाच्या कारभारात व मालिकगिरीत स्वामीची आज्ञा म्हणून या मुबारिक फर्मानाचे पालन अवश्य करण्यात यावे, आणि सर्वांनी स्पष्ट ध्यानात बाळगावे की, पशूसुद्धा विधात्याच्या सृष्टीतलेच जीव असून ते निरुपयोगी होत असे समजू नये त्यातहि विशेषत बैल व गाय हे प्राणी अगणित लाभ देणारे आहेत. कारण मनुष्य व पशू या दोघाचेही जीवन धान्याच्या पैदाशीवर अवलबन असून, गाय व बैल यांच्याशिवाय शेतीचे काम बिलकूल साध्य होणार नाहीं. यास्तव जनतेचा ससार व निर्वाह चालण्यास गाईची अत्यत जरुरी आहे यास्तव आमचे प्रिय पुत्र महाराजाधिराज माधवराव सिधिया बहादूर यांनी आमचेकडे विनति केली. त्यावरून आम्ही आपल्या उदार अतःकरणाने व हर्षपूर्ण दृष्टीने आमच्या समस्त राज्यभूमीमध्ये गोकुशीचा म्हणजे गो–हत्येचा परिपाठ सर्वथैव मना करीत आहो या आमच्या फर्मानाचा अमल इतउत्तर राज्यातील समस्त अधिकाऱ्यानी सावधगिरीने प्रयत्नपूर्वक करून ही आज्ञा पाळीत जावी की जेणेकरून कोणतेही नगर, कसबा, गाव यात गोहत्येचे नावसुद्धा दिसू नये इतक्या उप्पर जर कोणी इसम या आज्ञेच्या विरुद्ध वागून गोवधाच्या पापात लिप्त होईल तर तो बादशहाच्या कोपास पात्र होऊन दड पावेल

(नक्कल फर्मानिशाही दरबाब मुमनियत गौकुशी जी महाराज सिधियाचे दरबारात पितळेवर खोदून ठेविलेली आहे )

अकबर व बाबर यानी अशाच तऱ्हेची फर्माने काढिली होती —केसरी ता १७–१–२८

* * *

### अहमदाबादचा दंगा १७१४

अहमदाबाद येथे हिदू व मुसलमान याची घरे शेजारी होती एकदा हिदूने होलिकोत्सव केला तेव्हा मुसलमानाने तक्रार केली, परतु आपले घरात आपल्या इच्छेप्रमाणे वागण्याचा हक्क आहे असे हिदूने उत्तर दिले पुढे हजरत अल्लीचा उत्सव

आला. तेव्हां त्या मुसलमानाने खुनसाने आपल्या घरी गोवध केला व मास गरिबास वाटण्याचे ठरविले हे समजताच हिंदूनी त्याचे घरावर हल्ला केला. त्यात त्या मुसलमानाचा चौदा वर्षांचा मुलगा हाती लागला त्यास हिंदूनी गोवधाचे जागी ठार केले मुसलमानानी काजीकडे दाद मागितली तेव्हा काजी लपून बसला त्याचे घर मुसलमानानी जाळले पुढे बरेच दिवस अशी गडबड झाली परतु पुढे फैसला झाला त्यात मुसलमानानीच आगळीक केली असा निर्णय झाला —केसरी ३०।१०।२८

—मशिदीवरून वाद्ये वाजविण्यास कोणत्याहि प्रकारची हरकत नाही अशा आशयाचा आधार बडोदा येथील मौलवीनी श्रीमत सयाजीराव याना दाखवून दिल्यावरून महाराजानी सस्थानातील मशिदीवरून वाद्ये वाजविण्यास कसल्याहि प्रकारची बदी नसल्याचे एक आज्ञापत्रक नुकतेच काढले असल्याचे कळते —केसरी ता ११।९।३४

## येरवड्यांतील हिंदु कैद्यांचा अन्नसत्याग्रह

येरवडा तुरुगाच्या प्रत्येक सर्कलमध्ये अनेक वर्षांपासून तुळशी वृन्दावने आहेत आणि बऱ्याच ठिकाणी शकराची पिडी किवा मारुतीची मूर्ती बसविलेली आहे या तुळशीला किवा देवाला पाणी घातल्याविना अन्न ग्रहण करावयाचे नाही असा अनेक हिंदू कैद्याचा शिरस्ता पडलेला आहे गेल्या महिन्यात सुपरिटेंडेटने एकदम ती वृन्दावने व मूर्ती काढून टाकण्याचा हुकूम केला व त्याची अम्मलबजावणी सक्तीने सुरू केली त्या वेळी हिंदू कैद्यानी परोपरीने विनवणी केली तरी तिचा उपयोग होईना हे पाहून सुमारे५००।६००कैद्यानी अन्नसत्याग्रह सुरू केला व कोणत्याहि प्रकारे शिस्त न मोडता कामहि कमी केले नाही हिंदु कैद्याचा हा हटभाव पाहून सुपरिटेंडेटने ठराविक ठिकाणी ठराविक आकाराची वृन्दावने व मूर्ती बसविण्यास परवानगी दिली येवढ्यावरहि कैदी सतुष्ट नव्हते परतु सेनापति बापट यानी उपदेश केल्यावर वन्दावने बाधून त्यात तुळशी लावून त्याची पूजा व आरती झाल्यावर कैद्यानी अन्न ग्रहण केले व सत्याग्रह सपला केसरी ता. ३–२–१९२५

—लाहोर जिल्ह्यातील बडाळे नांवाच्या एक खेड्यातील एका हिंदु जमिनदाराने मसलमानाची एक जागा आपल्या ताब्यात घेऊन तेथे दुसरी एक इमारत बाधण्याचे काम चालविले तेव्हा मुसलमानानी सदर जागा धार्मिक कार्यासाठी बऱ्याच वर्षांपासून उपयोगात असल्याचे कारण पुढे करून इमारत बाधण्यास हरकत घेतली व जमिनदारावर हल्ला केला. प्रतिकारार्थ त्याने त्याच्यावर गोळ्या झाडल्या गोळीबारात ५ इसम जखमी झाले आहेत पोलीस अधिकाऱ्यानी चौकशी सुरू केली आहे

—केसरी ता २१–९–३४

—पुणे रविवार पेठेत शिपी समाजाच्या धर्मशाळेची दुरुस्ती चालली असता तेथे एका कोपऱ्यात पिराचा दगड असल्याबद्दल मुसलमानानी तक्रार केली या सबधात उभय ज्ञातीतील पचानी जागा समक्ष पाहिली व त्यासबधाने पुढीलप्रमाणे निर्णय उभय ज्ञातीतील प्रमुखाच्या समतीने झाला "वादाची जागा धर्मशाळेच्या मालकीची आहे ती जागा इमारतीत सामील करून त्यावर भित बाधावी पिराचा जो दगड दाखविण्यात आला त्याचा नाश न करता तो भितीच्या आत कायम ठेवावा व तो बाहेरून दिसेल अशा बेताने एक जाळी लावावी तेथे पूजा करण्याचा वगैरे हक्क मुसलमानास नाही"

—केसरी ता १४–१२–३४

—कोपरगाव येथे उत्तर घाटावर विठ्ठल रखुमाई, रामपचायतन येथील मदिरातील मूर्ती कोणी गुडाने काढून टाकून त्या जागी हाडके ठेवल्याचे आढळून आले या अत्याचाराचा निषेध करण्याकरिता सभा भरली तीत बहिष्कार पुकारण्याचा ठराव पास झाला गावकऱ्याची सभा भरली तीत अध्यक्षानी उघडपणे मुसलमानाचा सशय घेतला मुसलमान समाजाने या बाबतीत मुग्धता स्वीकारली आहे हिंदु जनता सर्वच बाबतीत बहिष्कार पुकारणार आहे

—केसरी ता ५ व ८–२–३५.

—नाशिक येथें होळीतील लाकूड एका मुसल-

मानाने लांबविल्यावरून हिंदु व मुसलमान यांच्यामध्यें भांडण होऊन एक मुसलमान ठार झाला
—केसरी ता २२-३-३५

—२८ मार्च रोजी गुजराथ प्रातातील कलोळ गांवी एका कुणब्याने पैशाच्या अडचणीस्तव आपली वायको ही माझी बहीण आहे असे सागून १९०० रु स एका मुसलमानास विकली बायकोस त्या मुसलमानाच्या घरी पोचविण्यासाठी तो कुणबी तिच्यासह चालला होता वाटेत एका हिंदूचे घर लागले त्यांत ती बाई घुसली व तिने आपली करुणकथा निवेदन केली त्या घरधन्याने तार करून तिच्या माहेरच्या माणसाम बोलाविले इतक्या थराला गोष्टी आल्या तेव्हा मुसलमानाने आपला करार पुरा करून घेण्याचा आग्रह धरला नाही बाईने कोर्टात नवऱ्यावर लग्नविच्छेदाचा दावा नोदविला आहे केमरी ५-४-३५

—लुधियाना येथे दरेशी कापोडच्या मरकारी जागेवर किल्ल्याच्या दक्षिण वाजूस वाधण्यात येत असलेल्या मशिदीस मनाई करण्यात यावी अशा तऱ्हेचा एक अर्ज दरेशी मोहोल्यातील हिंदूनी डेप्युटी कमिशनरकडे पाठविला आहे डेप्युटी कमिशनर, पोलिस सुपरिटेंडेंट प्रभृति स्थानिक अधिकाऱ्यानी मशिदीची जागा जातीने जाऊन अवलोकन केली ज्या ठिकाणी मशीद बाधण्याचे काम चालू आहे त्या जागेजवळ एक मोठे मैदान असून त्या ठिकाणी दरसालचे दसरा समेलन भरत असते —केसरी ता ३०-७-३५

—चपारण्य (बिहार) जिल्ह्यातील फेनहरा गावी महावीर झेंड्याची मिरवणूक ता ३ व ४ रोजी होती बकरइदच्या दिवशी काही अज्ञात इसमानी हिंदूच्या देवालयातील आवारात एका मारलेल्या कालवडीचे डोके आणून टाकिले होते त्यामुळे हिंदु-मुसलमानात तेढ उत्पन्न झाली होती ३-४ तारखेस महावीर झेंड्याची मिरवणूक असल्याने समारंभ शातपणे पार पाडण्यास हिंदु मुसलमानाची तडजोड सबडिव्हिजनल ऑफिसर यांनीं केली. ३ तारखेस मिरवणूक एका स्वतंत्र रस्त्यांतून शांतपणे पार पडली ता. ४ रोजी दुपारी एका हिंदूच्या टोळीने तडजोडीच्या अटी मोडून दुसऱ्या रस्त्याने मिरवणूक नेली दुसरी एक तीन हजारांची टोळी हातांत प्राणघातक शस्त्रे घेऊन मुसलमानाच्या इदग्यावर हल्ला करण्याच्या इराद्याने निघाली मिरवणुकीतील काहीनी सबडिव्हिजनल ऑफिसरचे हुकुमास न जुमानता इदग्याच्या भितीस लाथा हाणल्या जवळच्या खेड्यात हिदूचा जमाव वाढू लागला अधिकाऱ्यानी लोकाना परत फिरण्यास सागितले लोक फिरेनात तेव्हा गोळीबाराचा हुकूम झाला गोळीबारात ५ माणसे ठार व ७ जखमी झाली आता शातता आहे
—केसरी ता ९-८-३५

* * *

## शुद्धिकरणास सम्मत असे जुने पुरावे

### १ श्री. शंकराचार्यांचें आज्ञापत्र—

श्रीमत्परमहस श्रीकैलासक्षेत्रस्थित सिंहासनाधिरूढ श्रीविष्णु प्रयागतीर निवास ज्योतिर्मठाधीश्वर नित्यानदसरस्वती स्वामी मक्काम कसबे आगाशी तालुके वसई येथे कसबे मजकुरी श्री भवानीशकराचे देवालयात

परम शिष्य वर्ग शिरोमणि वेदमूर्ति ब्रह्मशास्त्र षट्कर्माधिकारी चतुर्वर्णस्य ज्योतिष्युपाध्येष्टाधिकारी ब्रह्मवृन्दवन्द्य रा रा पाडुरग हरी जोशी, पुरदरे आदिकरून वृत्यशी वास्तव्य तालुके वसई येथील यासी आज्ञा की, मागे फिरगी राज्यात महाराष्ट्र लोकापैकी कित्येक शूद्र जातीचे लोकांस बलात्काराने बाटविले त्याजवर श्रीमत पेशव्याचे राज्यात त्या बाटविलेल्यापैकी पेशवे सरकारास शरण गेल्यावरून श्रीमताहि धर्मशास्त्राप्रमाणे प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून महाराष्ट्र धर्मांत आणिले, आणि त्याजकडे शुभाशुभ कर्णेची आज्ञा तुम्हाकडे केली त्याप्रमाणे तुम्ही अविच्छिन्न चालविता पुढे मेहेरबान इग्रज सरकार बहादूरचे राज्यात राजहुकमतीने महाराष्ट्र धर्मांत लोक आहे त्याजकडे शुभाशुभ कर्मे तुम्ही चालवीत नाही असे कळले त्याजवरून चौकशी करून तुमचे चतुर्वर्णांचे यजमानाची आम्ही समजूत

करून तुम्हांस कोणी हरकत न करील अशी आज्ञा केली आहे, आणि साहेबाचे राज्यात महाराष्ट्र धर्मांत आलेल्या लोकापैकी तालुके वसई येथील राहाणारे व तालुके साष्टी येथील रायमुर्दे व खारी येथील लोकापासून आम्ही भिक्षा घेतली आहे, आणि त्यास तीर्थप्रसाद देऊन पावन केले आहेत त्यास आजपासून तुम्ही श्रीमत सरकारने शुद्ध केलेले लोकाकडे जशी शुभाशुभ कर्मे करिता तशी त्या लोकाकडे चालवावी अशी आज्ञा आहे कळावे मि चैत्र कृष्ण १३ त्रयोदशी भृगुवासरे शके १७९१ शुक्लनाम सवत्सरे

—नित्यानन्द सरस्वती दस्तुर खुद्द

२ श्रीमत्शकराचार्य डॉ कुर्तकोटी यानी मोपल्यानी बाटविलेल्या लोकाना परत हिंदु धर्मात घेण्याविषयी जो निर्णय केला तो प्रसिद्धच आहे

—केसरी ता २१ मार्च १९२२

* * *

**३ बाटलेल्या ब्राह्मणाची प्रायश्चित्त-शुद्धि.**

गगाधर रघुनाथ कुलकरणी मुक्काम इरसूल हा ब्राह्मण मोगलापाशी नोकरीला होता मोगलानी त्यावर बलात्कार करून त्याला बाटविला, नतर त्याला तीन महिने निर्बधात ठेवला मुसलमानाशी तेथे त्याचा रोटी-व्यवहार झाला मागाहून त्याला मोठा मनसब देऊन नोकरीला ठेवला त्याने पाच वर्षे चाकरी केली त्या पाच वर्षांत त्याने मोगलाशी रोटी-व्यवहार केला नाही पुढे पश्चात्ताप पावून तो आपल्या ज्ञातीस शरण आला व दरबारी प्रायश्चित्त मागू लागला ते सर्व वर्तमान राजश्री छदोगामात्य स्वामी यास कळविण्यात आले त्यानी कृपाळू होऊन प्रायश्चित्तास आज्ञा दिली त्याप्रमाणे त्याला शुद्ध करण्यात आले तीर्थयात्रा करून त्याला प्रायश्चित्त देण्यात आले व आमच्या पक्तीस भोजन देऊन त्याला शुद्धिपत्र दिले हा ब्राह्मण शुद्ध झाला तरी ह्याचेबरोबर तुम्ही अन्नोदकादि व्यवहार यथापूर्व करीत जावे जो कोणी याच्या ब्राह्मण्याविषयी सशय घेईल तो देवब्राह्मणद्रोही व महापातकी समजला जाईल

श्री शिवाजी महाराजानी मुधोजी निबाळकर यास जिजाबाईचे आज्ञेवरून पावन करून घेतल्याची हकीकत येथें देण्याची आवश्यकता आहेच असे नाही

* * *

## शुद्धिकरण चळवळीचा प्रसार

[ समाधानकारक नसले तरी शुद्धीचे कार्य आता थोड्याबहुत नेटाने सुरू झाले आहेच. तरी थोडीशी कल्पना येण्यासाठी पुढे शुद्धी करणाविषयी काही स्फुटे दिली आहेत ]

केसरी ता २५-१-२७

—नागपूर आर्यसमाजाने गेल्या आठवड्यात आठ माणसे हिंदू धर्मांत घेतली १५ वर्षांपूर्वी मुसलमान झालेल्या स्त्रीस तिच्या मुलीसुद्धा पावन करून घेण्यात आले

—पाच वर्षांपूर्वी मुसलमान झालेल्या बाबू शकर नावाच्या एका गृहस्थास रत्नागिरी हिंदू सभेकडून स्वधर्मात घेण्यात आले

—उमरावती येथे ता १५ रोजी दोन मुसलमान स्त्रीपुरुषास आर्यसमाजाने विधिपूर्वक स्वधर्मांत घेतले

—ता ९ रोजी जबलपूर येथे आर्यसमाजाने ९ माणसाच्या एका ख्रिस्ती कुटुबाला स्वधर्मांत घेतले

—रगून येथे हिंदू सभेने ता २६-१२-२६ रोजी एका मुसलमानास स्वधर्मांत घेतले ता ४ व ९ रोजीही मुसलमान झालेल्या एका ब्राह्मणास व शूद्रापैकी मुसलमान झालेल्या तिघास स्वधर्मांत घेण्यात आले

—राजपिपळा येथे हिंदू सभेची शाखा स्थापन झाली असून एका मुसलमानास शुद्ध करून घेण्यात आले

—खामगाव येथे ता १४ रोजी एक वर्षांपूर्वी मुसलमान झालेल्या शिवाजी नावाच्या एका मराठा जातीतल्या गृहस्थास हिंदु धर्मांत घेण्यांत आले

—नागपूर येथे दळवी नावाचे गृहस्थ आठ महिन्यांपूर्वी कांहीं आपत्तीमुळें सहकुटुंब मुसल-

मान झाले होते, त्यांस नुकतेच हिंदु धर्मांत घेण्यांत आले

--बिनीवाव (जि हुशारपूर) येथे लाला चुनीलाल यानी ८ ख्रिस्ती झालेली हिंदू घराणी व लाला देवराज यानी दोन मुसलमान स्त्रिया व १ मूल यास शुद्ध करून घेतले

केसरी ता १-२-२७

--मुरादाबाद येथे भरलेल्या भाटिया शुद्धिसभेने भरविलेल्या शद्धिसभेत २२ मलकाना रजपूत कुटुबाना शुद्ध करून स्वधर्मात घेण्यात आले

--श्रीक्षेत्र काशी येथे प मालवीय याचे अध्यक्षतेखाली सभा होऊन गाधीचे अस्पृश्योद्धारावर व्याख्यान झाले त्या वेळी ९६ डोम जातीच्या ख्रिस्ती झालेल्या मुलाना पावन करून हिदु धर्मात घेण्यात आले

--गोरखपूर येथे एका मौलवीस हिदु धर्माची महती पटून त्याने हिदु धर्माचा स्वीकार केला

--हल्द्वानी येथे ता १७-१८-१९ जानेवारी रोजी आर्यसमाजाचा मोठा उत्सव झाला त्या वेळी मुसलमान झालेल्या एका धोबी स्त्रीस स्वधर्मात घेण्यात आले

--ता १६ रोजी डेहराडून येथे स्वामी विचारानद यानी एका मुसलमान पतिपत्नीस पावन करून हिदु धर्मात घेतले

--अ भा शुद्धिसभेने कालीघाट कलकत्ता येथे ता १९ रोजी २० मुसलमान स्त्रीपुरुषास शुद्ध करून घेतले

--गोरखपूर येथे शुद्धिसभेने दोन मुसलमान पुरुष व दोन मुसलमान स्त्रिया याना हिदु धर्मात घेतले

--मुबई आर्यसमाजाने १ ख्रिस्ती व २ मुसलमान झालेल्या मुलास परत स्वधर्मात घेतले

--हिंदू मिशनचे स्वामी सत्यानन्द यानी कटवा येथील ३२ मुसलमान झालेल्या कुटुबाना पावन करून स्वधर्मात घेतले सदर कुटुंबात एकदर १४० माणसे आहेत

--ता १६ जानेवारी रोजी दरभगा येथे सहा स्त्रिया, एक पुरुष व एक वर्षाचें एक लहान मूल याना आर्यसमाजाने शुद्ध करून घेतले

--चन्दौसी येथील आर्यसमाजाने ७ वर्षांपूर्वी मुसलमान झालेल्या गृहस्थास पावन करून घेतले.

--भटिंडा येथील आर्यसमाजाने ता २६ डिसेबर रोजी दोन जन्मत मुसलमान असलेल्या इसमाना हिदु धर्मात घेतले व ता १६ जानेवारी रोजी ११ माणसाच्या कुटबाची शुद्धि केली

--खामगाव येथील न्यूज एजट मि नजिरअल्ली मिरसाहेब यास त्याच्या उत्कट इच्छेवरून ता २७ रोजी हिदुसभेने व आर्यसमाजाने पावन करून घेतले नाव सत्यप्रिय नरहरी असे ठेवण्यात आले

--रामपूर (जि अलिगड) येथील मुसलमान झालेल्या ६ जाटाच्या कुटुबाना तेथील हिंदुसभेने ता २५ रोजी स्वधर्मात घेतले

केसरी ता ८-२-२७

--हैद्राबाद (सिध) येथे गोरखपूरचे एक मौलवी शुद्ध होऊन त्यानी हिदुधर्म स्वीकारला.

--जालदर येथे ३ मुसलमानाना शुद्ध करून घेण्यात आले दोघे जन्मत मुसलमान होते

--आग्रा शुद्धिसभेने ता २५ जानेवारी रोजी साधन या गावी ५० मुसलमानाना शुद्ध करून घेतले

--दिल्ली शुद्धिसभेने ता २५ रोजी ५ इसमाच्या एका कुटुबास शुद्ध करून घेतले

--प हरी प्रकाश यानी ता २५ रोजी कपसा जि मिरज येथे एका मुसलमानास शुद्ध करून घेतले व रामलाल पाडे यानी वरील गावी एक मुसलमान कुटुब स्वधर्मात घेतले

--दिल्ली आर्यसमाज सदर बाजार या सस्थेने ता २६ रोजी मुनशी कासिम हुसेन यास शुद्ध करून घेतले

--पाटणा येथील आर्यसभेने नुकत्याच बाटून मुसलमान झालेल्या एका इसमास परत स्वधर्मात घेतले व त्याच्या पूर्वीच्या गोप जातीने मोठ्या प्रेमाने त्यास आपल्या जातीत घेतले.

—आरा (बिहार) येथे ७ मुसलमानाच्या दोन कुटुबास बाबू महेश प्रसाद यांनी हिदु धर्मांत घेतले.

—जबलपूर येथे मि जे एस् सभा यानी ५ इसमास शुद्ध करून हिदु धर्मांत घेतले

—ता ३० रोजी मुबई आर्यसमाजाने मौ अबदुल फैज नावाच्या एका इस्लाम धर्मप्रचारकास शुद्ध करून हिदु धर्मांत घेतले

—ता २८ रोजी डेहराडून हिदुसभेने २ मुसलमान स्त्री पुरुषास हिदु करून घेतले

—अकोट (वऱ्हाड) येथे ता २ रोजी बरेच दिवस यवनी मस्कार झालेल्या एका तेली जातीच्या स्त्रीस शुद्ध करून स्वधर्मांत घेतले

—खामगाव आर्यसमाज व हिदुसभा यानी रीवा (बुदेलखड) येथील क्षत्रिय भाट जातीच्या एका स्त्रीस पावन करून स्वधर्मांत घेतली शुद्धीनतर तिचा वेदोक्त विवाहहि झाला

—ता. २ रोजी दिल्ली येथे अ भा शुद्धिसभेने सहा मुसलमानाच्या एका कुटुबास शुद्ध करून स्वधर्मांत घेतले

—आस्ट्रा (दिल्ली) येथे बाबू भगवानलाल यानी एका मुसलमानास शुद्ध करून घेतले

—हापूर येथे श्रीसच्चिदानद यानी एक मुसलमान शुद्ध करून हिदु धर्मांत घेतला

केसरी ता १५–२–२७

—मुबईच्या हिदु मिशनरी सोसायटीने खतीजाबाई नावाच्या एका मुसलमान स्त्रीस ता ११ रोजी हिदुधर्मांत घेतले व तिचे नाव सुशीलाबाई असे ठेविले

—ता ७ रोजी अलिगडपासून तेरा मैलावर असलेल्या नानू या खेड्यात १०० ख्रिस्ती वाल्मिकी (चाभार) लोकाना शुद्ध करून घेण्यात आले

—५ लक्ष्मीनारायण शर्मा यानी आसाममध्ये चार हिदुसभा स्थापन केल्या असून ४० लोकास शद्ध करून घेतले.

—हौरा येथे पाच मुसलमान स्त्रीपुरुषांना भारतीय शुद्धिसभेने शुद्ध करून घेतले.

—दीनाजपूर येथे कालीच्या मदिरांत ५००० सताळ लोकानी भक्तिभावाने आपले तिरकमठे कालीच्या चरणी अर्पण केले; व त्याच्यातील बरेच ख्रिस्ती झालेले लोक हिदु झाले

केसरी ता २२–२–२७

—शेरकोट (जि बिजनोर )येथे दोन महिन्यापूर्वी मुसलमान झालेल्या एका इसमास पावन करून स्वधर्मांत घेतले

—कलकत्ता येथे ता १३रोजी अबदुल रशीद नावाच्या इसमास पावन करून घेण्यात आले

—चिरगाव येथील श्री गुलाबराव याचा ज्येष्ठ पुत्र मुनशी अजमेर यास ता १० रोजी शुद्ध करून घेण्यात आले

—ता ५ रोजी काकनाडा येथे अबदुल्ला या नावाच्या इसमास वेदनारायणजी गुप्त यानी शुद्ध करून घेतले

—ढाका येथे हिदु–महासभेच्या परिषदेच्या वेळी अबदुल अजीज नावाच्या मुसलमानास हिदु धर्मांत घेतले

—मुबईच्या हिदुसभेने एका १९ वर्षांच्या मुसलमान मुलीस हिदु धर्मांत घेतले

—ता २० रोजी नागपूर येथे सुदरसिह या नावाच्या ख्रिश्चनाचे सहकुटुब सहपरिवार शुद्धिकरण श्री दिवेकरशास्त्री यानी केले

—लोणार येथे ता ३ रोजी निजामशाहीत ३–४ वर्षांपूर्वी मुसलमान झालेल्या गृहस्थास शुद्ध करून घेतले

—अहमदनगर येथे ता. १७ रोजी डेव्हिड जोन्स व रत्नाकर सागळे या दोन ख्रिस्ती झालेल्या हिदूना शुद्ध करून घेण्यात आले

केसरी ता. १–३–१९२७

—अलीगड जिल्ह्यातील वडारक या गावी २५ वाल्मिकी (चाभार) कुटुबाची शुद्धि करण्यांत आली या कुटुबात एकदर १७५ माणसे होतीं.

---बंगालमध्यें ता. १४ फेब्रुवारी रोजी संपलेल्या आठवड्यात ३००० लोक शुद्ध झाले

---कोतिवमंडी येथे सनातन युवक सभेने एका मुसलमानास शुद्ध करून घेतले

केसरी ता. ८-३-१९२७

---बंगालचे मुसलमान पुढारी मौ अक्रम खान याचे बंधु डॉ हमीदर रहमान यानी हिंदु धर्माचा स्वीकार केला

---वणी येथे ता २५ रोजी एका स्त्रीला, तिच्या मुलाला व काही वर्षांपूर्वी मुसलमान झालेल्या गुलाम रसूल याना शुद्ध केले

---कलकत्ता हिंदु मिशनचे चालक स्वामी सत्यानंद यानी आसाम व बंगाल प्रातातील डोंगरी मुलुखांत शुद्धीचे कार्य झपाट्याने सुरू केले असून अल्पावधीत सुमारे ८५ हजार लोकाना त्यानी स्वधर्मांत घेतले

---दिल्ली येथे ता २७ रोजी आर्यसमाजाने एका फसून मुसलमान झालेल्या इसमास शुद्ध करून घेतले

---ता २८-२ रोजी अकोला येथे श्री दिवेकरशास्त्री यानी आठ वर्षांपूर्वी मुसलमान झालेल्या मगरसिंग नावाच्या मारवाडी ब्राह्मणास शुद्ध करून घेतले

---फरीदाबाद येथे १९ प्रसिद्ध रजपूत मुसलमानाना शुद्ध करून घेण्यात आले

केसरी ता २२-३-२७

---पुणे येथे ता १७ रोजी ख्रिस्ती धर्मावर अनेक पुस्तके लिहून, लेख लिहून, व्याख्याने देऊन, प्रचार काम करीत असत असे रत्नाकर आबाजी जोशी, 'धर्मदीपिका नावाच्या ख्रिस्ती मासिकाचे ४ वर्षे संपादक असलेले गृहस्थ, ख्रिस्ती धर्म सोडून हिंदुधर्मांत आले

---लुधियाना चौडा-बाजार आर्यसमाजाने एका आठवड्यात ४ शुद्धी केल्या.

---भटण्डा येथें ४ मुसलमानाना परत स्वधर्मांत घेण्यांत आलें.

---छप्पार (जि मुझफरनगर) येथे ता ९ रोजी ४ मुसलमानाना शुद्ध करून घेतले

---ता ६ रोजी भिवानी येथे एका कायस्थ ख्रिस्ती इसमास पावन करून घेण्यात आले

---मार्चच्या दुसऱ्या आठवड्यात सक्कर येथे ३ शुद्धिकरणे झाली

---गोरखपूर शुद्धिसभेने २० मुसलमानाना शुद्ध करून घेतले

---ता ८ रोजी एका मुसलमान स्त्रीस लायपूर येथे शुद्ध करून घेतले

---ता ६ रोजी रावळपिंडी येथे एका आजन्म मुसलमान स्त्रीला व तिच्या बाटलेल्या पतीला हिंदु धर्मात घेतले

---सिआलकोट येथे आर्यसमाजाने एका मुसलमान झालेल्या गृहस्थास स्वधर्मांत घेतले

---डगा (पंजाब) येथे एका मुसलमानास पावन करून घेण्यात आले

---पासिया (जि. बदाऊन) येथे ख्रिस्ती झालेल्या ५ इसमाच्या कुटुंबास स्वधर्मांत घेण्यात आले

---ता ९ रोजी मेदिनीपूर (बंगाल) येथे २ मुसलमान झालेल्या इसमास पावन करून घेण्यात आले

---मुंबई प्रदेश हिंदुसभेच्या विद्यमाने गेल्याचे मागील आठवड्यात गुजराथेत १६ ख्रिस्ती इसमाना शुद्ध करून हिंदु धर्मांत घेण्यात आले

---संकेश्वर (बेळगाव) येथे ६० वर्षांपूर्वी मुसलमान झालेल्या एका इसमास हिंदु धर्मांत घेण्यांत आले

केसरी ता ५-४-२७

---महाराजयती (बिहार) येथे प हरिजननंदन पाण्डेय यानी ३ मुसलमानाना शुद्ध करून घेतले

---पचगची (दिनाजपूर ) येथे ता. १५ रोजी ख्रिस्ती झालेल्या २ हजार सताळ लोकाना हिंदु धर्मांत घेतले.

---मोहनपूर (शहाजाहापूर) येथें ता १५ मार्च

रोजी ८० मसलमान झालेल्या इसमास पावन करून हिदु धर्मात घेतले

—कालका शहरात ता २० मार्च रोजी एका मुसलमानास शुद्ध करून घेतले

—आजमगड जिल्ह्यातील एका मौलवीस आर्य समाजाने शुद्ध करून घेतले

—ता १४ मार्च रोजी डाक्का हिदुसभेने एका मुसलमानास शुद्ध करून घेतले

—कदमताल मैमनसिग येथे हिदु मिशनने शभर अहिदु कुटुबाना शुद्ध करून घेतले

—सिलोरघाट (बगाल) येथे एका जन्मजात मुसलमानाला हिदु करून घेण्यात आले

केसरी ता १२–४–२७

—मुबईच्या हिदु मिशनरी सोसायटीने ता १६ फेब्रुआरी रोजी पुण्याचे आसकर अबदुल बोहरी यास हिदु धर्मात घेतले

—अखिल भारतीय शुद्धि सभेचे मत्री ता १९ च्या पत्रात कळवितात की सय्यद कुलातील १३ मुसलमानाना हिदु सभेच्या दिल्लीच्या शाखेने हिदुधर्मात घेतले

—मथुरा जिल्ह्यात प रामदयाळ या सभेच्या प्रचारकाने १४ मुसलमानास हिदु धर्मात घेतले

—तुकाराम खडभट जोशी रा लाडेगाव व तुकाराम रखमा कुणबी यास मु कायरगाव ता मूर्तिजापूर येथे अकोला हिदु सभेने शुद्ध करून घेतले

—बोहरा येथे शुद्धिसभेच्या कार्यकर्त्यांनी मुसलमानी धर्मात गेलेल्या १५० हिदूना शुद्ध करून घेतले

—खामगाव येथे २॥ वर्षापूर्वी अनाथ झालेल्या एका कलाल क्षत्रिय वर्गाच्या मुलीस एका मुसलमानाच्या घरातून सोडवून तिला शुद्ध करून तिचे लग्न प्रो एम् वर्मा याच्याशी लावून दिले

—कोमिल्ला येथे काही दिवसापूर्वी मुसलमान झालेल्या गृहस्थास पावन करून हिदु धर्मात घेण्यात आले

—ता ६ रोजी प्रयाग येथे ३ वर्षापूर्वी मुसलमान झालेल्या एका वैश्याला दिगबर जैन मदिरात शुद्ध करून घेण्यात आले

—सम्भल येथे ता २९ मार्च रोजी तीन ख्रिस्ती इसमाना स्वधर्मात घेतले

—झाशी येथे कित्येक दिवसापूर्वी पतित झालेल्या दोन हजार मेहतराना स्वधर्मात घेतले

—ता २९ मार्च रोजी झाशी येथे भारतीय शुद्धिसभेने ८ मुसलमान रजपुताना शुद्ध करून हिदु धर्मात घेतले

—मोहनपूर (जि शहाजहानपूर) येथे ८१ मलकानाना पावन करून घेतले

—हरिद्वार येथे शुद्धिसभेने दोन शुद्धिकरणे केली.

—एक वर्षापूर्वी मुसलमान झालेल्या चौधरी नावाच्या इसमास दरभगा आर्यसमाजाने शुद्ध करून घेतले

—परिक्षतगड (मेरठ) येथे एका मुसलमानास पावन करण्यात आले

—बरेली हिदुसभेने काही दिवसापूर्वी बाटलेल्या एका मलास स्वधर्मात घेतले

—पणजी येथे ता २० रोजी नारायण बाळा केनवडेकर यास त्याच्या ६ कुटुबीय माणसासुद्धा शुद्ध करून घेण्यात आले

—पिपळगाव सराई (बुलढाणा) येथे ४ वर्षापूर्वी मुसलमान झालेल्या एका मराठ्यास ता १० रोजी शुद्ध करून घेण्यात आले.

—प कन्हैयालाल मिश्र यानी ता ८ रोजी रगून येथे पाच वर्षापूर्वी मुसलमान झालेल्या एका रजपुतास शुद्ध करून घेतले

—पटना येथे सुमारे ६ महिन्यापूर्वी ख्रिश्चन झालेले २ पुरुष व १ स्त्री यास हिदु धर्मात घेण्यात आले

—ता २१ रोजी मुबई हिदु मिशनरी सोसायटीने सुदराचारी शेषअय्यर या १३ वर्षाच्या मुलाचा शुद्धिविधि केला

केसरी ता १५–३–३५

—गेल्या पधरवड्यात सिध प्रातात ८ शुद्धिकरणे झाली त्यात एक ख्रिस्ती स्त्रीहि आहे.

—मेम्यु (वर्मा) येथे एका बगलोरच्या ख्रिस्ती इसमास पावन करून घेण्यात आले

—आडपेलिया (जि चोविस परगणा) येथे डॉ हमीदउल रहमान यास शुद्ध करून घेण्यात आले

—सहारनपूर येथें तीन अहिंदु इसमास पावन करून घेण्यात आले

—पाटणा येथे हिंदुसभेने एका मुसलमान झालेल्या कायस्थ गृहस्थास पावन करून घेतले

—अकोला (कारवार) हिंदु सभेने ता ७ रोजी जयाबाई बेडर आणि गोविदा जैन यास मुसलमानाचा ससर्गदोष घडल्यावरून प्रायश्चित्त देऊन स्वधर्मात घेतले

—ता २ रोजी मुरादावाद येथे मुसलमान झालेल्या मदनसिह गढवाली नावाच्या इसमास पावन करून घेतले

—पचमहाल जिल्हयापैकी लालवा व रणायार या गावातील १५ पातीदार कुटुबे बडोदा हिंदुसभेने शुद्ध करून घेतली या कुटुबात ६० माणसे आहेत

—रसडा (जि नालिया) येथे शुद्धिसभेच्या शाखेने भाटाच्या चार कुटुबाना शुद्ध करून घेतले

—महतपूर येथे एका मुसलमानास वैदिक धर्मात घेण्यात आले चौरीचौराजवळ सन्थरी गावी ३ मुसलमानाना पावन करून घेण्यात आले

—ता २ रोजी ततारपूर, द्वारकापूर, झरूनगला व निरजपूर या गावातील (स प्रात) १२५ चर्मकार ख्रिस्ती झाले होते त्यास अछुतोद्धार सभेने स्वधर्मात घेतले

—कलकत्ता हिंदु मिशनने आसाम खोऱ्यातील टिकिर या डोगराळ परगण्यातील १६० ख्रिस्ती झालेल्या इसमाना शुद्ध करून घेतले

—ता १ रोजी उमरावती येथे किर्लोस्कर नाटक मडळीतील मुसलमान झालेल्या गनी नावाच्या इसमास शुद्ध करून घेण्यात आले

—चकसामी (नडियाद) येथे ता ६ रोजी ३५ खोजा मुसलमानाना शुद्ध करून घेतले

—शुक्रवार ता १०-३-२७ रोजी पुणे येथील आर्यसमाजाने ग्वाल्हेर सस्थानातील मदसोर गावच्या २ वर्षांपूर्वी हकीम मजलेमिया (जाव्हरा) यानी दिलेल्या सधिवातावरच्या औषधाचा मोबदला म्हणून मुसलमान झालेल्या सुतार जातीच्या गृहस्थास शुद्ध करून घेण्यात आले

---

# मारामारी करा असें कुराणच सांगतें ?

## कुराणांतील वेंचे

('सुरा' व 'आयत' याचे क्रमाक फ्लूगलच्या प्रतीवरून दिले आहेत भाषातर सेलच्या पुस्तकावरून घेतले आहे )

सुरा तोबा ९, आयत १२४

" सत्य श्रद्धा बाळगणाऱ्यानो, खऱ्या धर्मावर श्रद्धा न ठेवणारे जे लोक तुमच्या शेजारी असतील त्याच्याविरुद्ध लढाई द्या, तुमच्यातील कडवेपणा त्याना कळू द्या आणि लक्षात ठेवा की जे ईश्वराला भितात, त्याच्या जवळ तो असतो "

सुरा तोबा, ९, आयत ७४

" हे धर्मज्ञा, नास्तिक आणि ढोगी लोक याच्याविरुद्ध लढाई पुकार, आणि त्याच्याशी निष्ठुरपणे वाग, कारण त्याना नरकात राहावे लागेल तेथपर्यंतचा तो प्रवास तापदायक असेल"

सुरा फता ४८, आयत १६ --

" मागे राहिलेल्या वाळवटातील अरबाना असे बजावा की एका बलाढ्य आणि लढवय्या राष्ट्राशी तुम्हाला सामना द्यावा लागेल, तुम्ही त्याच्याविरुद्ध लढाई करा, किंवा त्याना इस्लामचा स्वीकार तरी करावयास लावा "

सुरा तोबा ९, आयत ५ --

( मौलवी शाह रफीउद्दीन यानी केलेले भाषातर )

" तेव्हा, ज्यावेळी पवित्र महिने सपलेले असतात त्यावेळी मूर्तिपूजकाना ठार मारा जेथे जेथें ते सापडतील तेथे तेथे त्याना ठार करा, त्याना कैद करा, त्याच्यावर चढाई करा, त्याना पकडण्याकरिता ठिकठिकाणी टपून बसा त्यानतर जर ते पश्चात्ताप पावतील, नियमाने प्रार्थना करतील आणि गरिबावर बसविलेला कर देतील तर त्याना आपल्या मार्गाने जाऊ द्या दया दाखविणे अल्लाला खात्रीनेच आवडते "

* * *

## जॉर्ज सेल यांच्या लेखांतील एक उतारा

" तरवारीच्या जोरावर प्रस्थापित झालेल्या धर्माबद्दल त्यातील बळजोरीने धर्मांतर करविण्याच्या पद्धतीमुळे कोणाचे विशेष चागले मत होत नाही, आणि दुसऱ्या धर्मातील लोकाकडून या पद्धतीचा निषेधच केला जातो मात्र स्वत च्या धर्माचा प्रसार करण्याकरता त्याच पद्धतीचा अवलब करण्यास हेच लोक राजी असतात, कारण खोट्या धर्माचा जुलमाने प्रसार करू नये हे खरे असले, तरी खऱ्या धर्माचा प्रसार तशा रीतीने करण्यास हरकत नाही असा त्याचा युक्तिवाद असतो आणि अर्थात् मग ज्याच्या हातात सत्ता असते ते त्या सत्तेचा हवा तसा उपयोग करून घेतात अशा तऱ्हेने जलूम झालेल्या लोकाच्या करुण कहाण्याच या गोष्टीची साक्ष देतील इस्लाम हा धर्म मनुष्य-प्रस्थापितच आहे, आणि बहुताशी फक्त तरवारीच्या जोरावरच त्याला उत्कर्ष आणि चिरस्थायित्व लाभले, यावरूनहि तीच गोष्ट खात्रीलायक पुराव्यानिशी सिद्ध होते "

* * *

## महंमदाचा धर्म

--ए आर होप मॉनक्रीफ--युरोपचा इतिहास (पान १९९)

पण मुसलमानातील बहुजन समाजाला त्याचा धर्म म्हणजे आज्ञा-पालनाचे एक साधे स्वरूप म्हणनच सागितलेला आहे या धर्मांत धार्मिक

भुकेपेक्षा विधी व नेमधर्म यावरच विशेष जोर दिलेला असून, सहिष्णुतेच्या रमणीय सगीनापेक्षा कट्टर असहिष्णुतेच्या बदसुराशीच त्याचे विशेष सूत दिसते असस्कृत माणसामध्ये सहजच आढळणाऱ्या परधर्मासहिष्णुतेला या धर्माने पूर्ण वाव दिला आहे दैवी शक्ति आणि अत करणाची विशालता याच्या अभावी हा कठिण धर्म शेवटी वर नसून शापच ठरला आहे सदसद्विवेक बुद्धीला मद करून मनोविकार उत्तेजित करणाऱ्या या धर्मातील शारीरिक वासना आणि भीति माणमाला हा हा म्हणता फसवितात त्यातील जिवतपणा प्रथम प्रथम जरी एकाद्या वाढीला अनुकूल दिसला, तरी ठराविक नेमधर्माच्या कचाटीत या वाढीची शेवटी गळचेपीच होते त्यात अधश्रद्धा हे जुलूमजबरदस्तीचे एक हत्यारच आहे शेवटी, या धर्मात दु खाचा नव्हे तर आढ्यतेचाच पगडा प्रामुख्याने दिसतो, मग, कुराणाच्या प्रत्येक अध्यायाची सुरुवात ईश्वरी दया व कृपाळूपणा याच्या आवाहनाने करणाऱ्या, विशेषसे न शिकलेल्या, त्याच्या धर्मस्थापकाची समजूत काहीहि असो दु खित आणि कष्टमभाराने वाकलेल्या लोकाची उपेक्षा करून विलासी लठ्ठव्याची खुशामत करणाऱ्या या धर्माने, ख्रिस्ताच्या 'क्रूसाच्या वेळी शेवटी व थडग्याजवळ सर्वात पुढे असणाऱ्या स्त्रीची सहानुभूति उच्चतर करण्याविषयी कधीच कदर केली नाही तेव्हा, बहुधा प्रत्येक ठिकाणी मुसलमानाचा उत्कर्ष ही मानवी प्रगतीवरील एक गजलेली शृन्खलाच आहे असे म्हणावे लागते

बगदाद, कायरो आणि कोर्डोवा यानी अधारयुगातूनहि काही प्राचीन ज्ञानभाडाराचे सरक्षण केले असेल, आणि स्पेनसारख्या काही प्रदेशातून महमदीयानी नष्ट केलेल्या सस्कृतीहून उच्चतर महमदी सस्कृतीचे अवशेष आहेत पण इस्लामी दिग्विजयाच्या सर्वसाधारण परिणामाशी विशेष खुलून दिसणारी जर कोणती गोष्ट असेल तर अलेक्झांड्रियाच्या प्रख्यात ग्रथालयाला त्यानी लाविलेली प्रसिद्ध आग ही होय रसरसलेल्या तप्त लाव्हा रसाच्या लोढ्याप्रमाणेच त्या दिग्विजयाची धाड असे! कधी कधी हाहि रस निवून बनणाऱ्या सुपीक जमिनीत एकादी नवसस्कृति उदय पावे, पण ती अगदीच अल्पजीवी असे शासिताचा धर्म आणि सस्था याना रोमने बोट देखील लाविले नाही, उलट त्याच्या कला आणि प्रगति याची रोमन विजयावर वेशभूषाच चढविली ख्रिस्ती लोकानी परधर्मीयाचे ज्ञान व सद्‌गुणच नव्हे, तर काही धर्मकल्पनाहि आपल्याशा केल्या पण मुसलमानी धर्माची चद्रकोर जेथे कोठे प्रकाशली, तेथे तथे ती सर्वनाशामुळे बेचिराख झालेल्या पृथ्वीवरील काळवडलेल्या आकाशातच प्रकाशली !

* * *

## मुसलमानी राज्यकारभाराचें स्वरूप

हिंदुस्थानात मुसलमान लोक शिरले तेव्हापासून लूट करण्याचा त्याचा बराच रोख दिसतो आरभी तर देवळे व शहरे लुटणे, मूर्ती फोडणे, घरे जाळणे व माणसाची कत्तल करणे हे प्रकार बरेच वारवार होत असत या लुटीपैकी बराचसा पैसा देशाबाहेर गेला

इस्लामी धर्माचा प्रसार करणे हा मुसलमान जेत्याचा दुसरा प्रबल उद्देश होता या बाबतीत आरभीचे सुलतान हिंदूना कसे वागवीत याबद्दल कीनच्या इतिहासात पुढील वर्णन आहे "इस्लामी धर्म तत्त्व असे आहे की, लोकानी इस्लामी धर्म तरी स्वीकारावा किवा तरवारीला बळी पडावे पण भूतदयावादी एका इस्लामी पथाचे मत असे होते की, इस्लामी धर्म स्वीकारणे नसेल त्याने जिझिया नामक कर द्यावा हा कर देण्याची सवलत देणे म्हणजे हिंदवर मोठे उपकार आहेत ही गोष्ट त्यानी ध्यानात वागविली पाहिजे व फार लीनतेने वागले पाहिजे एकादा कर वसूल करणारा अधिकारी त्याच्या तोडावर थुकला तरीसुद्धा त्यानी ती मेहेर नजर समजली पाहिजे त्यानी मुसलमान अधिकाऱ्याच्या आज्ञेत राहून इस्लामी धर्माची कीर्ति वृद्धिगत केली पाहिजे कारण खुद्द कुराणातच असे सागितले आहे की

त्यांनी इस्लामी धर्म स्वीकारावा. नाही तर मरण पत्करावें, नाही तर गुलाम बनन राहावे ”

सदरहू प्रकारची धर्मक्रांति अल्प काळात घडवून आणण्याची मुसलमान जेत्याची उत्कट इच्छा होती पण सामान्यत या मानवी सृष्टीत कोणतीच क्रांति एकदम घडून येत नाही विशेषत हिंदुस्थानात मोठी क्रांति म्हणून क्वचितच घडते असे म्हटले तरी चालेल शेकडो वर्षे मुसलमानाचे हल्ले या देशावर येत होते तरी हिंदु लोकाच्या पूर्वजीवनक्रमात फारसा फरक झाला नाही. हिंदु व मुसलमान ही दोन राष्ट्रे इतके दिवस एके ठिकाणी राहून एकमेकापासून इतकी अलिप्त राहिल्याचे उत्कट उदाहरण भूतलावर हिंदुस्थानशिवाय दुसरे नाही इग्लडात नॉर्मन व सॅक्सन लोकाचे समिश्रण शभर वर्षांचे आत झाले असो लष्करी जोरावर हिंदूच्या भक्कम धर्माचा पाडाव करण्यास झटणे भ्रातिमूलक होय, हे तत्त्व पाचशे वर्षांच्या अनुभवाने का होईना, पण अकबरासारख्या सुज्ञ राज्यकर्त्यास कळून आले म्हणूनच गोडी गुलाबीचा सौम्य मार्ग त्याने स्वीकारला अतत ह्या युक्तीचाही फारसा उपयोग झाला नाही हे इतिहासावरून स्पष्ट कळते

—ज्ञानकोश प्रथम खड

* * *

## शिवकालीन आदिलशाही

शिवाजी महाराजाना स्वतत्रपणे स्वराज्यस्थापना करण्याची आवश्यकता व शक्यता कोणत्या कारणामुळे भासू लागली याचा विचार करताना त्याच्या काळी महाराष्ट्रात मुसलमानी राज्यकर्त्यांचे धोरण काय होते याचा निर्णय करणे जरूर आहे त्यावेळी दिल्ली, विजापूर व दौलताबाद ही तीन बादशाहीची ठिकाणे प्रमुख होती या तीनहि ठिकाणी बादशहा मुसलमान असले तरी बहुतेक प्रजा हिंदु असल्यामुळें हिंदु—मुसलमान यांचे नाते कसे असावे, त्याना बरोबरीने वागविण्यात यावे किंवा जित व जेते असा भेदभाव लक्षांत वागवून राज्यकारभार चालवावा हा प्रश्न तत्कालीन मुत्सद्याना सोडवावा लागे अशा स्थितीत मुसलमान दरबारी अनेकदां दोन पक्ष असत आदिलशाहीत इब्राहिमाच्या मृत्यूनतर कडव्या पक्षाने (हिदूच्या वैरी पक्षाने) डोके वर काढण्याचा प्रयत्न केला व महमद आदिलशहाच्या राजनीतीचे धोरण नवीन धर्तीचे करण्यासाठी फार मेहनत केली महमद वयाने लहान असल्यामुळे समता पक्ष व कडवा पक्ष पादशाहीची सूत्रे आपापल्या हाती घेण्यासाठी आपसात भाडू लागले समता पक्षाचा मुख्य अध्वर्यु कोण होता हे नक्की समजत नाही कडव्या पक्षाचे पुढारीपण मुस्ताफखानाकडे होते व बहुतकरून त्याच्याच तत्राने महमदशहाची पहिली कित्येक वर्षे गेली यामुळे मुसलमानी मुत्सद्यानी हिदूना छळण्याचा विचार केला असावा व ही बातमी ऐकून विचारी हिदूना भविष्यकाळाची भेसूर चित्रे दिसू लागली असावी मुत्सद्याचा रागरग पाहून हिदूना तुच्छ लेखण्याची व त्याच्यावर जुलूम केल्याची उदाहरणे काही ठिकाणी घडली असावी रामदास स्वामीनी ‘ उदास वाटते जीवी ’ असे म्हणून ज्या भयानक परिस्थितीचे वर्णन केले आहे त्याचे कारण कडव्या पक्षाचे आदिलशाही दरबारातील प्राबल्य हेच असावे या पक्षाची राजनीति म्हणजे मुसलमानाना जेते या नात्याने सर्व प्रकारच्या सवलती मिळाव्या व हिदूना हिंदु म्हणून कमी मानण्यात यावे अशा प्रकारची होती. महमदशहाच्या कारकीर्दीत हिदूना मागे सारून मुसलमानी धर्माचे प्राबल्य वाढविण्याचा प्रयत्न झाला याबद्दलची माहिती इतिहास सग्रहात ऐतिहासिक स्फुटलेख भाग २, प्रकरण ७ येथें आली आहे महमद आदिलशहाची राजनीति देणाऱ्या फारसी बखरीचे भाषातर प्रसिद्ध आहे. पैकी हिंदु लोकाना वागविण्याविषयीचे काही नियम येथे दिले आहेत

आपल्या मुलखातील एकदर कारखान्यात मुसलमान जातीचे मामलेदार वगैरे अमलदार व हिंदू जातीचे कारकून ठेवावे हिंदू लोकांस हुकमी काम देऊ नये. कारण की पृथ्वीची व धर्माची खराबी यातच आहे.

मुसलमानास व मुसलमानाचे कायद्यास अशा कारे मजबूत ठेवावे की कोणताही अधर्मी पुरुष हणजे हिंदु प्रबळ असला, तत्रापि त्यास एखाद्या रीब मुसलमानाची बरोबरी करण्याचे सामर्थ्य ाहू नये असा मुसलमानी धर्म प्रबळ ठेवावा

जर कदाचित् एकादे मुसलमानाने गैरसम- ्तीने हिंदूचा नाश करण्याचा प्रयत्न केला तर ्या मुसलमानास युक्तीने ताकीद द्यावी की या ळेस असे करू नको, पुढे पाहून घेता येईल, तूर्त मय टाळ, असा त्यास उपदेश करावा परंतु ्दूचे रक्षण करण्याविषयी हिंदूचा पक्ष धरून ुसलमानास उपद्रव करू नये व त्यास दुःख ऊ नये दिवाळी, दसरा वगैरे हिंदूचे सण येतात व्हा ते लोक ते सण उघडपणे करितात त्यास णाचे समारंभ उघडपणे करू देऊ नयेत गुप्त- णे करू लागल्यास मनाई करू नये

कुरान शरीफाचे हुकुमावरून व ईश्वराचे ाज्ञेवरून एकदर सुखवस्तु लोकापासून व मूर्ति- जा करणाऱ्या म्हणजे हिंदु लोकापासून खंड घेणे रले आहे त्याप्रमाणे मुसलमानाचे सरहद्दीतील ख्य कामगारास व मामलेदारास हिंदु लोका- ासून खाली लिहिलेल्या तपशिलाप्रमाणे खंड ण्याविषयी आज्ञापत्रे लिहावी

जो हिंदु व्यापार व कसब न करता एक वर्ष कवा एक वर्षावर काही दिवस प्रपंच निर्वाह रील असा असेल, त्यापासून दरमहा एक तोळा ावणे पाच गुंजा रुपे घेत जावे

जो हिंदु सरासरी द्रव्यवान आहे, परंतु व्यापार गर कसब करून निर्वाह करू शकत नाही त्या- ासून वर सांगितल्याचे निम्मे रुपे घ्यावे

ज्या हिंदूजवळ द्रव्यसंचय नाही व जो काही री व्यापार अगर कसब करून निर्वाह करितो ्यापासून चतुर्थांश रुपे घ्यावे

खंडाचा ऐवज भरण्यापूर्वी मुसलमान झालेले ्दु लोक व चुकीने कारकुनाच्या वाक्यास दोष ्णारे मुसलमान ह्यापासून कधीहि खंड घेऊ ये ब्राह्मण भट मंडळी व जंगम लोक सर्वांशी ्घेवीचा व्यापार करितात सबब ते खंड घेण्यास पात्र आहेत ह्या लोकापासून खंड घेतलाच पाहिजे

जे हिंदु लोक काहीच कसब किंवा धंदा करीत नाहीत आणि द्रव्य बाळगून असतात त्यापासून द्रव्य हरणाविषयी जशी युक्ति चालेल तशी चालवून घेता येईल तितका खंड त्यापासून घ्यावा

खंड देणारानी खुद्द जातीने येऊन खंडाचा ऐवज आपले हाताने द्यावा आपले मुखत्याराचे हाते पाठवू नये खंड वसूल करणारा कामगार बसलेला असावा खंड देणाराने उभे राहून ऐवज द्यावा

या नियमामुळे हिंदूना पदोपदी अपमान सोस- ण्याचा व जीवितास मुकण्याचा प्रसंग येत असला पाहिजे हे उघड आहे यामुळे हिंदूना जिवंत राहा- वयाचे असेल तर बंडखोरपणा स्वीकारल्या- वाचून गत्यंतर नाही असे वाटू लागले असावे

--भा इ स म त्रैमासिक वर्ष २

* * *

[पाटीलकीसाठी खून व धर्मांतर करावी लाग- ल्याची उदाहरणेहि आदिलशाहीत आढळतात.]

मौजे देवराष्टे, कशीत वागी प्रांत पन्हाळा येथील मुसलमानी अमदानीतील पाटिलकीची हकीगत अशी आहे--

संभाजी भोसले यानी पाटिलकी केली तो पाटीलकी करीत असता त्यास देवाज्ञा झाली त्याला चार मुलगे वडील तुकोजी, पाठचा काळोजी बाळोजी आणि सर्वांत लहान हिरोजी तुकोजी पाटीलकी करीत असता गावावर आपत्ति आली विजापुरास रसद जात असता रानात चोरानी लांबविली विजापुराहून हुकूम सुटला व त्याप्रमाणे काळोजी व बाळोजी ह्यास ठार मारण्यात आले तुकोजी पळून गेला व हिरोजीस विजापुरास नेण्यात आले त्याला महमद सावकाराचे हवाली करून रसदेचा निकाल करून घेण्यास फर्माविले हिरोजी निपुत्रिक होता तो वारला काबूलखान दिवाण व हमरोजी गावास परत आले तुकोजी म्हणाला, "तू मुसलमानास मिळून पाटिलकी

करतोस " पाटिलकी मुसलमानाच्या घरी गेली असे वाटन तुकोजीने हिरोजीस ठार मारले देवाणाने तुकोजीस मारले तुकोजीचा लेक पापाजी भोसले शेणोली गावी होता त्याने गावास मुतालिक पाठविला तो पाटिलकीची मुतालकी करीत असता मरण पावला त्याला तीन मुलगे सभाजी,सोनाजी व नरसोजी. सोनाजी वडिलामागे मुतालकी करू लागला. 'भोसल्यास थोडाबहुत हक्क द्यावा' असे तो म्हणाला. सभाजी व नरसोजी ह्यास वाटले की नससोजी भोसल्यास वश आहे म्हणून त्यानी त्याला ठार मारले व मग दोघे जण पाटिलकी करू लागले



# संस्थानांतील हिंदू व मुसलमान

## हैदराबाद संस्थानातील हिंदूंच्या शिक्षणाची अनास्था

हैदराबाद सस्थानात सरकारी शिक्षणास प्रारभ इ स १८५४ मध्ये झाला असला तरी जवळ जवळ इ स १९०० पर्यंत, हिदुस्थानच्या इतर भागाप्रमाणेच शिक्षण घेणे ही सर्वस्वी प्रजेच्याच अधिकारातली गोष्ट असे प्रत्येक गावातील किवा शहरातील लोक आपापल्या गरजेनुरूप पतोजी पदरी ठेवून त्याचा चरितार्थ चालवीत व त्याच्या मोबदल्यात गणित, हिशोब, लिहिणे वाचणे इत्यादि नित्याचे व्यवहारोपयोगी शिक्षण आपल्या मुलाना देत शहरातील शिक्षणात मात्र थोडा फरक असे स्वत च्या मातृभाषेखेरीज राजभाषा म्हणून, व सरकारी नोकरीत शिरण्यास अत्यत आवश्यक म्हणून हिंदू आणि मुसलमान लोक आपल्या मुलाना एकाद्या मौलवीच्याकडे फारशी भाषा शिकण्यास ठेवीत अशा मौलवीच्या शाळाना शहरातून पतोजीच्या शाळाइतकेच महत्त्व असे

या मध्ययुगीन परिस्थितीत क्राति होण्यास इ स १८५४ मध्ये प्रारभ झाला या वर्षी हैदराबाद शहरात दारुल उलूम नावाची पहिली शाळा सरकारने स्थापन केली इ स १८५९ मध्ये प्रत्येक जिल्ह्याच्या व तालुक्याच्या ठिकाणी एक देशी भाषेची व एक फारशी भाषेची अशा दोन शाळा उघडण्याची व्यवस्था झाली तालुक्याच्या शाळावर तालुका कमेटीची व जिल्ह्याच्या ठिकाणच्या शाळावर जिल्हा कमेटीची देखरेख असे तालुका कमेटीत दोन पाटील, दोन कुलकर्णी असून तिचा अध्यक्ष तालुक्याचा अधिकारी तहसीलदार असे जिल्हाकमेटीत पाटील, कुलकर्णी, तहसीलदार, पोलीस इन्स्पेक्टर व जिल्हाधिकारी कलेक्टर अशी मडळी असत हे जिल्ह्याचे अधिकारीच शाळाचे इन्स्पेक्टर या नात्याने मुलाची परीक्षा घेत व शाळेची तपासणी करीत इ स १८६८ मध्ये शिक्षणखाते किरकोळ खात्याच्या दुय्यम मत्र्याकडे देण्यात आले शिक्षक म्हणून काम करू इच्छिणाराना 'दारुल उलूम' या सस्थेत शिक्षण घ्यावे लागे इ स १८७१ मध्ये डायरेक्टर ऑफ व्हर्नाक्युलर एज्युकेशन व १८७५ मध्ये पाच डेप्युटी इन्स्पेक्टर्स असे नवीन अधिकारी निर्माण करण्यात आले इ स १८७८ पासून जिल्ह्यातील शाळामधून फी घेण्यास सुरुवात झाली १८८० मध्ये मद्रास विद्यापीठाशी सबध असलेले सध्याचे निजाम कॉलेज अस्तित्वात आले या शाळाकॉलेजातून दिले जाणारे शिक्षण ब्रिटिश हिदुस्थानातील शिक्षण पद्धतीप्रमाणे असे हळुहळू सस्थानातील सरकारी शाळाची सख्या वाढू लागली व त्याच प्रमाणात सरकारचा त्या खात्यावरील खर्चही वाढीस लागला इ स. १९११–१२ च्या शिक्षणखात्याच्या रिपोर्टावरून त्या वर्षी सस्थानातील एकूण शिक्षणसस्था १०५२ असून त्यातून ६५१०२ विद्यार्थी शिक्षणाचा लाभ घेत होते आणि त्या खात्यावर सरकार प्रतिवर्षी ९ ९७ लक्ष रु खर्च करीत होते असे दिसते

मराठवाडा, तेलगण व कर्नाटक या प्राताातून त्या त्या भाषेत अप्पर प्रायमरी परीक्षेची तयारी करणाऱ्या शाळा असत विद्यार्थ्याला ही परीक्षा दिल्यावरच पुढील शिक्षणक्रमात प्रवेश मिळे जिल्हा, तालुका आणि महत्त्वाच्या गावी इग्रजी मिडल स्कुले असत त्यात विद्यार्थी नतर जाई. मुसलमान विद्यार्थ्याकरिता त्याच्या मातृभाषेतून–उर्दूतून–शिक्षण देणाऱ्या प्राथमिक शाळा

असत. मुसलमान आणि हिदू विद्यार्थी दुय्यम शिक्षणक्रमात एकत्र येत व दोघानाही आपला पुढील अभ्यास इग्रजीसारख्या परक्या भाषेतून करावा लागे इ स. १९११–१२ पर्यंत सरकारी कचेऱ्यांतील कामकाज बहुधा प्रातिक भाषेतच चालत असल्यामुळे प्रातिक भाषेतून अप्पर प्रायमरी पर्यंत शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांस नोकरी मिळण्यास किंवा सरकारी व्यवहार समजण्यास सुलभ जात असे अर्थात् केवळ स्वत ची मातृभाषा जाणणारा मनुष्य म्हटला की तो कुचकामाचा अशी समजूत त्या वर्षापर्यंत नव्हती, आणि म्हणूनच मातृभाषेत अप्पर प्रायमरीपर्यंत शिक्षण घेतलेले विद्यार्थी पुष्कळच असत, आणि अशा विद्यार्थ्यांचा पुढील जीवनक्रमही फारसा सुखाचा नसला तरी आजच्या इतका कटकमय आणि कटाळवाणा होत नसे आपला मातृभाषेचा अभ्यास सपवून उर्दू व फारशी भाषावर प्रभुत्व सपादण्यास हिदु विद्यार्थ्यांना फारसा त्रास होत नसे, आणि म्हणूनच या व यापूर्वीच्या काळात राजभाषा व मातृभाषा या दोहोतही निष्णात अशी हिंदू माणसे शेकड्यानी सापडत असत शिक्षणक्रम हा असा सुलभ असल्यामुळे १९११ च्या रिपोर्टात सरकारी शिक्षणसस्थातून हिदू व मुसलमान विद्यार्थ्यांचे प्रमाण ५५ व ३८ असे होते याच वर्षीच्या शिरगणतीच्या रिपोर्टामध्ये हिंदूची व मुसलमानाची लोकसख्या अनुक्रमे १,१६,२६,३७५ व १३,८०,९९० दिलेली आहे अर्थात् सख्येच्या प्रमाणात हिदू समाज शिक्षणाचे बाबतीत मुसलमान समाजापेक्षा सहा पटीने मागे होता यात शका नाही

अशा परिस्थितीत अलीगड विद्यापीठात शिक्षण घेतलेले हल्लीचे निजाम नबाब मीर उस्मान अलीखा हे २९ ऑगस्ट १९११ ला गादीवर आले आणि त्यानी अलीगड विद्यापीठाचे सस्थापक सर सय्यद अहमद याचे नातू डॉ रॉस मसूद याना आणून त्यांची शिक्षणखात्याचे मुख्याधिकाऱ्याचे जागी नेमणूक केली नवीन मनूला प्रारभ झाला सरकारी कचेऱ्यांची भाषा उर्दू ठरविण्यात येऊन त्याप्रमाणें सरकारी शिक्षणक्रमांत आणि धोरणात आमूलाग्र पण आस्तेकदम बदल होऊ लागला.

पूर्वी प्रत्येक जिल्ह्याचे व महत्त्वाचे तालुक्याचे ठिकाणी एक इग्रजी मिड्ल् स्कूल, प्रांताचे ठिकाणीं एक इग्रजी हायस्कूल व खुद्द हैदराबाद शहरी एक इग्रजी कॉलेज होते ही व्यवस्था तात्पुरती अशीच ठेवून रॉस मसूद साहेबानी शिक्षणाच्या विस्ताराचे नावाखाली प्रत्येक तालुक्याचे ठिकाणी एक उर्दू मिड्ल् स्कूल व प्रत्येक जिल्ह्याचे ठिकाणी एक उर्दू हायस्कूल उघडले दुय्यम शिक्षणात मोठ्या कुशलतेने उर्दूला महत्त्वाचे स्थान अशा रीतीने दिल्यानतर त्याच धोरणाने प्राथमिक शाळातूनही उर्दूचे महत्त्व वाढवून मराठी, कानडी व तेलगू या तत्प्रातस्थाच्या मातृभाषाना स्थानभ्रष्ट केले प्रातिक भाषाच्या शिक्षणाच्या सोई हळुहळू कमी होऊ लागल्या, त्या इतक्या की, काही विशिष्ट खाजगी शिक्षणसस्था सोडल्यास सस्थानात प्राथमिक शाळातून विद्यार्थ्याला त्याच्या मातृभाषेतून शिक्षण बिगारी किवा क्वचित् त्याच्या पुढील म्हणजे पहिल्या इयत्तेपर्यंतच आज मित्तीस मिळू शकते उभ्या सस्थानात यापुढील सपूर्ण अभ्यासक्रम मातृभाषेतून शिकविणारी एकही सरकारी प्राथमिक शाळा नाही ही गोष्ट अतिशयोक्तीची वाटली तरी वस्तुस्थितीस सोडून नाही यात शका नाही

अशा रीतीने उर्दू भाषेला, राजभाषा आणि बोधभाषा असे मानाचे स्थान देऊन प्रोत्साहन दिल्यानतर डॉ रॉस मसूद साहेबानी, सर अकबर हैदरीच्या साहाय्याने आपली, आपल्या सहकाऱ्याची उर्दूच्या प्रगतीची रम्य कल्पनाचित्रें प्रत्यक्ष सृष्टीत उतरविण्याकरिता इ स १९१८ मध्ये उस्मानिया विद्यापीठाची स्थापना केली अर्थातच एवढ्या प्रचड कार्याची उभारणी करण्याकरिता शिक्षणखात्याला पैसादेखील पाण्यासारखा खर्च करावा लागला हे पुढील आकड्यावरून दिसून येईल

वर्ष १९११–१० लक्ष रु, १९१७–१८

३१ लक्ष रु, १९२२-२३; ७० लक्ष रु., १९२६-७७लक्ष रु व १९३२-१०७ लक्ष रुपये

संस्थानच्या १९३२ सालच्या अॅडमिनिस्ट्रेशन रिपोर्टावरून पाहता आजमितीस संस्थानात एकूण १० कॉलेजे, २३ इंग्रजी हायस्कुले, २१ उर्दू हायस्कुले, दोन्ही मिळून (इंग्रजी व उर्दू अभ्यासक्रम शिकविणारी) ६ हायस्कुले, १२८ मिड्ल् स्कुले, ४२६० प्राथमिक शाळा आणि ६२ स्पेशल शाळा आहेत खाजगी प्रयत्नाने चाललेल्या शाळाची संख्या १०४६आहे या सर्व प्रकारच्या शाळातून अनुक्रमे १४००, ८९१४, ९६१३, ४५००, ३३७९९, २५२१३२ आणि ५१२९ विद्यार्थी शिकत आहेत याचे मुले आणि मुली असे वर्गीकरण केल्यास ते अनुक्रमे १३७९ मुले व २१ मुली, ५९०७ मुले व २३२ मुली, १३०७० विद्यार्थी व ६२४ विद्यार्थिनी, २४०५६७ मुले व ४८५५८ मुली आणि ४१२४ विद्यार्थी व १००५ विद्यार्थिनी असे होईल

एकूण शिक्षणावरील खर्चापैकी ८८,९९,०१३ रु दिवाणी इलाख्यातील शाळावर, २,००,०८३ रु सर्फे-इ-खास (निजाम साहेबाची खाजगी जहागीर) मधील शाळावर, ४,५१,२३७ रु लोकलफडाने चालविलेल्या शाळावर, प्रायोगिक शाळावर ७१३१ रु, सरकारी ग्रॅंट मिळविणाऱ्या खाजगी शाळाचा ८,०३,२८६रु आणि सरकारी ग्रँट न घेणाऱ्या खाजगी शाळाचा ३,३०,३०१ रुपये आहे

एकूण खर्चाची वर्गवारी केल्यास प्रत्यक्ष शिक्षणावर ६६,५१,३८१ रु खर्च होतात आणि इन्स्पेक्शन, इमारतीची डागडुजी, शाळाना लागणारे फर्निचर, स्कॉलरशिप्स्, बॉयस्काऊट्स्, लायब्ररऱ्या, प्रयोगशाळा इत्यादि द्वारे होणारा अप्रत्यक्ष खर्च ४०,३९,६७० रु आहे प्रत्यक्ष खर्चापैकी १,०८५,०५८ रु कॉलेज शिक्षणावर, १६,०७,७९४रु हायस्कूल शिक्षणावर, मिड्ल्-स्कूल शिक्षणावर ११,६८,९५५ रु, प्राथमिक शिक्षणावर २३,७४,४७५ रु आणि स्पेशल शिक्षणावर ४,१५,०९९ रु खर्च होतात

उस्मानिया विद्यापीठाचे उस्मानिया कॉलेज आणि त्या विद्यापीठास जोडलेल्या इतर ८ कॉलेजातून १०९५ विद्यार्थी शिक्षण घेत होते, आणि मद्रास विद्यापीठास जोडून असलेल्या हैदराबादच्या एकट्या निजाम कॉलेजमध्ये ३०५ विद्यार्थी शिक्षण घेत होते उस्मानिया विद्यापीठाच्या पदवीला ब्रिटिश हिदुस्थानात किमत नसल्यामुळे आणि विद्यापीठाने स्वीकारलेल्या उर्दू-विषयक पक्षपाती धोरणामुळे विशेषत हिंदू विद्यार्थ्यांची सख्या मॅट्रिक (HSLC) पास होताच निजाम कॉलेजकडे धाव घेते पण तेथे प्रवेशाची सख्या मर्यादित असल्यामुळे प्रवेश न मिळणारे विद्यार्थी उस्मानिया कॉलेजातून प्रवेश करतात केवळ हिंदू विद्यार्थ्यांचीच उस्मानिया-बद्दल ही अनास्था आहे असे नाही हैदराबादेतील नामाकित नबाब घराण्यातील आणि मोठमोठ्या सरकारी अधिकाऱ्याची मुलेदेखील याच निजाम कॉलेजमध्ये प्रवेश मिळविण्याकरिता धडपडत असतात, कारण एक तर पदवीची संस्थानाबाहेरील निरुपयोगिता आणि उस्मानियाच्या शिक्षणक्रमातील उर्दूच्या फाजील अभिमानाने इंग्रजीकडे होणारे दुर्लक्ष आणि याला पुरावा प्रत्यक्ष परिस्थिति आणि सरकारी रिपोर्टांतील आकडे याचाच देता यईल उस्मानियाच्या ९ कॉलेजातून १०९५ विद्यार्थी तर एकटचा निजाम कॉलेजात ३०५ विद्यार्थी आहेत ही एकच गोष्ट वरील विधानास पुष्टी देणारी आहे

उस्मानिया विद्यापीठाने, आर्टस् व सायन्सेस, कायदा, इंग्रजी वैद्यक, शिक्षण, एजिनियरिंग इ० शिक्षणाची आणि पदव्या देण्याची व्यवस्था केलेली आहे विद्यापीठाचा सपूर्ण शिक्षणक्रम उर्दूतून चालतो उर्दूचा इकडे उगमच मुळी गेल्या एक-दोन शतकातला हिदुस्थानातील सस्कृत तर दूरच राहो पण शुद्ध हिंदी, बगाली, मराठी, इतकीदेखील उर्दू आजमितीस साहित्य किंवा शास्त्रीय विषयावर ग्रथरचना करण्याइतकी प्रौढ, कर्णमधुर, पदलालित्ययुक्त नाही तेव्हा तिचा शब्द-सभार आणि ग्रथविस्तार वाढीस लागण्याकरिता, निरनिराळ्या शास्त्रीय विषयावरील इंग्रजी ग्रथाची

भाषांतरे करण्याकरिता विद्यापीठास जोडून ट्रान्सलेशन ब्यूरोची स्थापना विद्यापीठाच्या जन्मापासूनच झालेली आहे या भाषातरमडळाने १९३२ साली एकूण ५५ शास्त्रीय कलाविषयक व साहित्यविषयक ग्रथ भाषानराकरिता घेतले व त्यापैकी १७ ची भाषातरे पूर्ण झाली या मडळावरील हजारो रुपयाच्या मोबदल्यात ५७०० नवीन उर्दू शब्दाची निर्मिती झाली

याच साली विद्यापीठाने कायदा कॉलेजवर २४५९० रु, मेडिकल कॉलेजवर १४००२३ रु, शिक्षण (बी टी) कॉलेजवर २३१४२ रु, इजिनिअरिग कॉलेजवर १५४३९४ रु आणि मुस्लिम धर्म शिक्षणावर ६५५५० रु खर्च केल्याचे रिपोर्टांत दिले आहे इस्लामी धर्मशिक्षण विद्यापीठाचा केवळ प्राण आहे असे म्हणण्यास हरकत नाही कारण लॉ कॉलेजच्या विद्यार्थ्यामागे ३०७८१४८७ रु, मेडिकल विद्यार्थ्यामागे १५५३८४८१० रु, बी टी च्या विद्यार्थ्यामागे १७९३८१४८७ रु इजिनिअरिगकडील विद्यार्थ्यामागे४५६८१४८७रु खर्च केला असून इस्लामधर्माच्या विद्यार्थ्यामागे (Faculty of Theology) २८५० रु खर्च केला असे रिपोर्टात स्पष्टपणे म्हटले आहे उस्मानिया कॉलेजातून शिक्षण घेणाऱ्या आर्टस् व सायन्सच्या विद्यार्थ्यामागे ६६४ रु खर्च आला आहे हायस्कुलात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यामागे सरासरी ७० रु, मिड्ल स्कूलच्या विद्यार्थ्यामागे रु ३१८१० आणि प्रायमरीच्या विद्यार्थ्यामागे रु ९८७ शिक्षण खात्याने खर्च केला आहे प्राथमिक शिक्षणासारख्या साक्षर करणाऱ्या शाळावर सरासरीने पाहता प्रत्येकी सरकारने अवघे ४६ रु खर्च केले आहेत विद्यापीठाने इस्लाम शिक्षणावर (Theology) प्रत्येक विद्यार्थ्यामागे केलेल्या खर्चांत लॉचे ९, मेडिकलचे २, इजिनियरिगचे ६, आर्टस्चे ४, विद्यार्थी शिकू शकतात त्याचप्रमाणे तेवढ्याच खर्चांत (एका विद्यार्थ्याच्या Theologyच्या) ४० विद्यार्थ्यांना हायस्कूल शिक्षणाचा, ९० विद्यार्थ्यांना मिड्ल स्कूल शिक्षणाचा लाभ घेता आला असता, किंवा त्याच एका विद्यार्थ्याच्या खर्चांत ६२ गावी प्राथमिक शाळा (प्रत्येकी ४६ रु.) प्रमाणे चालवितां आल्या असत्या

सस्थानात एकूण खाजगी शाळा १०४६ असून त्यापैकी ९५० प्रायमरी असून बाकीच्या दुय्यम शिक्षणाच्या आहेत या ९५० प्रायमरी शाळापैकी ७४९ ना सरकारी साहृय मिळते दुय्यम शिक्षण देणाऱ्या सस्थापैकी फारच थोड्याना सरकारकडून द्रव्यसाहाय्य मिळते १९२३–२४ पर्यंत खाजगी शिक्षणसस्थावर कोणतेही विशिष्ट निर्बंध नव्हते म्हणून तोपर्यंत सस्थानभर अनेक लहान मोठ्या शिक्षणसस्था शिक्षण प्रसाराचे कार्य करताना आढळत हैदराबादचे विवेकवर्धिनी हायस्कूल, "औरगाबादची सरस्वती भुवन पाठशाळा, गुलबर्ग्याचे नूतन विद्यालय, रायचूरचे हमदर्द स्कूल, राष्ट्रीयशाळा हिप्परगें इत्यादि सस्था आजहि, पूर्वीच्या इतक्या राष्ट्रीय बाण्याने नसल्या तरी बरेच कार्य करीत आहेत यासारख्याच अनेक सस्था १९२३–२४ पर्यंत सार्वजनिक कार्यकर्त्यांनी जनतेच्या साहाय्यावर चालविल्या होत्या या शाळातील शिक्षणक्रम सरकारी शिक्षणक्रमासारखाच असला तरी स्वधर्म आणि स्वभाषा याबद्दल आदर अशा सस्था विद्यार्थ्यांच्या मनात जागृत ठेवीत या शाळामधील हा शिक्षणक्रम डॉ रॉस मसूद साहेबाच्या वर उल्लेखिलेल्या धोरणाशी थोडासा विसगत असल्यामुळे किंवा उर्दूच्या वाढत्या बडेजावात आणि विद्यापीठाच्या धोरणात या सस्थामुळे कमीपणा येण्याचा सभव असण्याच्या सशयावरून पण बाह्यत शिस्तीच्या नावाखाली खाजगी शिक्षणसस्थावर डॉ मसूदसाहेबानी आपल्या अधिकारात बधन घातले मसूद साहेबानी काढलेल्या या कायद्याने खाजगी प्रयत्नाने चाललेल्या २७४८ शाळाचा बळी अवघ्या दोन वर्षांत घेतला सरकारी रिपोर्टांत इ स १९२४ मध्ये खाजगी शिक्षणसस्थाची सख्या ४०५३ दिली असून १९२७ मध्ये १३०५ दिली आहे आणि हा कायदा १९२५ मध्ये अस्तित्वात आला अर्थातच या पराक्रमी कायद्याने वरील सस्थाचा बळी घेतला नाही असे कसे म्हणता येईल ?

बळी घेतलेल्या संस्थांत पुस्तकी शिक्षण देणाऱ्या शाळाच असत्या तर गोष्ट वेगळी खालच्या अधिकाऱ्यानी विशेषत पोलीस अधिकाऱ्यांनी त्याची बजावणी फारच कडक रीतीने केली, ती इतकी की कित्येक ठिकाणच्या वेदपाठशाळा आणि सस्कृत पाठशाळाही बद पडल्या. औरगाबाद, पैठण व बीदर येथील सस्कृत व वेदपाठशाळा कित्येक वर्षांपासून चालत असलेल्या या कायद्यामुळें बद पडल्या ही गोष्ट पाहिल्यास कायद्याचा जाचकपणा स्पष्ट होईल

ज्या कायद्याने एवढा अनर्थ केला तो पुढील-प्रमाणें:—

"सस्थानात कोणकोणत्या सस्था कोणकोणत्या पद्धतीने काम करतात याची माहिती शिक्षणखात्यास व्हावी म्हणून आणि सस्थानातील शिक्षणसस्था, शिक्षण आणि आरोग्य याच्या मूलतत्त्वाना धरून चालतात की नाही ते पाहण्याकरता पुढील कायदा केला जात आहे त्याचे नियम पुढें स्थापन होणाऱ्या व सध्या चालू असलेल्या सर्व खाजगी शाळाना लागू आहेत

१ पधरा किंवा अधिक मुलाना शिक्षण देणारी शाळा, खाजगी शाळा या सदरात येईल.

२ (अ) यापुढे डिव्हिजनल इन्स्पेक्टरच्या परवानगीशिवाय मुलाची प्राथमिक शाळा स्थापन करता येणार नाही

(ब) शिक्षणखात्याच्या डायरेक्टराच्या संमतीखेरीज मिड्ल् स्कूल किवा हायस्कूल उघडतां कामा नये

(क) मुलीच्या शाळेकरिता सुभा इन्स्पेक्टरची सम्मती घेतली पाहिजे

३ नवीन शाळा उघडू इच्छिणाराने शाळा उघडण्याचा हेतु, शिक्षणक्रम, शाळेच्या इमारतीची माहिती, शिक्षकाची सख्या आणि त्याचे शिक्षण याची माहिती भरलेला तक्ता भरून त्या त्या अधिकाऱ्याकडे परवानगी अर्जाबरोबर पाठवावा.

६. खाजगी शाळेत सर्व धर्मांच्या व जातीच्या विद्यार्थ्यांना प्रवेश मिळाला पाहिजे

अशा विशिष्ट शाळा सरकारी अधिकाऱ्यांच्या परवानगीनें काढतां येतील

७ (अ) खाजगी शाळातील शिक्षणक्रमांत विधर्मीयाची धर्मभावना दुखविणारा किंवा त्याना ज्या योगें वाईट वाटेल असा शिक्षणक्रम असू नये

(ब) राजघराणे, सरकार किवा राजा याविषयी अप्रीति उत्पन्न करणारे शिक्षण देतां कामा नये

१० या नियमाविरुद्ध वागणाऱ्या सस्था बद केल्या जातील

११ नवीन शाळा उघडण्यास परवानगी देणे, न देणे अथवा असलेली शाळा बद करणे इत्यादि गोष्टी त्या त्या अधिकाऱ्याना आपल्या मर्जीनुरूप करता येतील, मात्र त्यानी तसे करण्याची कारणे दाखविली पाहिजेत

१२ नवीन शाळा उघडण्यास किवा असलेल्या चालविण्यास बदी करण्याचा या कायद्याचा उद्देश नाही म्हणून अशा सस्थाना त्या जोपर्यंत शिक्षण, नीति आणि समाज याना बिघडवीत नाहीत तोपर्यंत त्या त्या अधिकाऱ्यानी साहाय्य द्यावे

हा कायदा वरवर जरी निरुपद्रवी असला तरी तो अत्यत जाचक असा आहे सुशिक्षित पदवीधर शिक्षक, हवाशीर व प्रशस्त खोल्या असलेली इमारत, नवीन धर्तीच्या खुर्च्या आणि बाके इत्यादि गोष्टी कोणतीही शाळा उघडताना असल्याच पाहिजेत हा सरकारी हट्ट विलक्षणच आहे यात शका नाही कोणा एका विक्षिप्त राजाने प्राचीन काळी आपल्या राज्यातील सर्व माणसानी खावयाचे झाल्यास तूप खिचडीच खाल्ली पाहिजे अशी आज्ञा काढल्याचे सागतात त्यातलाच प्रकार हा! भूक शमण्यास तूप खिचडीचीच ज्याप्रमाणे आवश्यकता नाही, ती केवळ कोरड्या भाकरीवर देखील भागू शकते त्याचप्रमाणे ज्ञानप्रसाराच्या पवित्र कार्यास राजाच्या रगमहालातील झुलत्या झोपाळ्यावर बसण्याची आवश्यकता नाही; मोठ्या हवाशीर इमारतीची

किंवा खुर्च्या, टेबलें आणि बाकांची आवश्यकता नाही, पगारी व ट्रेन्ड शिक्षकच मिळविले पाहिजेत असे नाही आजच्या शिक्षणाधिकाऱ्याना किंवा हा निर्बंध घालणाऱ्या डॉ रॉस मसूद-साहेबाना याचे ज्ञान नव्हते असे नाही पण त्यानी हा निर्बंध तसाच ठेवला ही गोष्ट खरी

ही परिस्थिति सस्थानातील हिंदू आणि मुसलमान ज्ञात्याना असह्य होऊन त्यानी आपली गाऱ्हाणी सरकारच्या कानावर घालण्याकरिता प्रजाशिक्षण परिषदेचे प्रथम अधिवेशन १९२८ च्या ऑक्टोबरात प हृदयनाथ कुझरू याच्या अध्यक्षतेखाली भरविले, व या कायद्याविरुद्ध आणि इतर शिक्षणविषयक गाऱ्हाणी वेशीवर टागली, पण त्याचा उपयोग झाला नाही दुसरे अधिवेशन पुढील वर्षी डॉ त्रिपाठी (अलाहाबाद विद्यापीठ) याचे अध्यक्षतेखाली भरून ठरावाचा पुनरुच्चार केला, पण रामा शिवा गोविंदा ! त्यानतर तिसरे अधिवेशन भरविण्यास चालकाना अद्यापि परवानगीच सरकारकडून मिळाली नाही !

१९३४ सालच्या अखेरीस सरकारने सस्थानातील शिक्षणाची पुनर्घटना करण्याकरिता उस्मानिया विद्यापीठाचे प्रो व्हाईस चॅन्सेलर याच्या अध्यक्षतेखाली एक सरकारी अधिकाऱ्याची कमेटी स्थापन केली आहे या कमेटीत लोकातर्फेचा एकही प्रतिनिधी नाही हे विशेष ध्यानात ठेवण्यासारखे आहे सरकारी धोरणास पाठिबा देणाऱ्याच्या साक्षी घेण्याचा फार्स झाला लोकमताला धिक्कारून कमेटीने चालविलेल्या या साक्षी घेण्याच्या विरुद्ध सिकदराबाद येथील बुलेटिन या इग्रजी दैनिकात खरपूस लेख आल्यावर अधिकारी वर्ग जागृत झाला आणि त्यानतर प्रजेपैकी कोणास साक्ष द्यावयाची असल्यास त्याने कमेटीस अमुक अमुक वेळी भेटावे असा खुलासा अधिकाऱ्यानी केला यानतर बऱ्याचशा सार्वजनिक हिंदू कार्यकर्त्यांनी आणि परिषदेच्या स्टँडिग कमेटीने आपली कैफियत कमेटीपुढे सादर केली आहे. असो

संस्थानांत मुलींच्या सर्व प्रकारच्या शाळा ६९६ असून त्यांतून ४५,३०० मुली शिक्षण घेत आहेत या मुलीच्या शाळापैकी ६६५ प्रायमरी, १९ मिडल स्कूल्स्, ६ हायस्कूले (यापैकी ४ खाजगी व २ सरकारी) आणि १ झनाना कॉलेज असून त्यावर एकूण वार्षिक खर्च ८,८७,८६७ रु होत आहे

सस्थानात हैदराबाद, औरगाबाद, वरगळ, गुलबर्गा व मेदक या ठिकाणी पुरुष शिक्षकांकरता नॉर्मल ट्रेनिग स्कुले असून हैदराबाद, सिकदराबाद व वरगळ या ठिकाणी स्त्री शिक्षकांकरिता ट्रेनिग स्कूल्स् आहेत त्यावर एकूण खर्च १७६ हजार रु झाला.

खास औद्योगिक शिक्षणास वाहिलेली नामपल्ली औद्योगिक स्कूल ही एकच सस्था सरकारी ग्रँट घेऊन चालत आहे या शाळेत सुतारकाम, विणकाम, वेतकाम, लोहारकाम, ताबटकाम इत्यादींचे प्रायोगिक शिक्षण मिळते या शाळेत आजमितीस १०६ विद्यार्थी निरनिराळ्या उत्पादक धद्याचे शिक्षण घेत आहेत याशिवाय १३ हायस्कूल्स् आणि ५ स्पेशल स्कूल्स्मधूनही वरील कलाखेरीज छापकाम, शेती, सूत काढणे, होजियरी आणि बिद्रीकाम याची माहिती देण्याची शिक्षण खात्याने व्यवस्था केलेली आहे

याखेरीज आणखी एक औद्योगिक शाळा म्हणजे हैदराबाद येथील मिट मास्तरच्या देखरेखीखाली असलेली 'उस्मानिया टेक्निकल इन्स्टिटयूट' ही होय या इन्स्टिटयूटमध्ये १३ वर्ग असून विद्यार्थ्यांची सख्या ३०९ आहे या सस्थेत ओतकाम, लोहारकाम, फिटिंग, मशीनशॉपसबधी माहिती, सुतारकाम, मुलाम्याचे काम, विजेचे पखे जोडणे इ इ कामे शिकविण्याची व्यवस्था आहे इलेक्ट्रिककडील विद्यार्थ्यांना बॉयलर्ससबधी माहिती, फिटिग, टेस्टिग आणि रिपेअरिंग इ कामाची माहिती देतात

सस्थानांत धर्मशिक्षण देणाऱ्या १३ इस्लामी व ५ हिंदू सस्था आहेत त्यापैकी 'निझामिया' नांवाच्या शाळेंत अरबी शिक्षणाची व्यवस्था

केली आहे व तेवढयाकरता सरकार त्या शाळेस वार्षिक ३०,००० रु देते

अनाथ बालकांना सभाळून त्याना उद्योग-धंद्याचे शिक्षण देणारी 'व्हिक्टोरिया मेमोरियल ऑर्फनेज' या नावाची सस्था येथील रेसिडेट बहादुर याच्या अध्यक्षतेखाली सरुनगर येथे आहे तीत ९८ मुले आणि ११२ मुली आहेत त्याना विणकाम, वेतकाम, सुतारकाम, शिवणकाम, शिशुसगोपन आणि पाकविद्या इत्यादीचे शिक्षण दिले जाते या सस्थेचा १९३२ चा खर्च २३,८३२ रु होता

यानतर विद्यार्थ्यांना उत्तेजन देण्याकरता आणि त्याना परदेशी किवा परप्रातात शिक्षण घेण्याकरताहि पण शिष्यवृत्त्या देण्याची प्रथा शिक्षणखात्याने चालू ठेविली आहे या शिष्य-वृत्त्या सर्वसाधारण, स्पेशल युरोपियन वा एशि-याटिक आणि रिसायती अशा चार प्रकारच्या असतात सर्वसाधारण शिष्यवृत्त्या कॉलेजे, हाय-स्कुले, मिड्ल् आणि प्रायमरी शाळातून शिक-णाऱ्या विद्यार्थ्यांना मिळतात स्पेशल शिष्यवृत्त्या ट्रेनिग कॉलेजातून, इजिनियरिंग, औद्योगिक आणि धार्मिक शाळातून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना दिल्या जातात फॉरेन शिष्यवृत्त्या सकारकडून जे विद्यार्थी परदेशी शिक्षणाकरिता पाठविले जातात त्याच्या खर्चाकरता सरकार खर्च करते रिसायती शिष्यवृत्त्या गरीब आणि अभ्यासू विद्यार्थ्यांना देतात या सर्व प्रकारच्या शिष्य-वृत्त्यावर सरकारने १९३२ साली ४,९०,४४० रु खर्च केले

त्याचप्रमाणे विद्यार्थ्यांना पुढील शिक्षणक्रम घेण्याकरता सरकारने त्या वर्षी २,०५,७९३ रु कर्ज दिले

या शिष्यवृत्त्या गरीब आणि होतकरू विद्यार्थी-करिता आहेत अशी घोषणा वारवार होत असली तरी त्यापैकी बहुतेक नऊदशाश भाग मुसलमान विद्यार्थ्यांच्याच वाट्यास जातो परदेशी शिक्ष-णास सरकारकडून पाठविलेले सर्वच विद्यार्थी बहुधा मुसलमान असतात क्वचित् प्रसगी हिंदू विद्यार्थ्यांस पाठविले जाते, नाही असे नाही. शिष्यवृत्त्या घेणाऱ्यात बहुधा मोठमोठे मुसल-मान अधिकारी याचीच मुले जास्त असतात. कारण ते हुषार असतात असे नसून त्याच्याकरता मोठमोठ्याच्या शिफारशी असतात म्हणून प्रत्यक्ष हल्लीच्या निजाममाहेबाच्या भावी जावयाचा इग्लडमधील शिक्षणखर्चदेखील याच स्टेट स्कॉलर-शिपमधून चालत आहे ही एकच गोष्ट आमच्या वरील विधानास पुष्टि देणारी आहे

आधुनिक शिक्षणक्रमात पुस्तकालये आणि वाचनालये यास अत्यत मोठे स्थान आहे हे कोणाही सुशिक्षितास नाकबूल असणार नाही सरकारी वाचनालये (लोकोपयोगी) पाहू गेल्यास अवघ्या सस्थानात हैदराबाद शहरातील 'आस-फिया लायब्ररी' हे एकच आहे १९३२ मध्ये यावर सरकारने ८८,८१२ रु खर्च केले सस्थानातील शाळा आणि कॉलेजे यातून असणाऱ्या लाय-ब्ररयावर ८४,३६७ रु आणि सरकारी खात्याच्या लायब्ररयावर २४,२१० रु खर्च केले या पैशा-तूनच निरनिराळ्या वृत्तपत्राना, मासिकाना त्याची वर्गणी मिळाली या सर्व लायब्ररयातून इग्लिश, उर्दू, पर्शियन आणि अरेबिक भाषेची पुस्तके ठेवलेली आहेत सस्थानी हिदूच्या तेलगू, मराठी आणि कानडी यापैकी कोणत्याही भाषेचे पुस्तक या सरकारी पुस्तकालयातून आढळत नाही हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे काही खात्याच्या लायब्ररयातून प्रातिक भाषाची सस्था-नात प्रसिद्ध झालेली चोपडी आढळतात, नाही असे नाही पण ती येथील मुद्रण निर्बंधान्वये मुद्र-काने आणि प्रकाशकाने सरकारकडे विनामल्य २ प्रती सादर कराव्या लागतात, त्यापैकीच अस-तात आणि याला कारणेही पण तशीच आहेत सरकारी खात्यातून लहानमोठ्या अधिकारावर मुसलमानाचा भरणा असल्यामुळे किवा हिंदू क्वचितच असल्यामुळे प्रातिक भाषातील पुस्तके आपल्या पुस्तकालयात अडगळीप्रमाणे असावी हे त्या त्या खात्यातील अधिकाऱ्याना रुचत नसावे, किंवा लोकमताची तरी क्षिति नसावी यावाचून कोणतेच कारण सभवत नाही नौकरीत

शिरतांना मुलकी भाषेची म्हणून परीक्षा असते, पण तो निव्वळ फार्स असतो प्रांतिक भाषेचे ज्ञान नौकरीत शिरणाऱ्यापैकी शे ९० ना नसते

यानतर शिक्षणाचा प्रसार करणारी सस्था म्हणजे वृत्तपत्र आणि मुद्रण सस्था सस्थानात मुद्रणस्वातत्र्य नाही इतकेच नव्हे तर हिंदूमधील सुशिक्षिताना केवळ मुद्रणासारखा धदा म्हणून करण्यासही सरकारची परवानगी मिळत नाही सरकारच्या होम सेक्रेटरीकडे छापखान्याकरिता व पोलिटिकल सेक्रेटरीकडे वृत्तपत्राकरता परवानगी मागावी लागते नतर ते ते अधिकारी पोलिसकडे त्या परवानगी मागणाऱ्या माणसाचा रिपोर्ट मागवतात आपल्या ओळखीचा कोणी नरी बडा माणूस असून त्याची शिफारस असल्याखेरीज पोलीसकडून त्या माणसाबद्दल चागला रिपोर्ट जात नाही व पोलीस रिपोर्टाच्या बऱ्यावाईटपणावर छापखान्याची किंवा वृत्तपत्राची परवानगी मिळणे अवलबून असल्यामुळे बहुधा हिदना त्यातूनही सुशिक्षित हिदूना परवाना मिळणे अशक्य होते हो किवा ना करण्याकरिता त्या माणसाला ६ ते ८ महिन्याचा अवधि लागतो पोलीसखात्यात शे ९९ मुसलमानच आहेत

१९३२ साली संस्थानांत जवळ जवळ १२५ छापखाने असून त्यातून ५५९ चोपडी प्रसिद्ध झाली त्यापैकी मराठी भाषेतील मोठ्यांतली मोठी ग्रथनिर्मिति म्हणजे गणपतीच्या मेळ्याच्या पद्यावल्या ४४ तेलगू चोपडी प्रसिद्ध झाली आणि ४१४ उर्दू व फारशी भाषेची पुस्तके प्रसिद्ध झाली उरलेली चोपडी इतर भाषातून प्रसिद्ध झाली

सस्थानात एकदर ८ वृत्तपत्रे असून त्यात मराठीची दोन, तेलगू एक, ब्रिटिशाच्या अमलाखालील सिकदराबाद येथे निघणारे इग्रजी दैनिक एक आणि बाकीची चार उर्दूतून प्रसिद्ध होतात कानडी बोली बोलणारा १६,२०,०९४ लोकवस्तीचा भाग हैदराबाद सस्थानात असून त्या भाषेत एक वृत्तपत्र काढण्यास परवानगी मिळविण्याचा प्रयत्न पुष्कळशा कानडी सुशिक्षितानी केला, पण त्याना सरकारकडून परवानगी मिळाली नाही याचा अर्थ इतकाच की लोकशिक्षणाचे अग म्हणून मुद्रण आणि वृत्तपत्राचा उपयोग सस्थानातील सुशिक्षिताना होऊ नये याची पुरेपूर काळजी सस्थानी सरकार घेत असते

आतापर्यंत शिक्षणाच्या निरनिराळ्या अगाचा विचार झाला आता सस्थानात या शिक्षणविषयक प्रयत्नामुळे शिक्षणाचा प्रसार कितपत झाला याचा विचार करू पुढील कोष्टकावरून सस्थानात साक्षरतेचा प्रसार कसकसा वाढत वा घटत गेला व शिक्षणावरील खर्च याचा बोध होईल. शिक्षण आणि शिरगणतीच्या सरकारी रिपोर्टावरून पुढील आकडे घेतले आहेत.

| सन | लोकसख्या | साक्षर | हजारी | खर्च रु | निरक्षर | किती सख्येत एक साक्षर |
|---|---|---|---|---|---|---|
| १८८१ | ९८४५५९४ | ३१८८८० | ३७ | २२९२२० | ९५२६७१५ | ३० ०७ |
| १८९१ | ११५३७०४० | ३७०७५२ | ४४ | ३०३२९३ | १११५६२८८ | ३१ ३३ |
| १९०१ | १११४११४२ | ३२७१६९ | ३४ | ७४८६६५ | १०८११९७३ | ३३.०८ |
| १९११ | १३३७४६७६ | ३६८१६६ | ३२ | १०१९७८७ | १३००६५१० | ३६ २ |
| १९२१ | १२४७१७७० | ३६५२९० | ३३ | ७७२५८०७ | १२१०६४८० | ३०.३ |
| १९३१ | १४४३६१४८ | ५९५६३३ | ४१.२५ | १०६९१०५१ | १३८४०५१५ | २४.२५ |

| सन | हिंदूंची संख्या | साक्षरांची संख्या | निरक्षर | साक्षर प्रमाण |
|---|---|---|---|---|
| १८८१ | ८८९३१८१ | २६४५०७ | ८६२८६७४ | ३३ १० |
| १८९१ | १०३१५२४९ | ३४६४७५ | ९५६९७७४ | २९·०७ |
| १९०१ | ९८७०८३९ | २५०२६७ | ९६२०५७२ | २९ १२ |
| १९११ | ११६२६३७५ | २६७०४१ | ११३५९३३४ | ४३·११ |
| १९२१ | १०६५६४५३ | २७७०५६ | १०३७९३९७ | ३६ ४६ |
| १९३१ | १२२०३५०० | ४१०९०४ | ११७९१५९६ | २९ ६६ |

| सन | मुस्लिम सख्या | साक्षरांची सख्या | निरक्षर | साक्षरप्रमाण |
|---|---|---|---|---|
| १८८१ | ९२५९२९ | ४५७५२ | ८८०१७७ | २०·२५ |
| १८९१ | ११३८६६६ | ७०१४७ | १०६८५१९ | १६ २५ |
| १९०१ | ११५५७५० | ६३११० | १०९२६४० | १८ २ |
| १९११ | १३८०९९० | ८१२६० | १२९९७३० | १६ ०६ |
| १९२१ | १२९४७७ | ११५५२२ | ११८२७५५ | ११·२३ |
| १९३१ | १५३५६६६ | १५८८५९ | १३७५८०७ | ९ ६६ |

आता गेल्या ५० वर्षात स्त्रीशिक्षणात सस्थानने किती प्रगति केली हे पुढील कोष्टकावरून समजेल–

| सन | स्त्रियाची सख्या | साक्षर | निरक्षर | किती जणात १ साक्षर |
|---|---|---|---|---|
| १८८१ | ४८४३४५७ | ४९६२ | ४८३८४९५ | ९८२·३३ |
| १८९१ | ५६६३९११ | ६९२० | ५६५६९९१ | ८१८·१२ |
| १९०१ | ५४६७५१३ | १८८८३ | ५४४८६३० | २८·९११ |
| १९११ | ६५७७५५८ | २४०७७ | ६५५३४८१ | २७३·३३ |
| १९२१ | ६१२६६९९ | ४३३४० | ६०८३३५९ | १४१·६६ |
| १९३१ | ७०६६१३८ | ६८०३९ | ६९९८०९९ | १५५·१४ |

## जातवारीनें संस्थानांतील शिक्षणांत वाढ ( कॉलेज शिक्षण )

| सन | हिंदु | मुसलमान | हिंदूची सख्या | मुस्लीम सख्या |
|---|---|---|---|---|
| १८९४ | २३ | ११ | १०३१५२४९ | ११३८६६६ |
| १९०० | २२ | १२ | ९८७०८३९ | ११५५७५० |
| १९०५ | २४ | ८ | ,, | ,, |
| १९१० | २४ | ३० | ११६२६३७५ | १३८०९९० |

## उस्मानिया विद्यापीठाच्या स्थापनेनंतर

| सन | हिंदु | मुसलमान | हिंदूची संख्या | मुस्लीम सख्या |
|---|---|---|---|---|
| १९१८ | ९८ | २०७ | ११६२६३७५ | १३८०९९० |
| १९२५ | ३९१ | ६१७ | १०६५६४५३ | १२१८२७७ |
| १९३० | ४८३ | ६६९ | १२२०३५०० | १५३४६६६ |

## आतां निरनिराळ्या जातींतील स्त्रियांत साक्षरता कशी वाढत गेली त्याचे आंकडे

| सन | मुसलमान स्त्रिया | साक्षर | किती जणात एक साक्षर |
|---|---|---|---|
| १८८१ | १३६६९९ | ३१ | ४४०९·०८ |
| १८९१ | ४५६४८३ | १२२९ | ३७१·१४ |
| १९०१ | ५६५५२० | ५८१६ | ९७·२५ |
| १९११ | ६७५१६९ | ८४७७ | ७९·११ |
| १९२१ | ६३९२५५ | १९५९९ | ३२·१२ |
| १९३१ | ७४३२३१ | २१४४९ | ३४·६६ |

| सन | हिंदू स्त्रिया | साक्षर | किती जणात एक साक्षर |
|---|---|---|---|
| १८८१ | ४२७५३६९ | १८८९ | २३१६·३३ |
| १८९१ | ५०६८२७८ | ५२१७ | ९५३·२५ |
| १९०१ | ४८४६६३८ | ९४७५ | ५११·१२ |
| १९११ | ५७२९१०१ | १०८९३ | ५२५·०६ |
| १९२१ | ५२४९८६० | १७३१६ | ३०३ १६ |
| १९३१ | ५९८५९०१ | ३८५८२ | १५५·१८ |

| सन | हिंदू स्त्रिया | मुसलमान त्रिया |
|---|---|---|
| १९२४ | ० | ८ |
| १९२७ | ० | ९ |
| १९३० | १ | ११ |

वरील कोष्टकावरून आज मितीस १० मुसलमानात एक साक्षर आणि ३० हिदूत १ साक्षर सस्थानात नादत आहे हे स्पष्ट आहे लोकसख्येत हिदूची सख्या मुसलमानाच्या आठ पट आहे हे ध्यानांत ठेवल्यास मुसलमान जाति शिक्षणात हिदूच्या २४ पटीने पुढारलेली आहे हे स्पष्टपणे कळेल त्याचप्रमाणे उर्दूच्या माध्यमामुळे (१९१३ पासून) व उस्मानिया विद्यापीठाच्या स्थापनेमुळे (१९१८ मध्ये) गेल्या २० वर्षांत मुसलमान जातीने दुपटीने प्रगति केली याचाहि बोध होईल

येथपर्यंत शिक्षणखात्याच्या आणि शिरगणतीच्या सरकारी रिपोर्टावरून सस्थानातील शिक्षणाची सर्वसाधारण परिस्थिति वर्णन केली यापुढे शिक्षणखात्यांत लोकाच्या दृष्टीने कोणते दोष आहेत किवा कोणत्या सुधारणा ताबडतोब करावयास पाहिजेत याचे दिग्दर्शन करू

१ आज सरकारच्या शिक्षणखात्याने ठरविलेल्या शिक्षणक्रमात मराठी, तेलगू आणि कानडी भाषाना स्थान नाही ही परिस्थिति बदलली पाहिजे सस्थानात आज मराठी, तेलगू व कानडी मातृभाषा असणाराची सख्या अनुक्रमे ३७८६८३८, ६९७२५३४ व १६२००९४ अशी १९३१ च्या रिपोर्टांत दिली असून उर्दू मातृभाषा असणाराची १५०८२७२ आहे असे म्हटले आहे (या सख्येत मुसलमान म्हटला की त्याची मातृभाषा उर्दू असे गृहीत धरले आहे पण खेड्यातून वस्तीस असलेल्या मुसलमानाची मातृभाषा क्वचितच उर्दू असते हे पाहिल्यास उर्दू मातृभाषा असणाराची सख्या रिपोर्टांत वस्तुस्थितीस सोडून आहे हे ध्यानात येईल) अर्थात् सस्थानातील शे ९० टक्के प्रजेची मातृभाषा उर्दू नाही पण या भाषेस दोन तऱ्हेने प्राधान्य देण्यात येते एक ती राजभाषा म्हणून व दुसरे हिदुस्थानची भावी (Lingua Franca) म्हणून पण राजा हा प्रजेचा प्रतिनिधी म्हणून प्रांतिक भाषाहि त्याच्या भाषा अस शकतात त्याची एकट्याची भाषा प्रजेवर लादण्याची जबरदस्ती होणे योग्य नव्हे. दुसरे येथील उर्दू ही उत्तर हिंदुस्थानात राष्ट्र-

भाषा म्हणून प्रचलित असलेली हिंदी नसून ती अरबी आणि फारसी मिश्रित अतएव त्या भाषा-इतकीच एतद्देशीयाना दुर्बोध असलेली भाषा होऊन बसली आहे अशी भाषा प्राथमिक, दुय्यम आणि उच्च शिक्षणात बोधभाषा म्हणून ठरविणे, एतद्देशियाच्या शैक्षणिक प्रगतीला अडसर घालून ठेवण्याइतकेच हानिकारक आहे कविवर्य मोरो-पताची केकावलि समजण्यास ज्याप्रमाणे मराठीचे उत्तम ज्ञान, सस्कृतचे उत्तम ज्ञान आणि भारतभागवतादि पौराणिक कथाशी पूर्ण परिचयाची आवश्यकता असते, तसाच प्रकार येथील शिक्षणक्रमाचा सर्व विषयाचे आकलन होण्यास उर्दू उत्तम पाहिजे उर्दू उत्तम होण्यास फारशी व आरबी भाषाचे ज्ञान आणि व्युत्पत्ति हवी या उर्दूच्या अडसरामुळे हिंदू विद्यार्थ्यांचे अत्यत नकसान झालेले आहे

प्राथमिक शाळातून हिंदू विद्यार्थ्याला आपल्या मातृभाषेचे ज्ञान अक्षर ओळखीपलीकडे मिळू शकत नाही स्वभाषेचेच पूर्ण किवा चागले ज्ञान नसल्यामळे उर्दू भाषा लवकर ग्रहण करता येत नाही अशा स्थितीतच सर्वच विषय उर्दूतून म्हणून त्याला एकही विषय ग्रहण करता येत नाही किवा समजत नाही प्राथमिक अवस्थेतच इतक्या ठोकरा खाल्ल्यावर दुय्यम शिक्षणात प्रवेश मिळणार तेथेही तीच स्थिति दुय्यम ।शिक्षणात विद्यार्थ्याला आपली मातृभाषा शिकण्याची मुभा ठेविली आहे पण ती इच्छा असल्यास आणि मराठी, तेलगू किवा कानडी एक विषय म्हणून घेण्यास विद्यार्थी किवा पालक या दोहोचीही इच्छा नसते कारण तीच उर्दू घेतल्यास तीत प्रगति होऊन इतर विषय (हे सर्व उर्दूतूनच शिकविले जातात) समजण्यास सोपे जाते व परीक्षेत उत्तीर्ण होण्यास त्याचा फार उपयोग होतो अर्थातच आपण नापास झालो तर चालेल पण मातृभाषा शिकेनच, किंवा आपल्या मुलाने शिकावी ही तळमळ किवा इतका स्वार्थत्याग सामान्य व्यक्तीत आढळणे शक्य नाही (मुसलमान विद्यार्थ्याला सर्व शिक्षण उर्दूतूनच असल्याने मातृभाषेचा प्रश्नच उरत नाही )

यानतर विद्यापीठाने आपल्या उच्च शिक्षणात मराठी, तेलगू आणि कानडी भाषाना वाव दिला आहे काही काही विद्यार्थी त्या भाषा घेऊन पदवी घेतलेलेही आढळतात पण प्रातिक भाषाना सरकारी दप्तरातून वाव नसल्यामुळे व हे विद्यार्थी उर्दूत साहजिक असावे तितके निष्णात नसल्याने त्याचा पुढील आयुष्यक्रम अत्यत जिकिरीचा आणि कष्टाचा होतो अशी उदाहरणे डोळ्यापुढे नित्य वावरताना दिसल्यावर प्रातिक भाषा घेऊन पदवी घेण्याचा वेडेपणा करण्यास कितीसे विद्यार्थी पुढे येतील ?

आता प्रश्न असा येईल की, सरकारने आपल्या प्रायमरी शाळाच्या करीक्युलममध्ये 'मेहृधू' कमेटीने केलेल्या शिफारशीना अनुसरून 'प्राथमिक शाळातील शिक्षण मुलाच्या मातृभाषेतूनच देण्यात येईल' असे स्पष्टपणे दिले असता अशी स्थिति का ? सस्थानातील बहुसख्य समाजापुढेहि पण हाच प्रश्न आहे कागदोपत्री असा स्पष्ट निर्बध असून देखील अनुभव मात्र उलट आहे शिक्षक नेमतानाच प्रातिक भाषेच्या गरजा पाहावयास हव्या होत्या पण उर्दूच्या अभिमानाच्या भरात प्रातिक भाषेचे ज्ञान नसणाऱ्या शिक्षकाची भरती केली, आणि आता प्रातिक भाषा जाणणारे शिक्षक नेमण्यास सरकारजवळ आर्थिक सवड नाही अशा सबबीवर मराठी, तेलगू व कानडी भाषाचे उच्चाटन होते याचा अर्थ काय ? केवळ उर्दू जाणणारे शिक्षक कमी करून त्याऐवजी या भाषा जाणणारे शिक्षक सस्थानातील प्राथमिक शाळातून नेमल्यासच प्रातिक भाषावरील आजचे मरण टळू शकेल प्राथमिक शाळातून ही सुधारणा झाल्यानतरहि याच धोरणाने दुय्यम शिक्षणाचीही पुनर्घटना करावी व त्याच पावलाने उच्च शिक्षणातही फेरफार करावे असे केले तरच प्रातिक भाषाचा तरणोपाय आहे हे करताना उस्मानिया पीठाचीही आखणी नव्याने केली पाहिजे विद्यापीठाच्या मराठी, तेलगू व कानडी अशा तीन शाखा करून त्या त्या शाखाकडे अनुक्रमे मराठवाडा, तेलगण व कर्नाटक असे सस्थानी प्रात शिक्षणार्थ द्यावे सपूर्ण शिक्षण-

क्रम विद्यार्थ्यांच्या मातृभाषेतून व्हावा उर्दूला फार तर एक आवश्यक भाषा एवढेंच महत्त्व असावे या शाखापैकी कोणत्याही शाखेतून उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्याला सरकारी नोकरीत शिरता यावे एतदर्थ सरकारी दप्तरे प्रातिक भाषातून ठेवण्याची व्यवस्था झाली पाहिजे

मुबई, मद्रास, कलकत्ता इत्यादि विद्यापीठानी व त्या त्या प्राताच्या शिक्षणखात्यानी आपापल्या शिक्षणखात्यात प्रातिक भाषाना सपूर्ण नसला तरी पुष्कळच वाव दिला आहे अशा स्थितीत प्रातिक भाषाची उचलबागडी सस्थानच्या शिक्षणखात्याने करणे कितपत न्यायाचे आणि शहाणपणास धरून होईल ?

यानतर येथील शिक्षणखात्याने आपल्या शिक्षणक्रमात हिंदूची सस्कृति, धर्म इत्यादि जगूनवाचून राहील अशी कोणतीच व्यवस्था केली नाही हा एक त्याचा मोठा दोष आहे सस्थानने नेमलेल्या 'मेहघू' कमेटीनेच 'सस्थानातील हिदूच्या भाषाकडे अधिक लक्ष दिले पाहिजे ' असे आपल्या रिपोर्टाच्या सेक्शन ५ च्या ५ नबरच्या शिफारशीत म्हटले आहे त्याच सेक्शनच्या ८ व्या शिफारशीत सस्कृत भाषा हिदूची सस्कृति रक्षण्याच्या दृष्टीने अधिक अभ्यासिली जाण्याची आवश्यकता प्रतिपादिली आहे सेक्शन २२ मध्ये 'ट्रेनिगला पाठवावयाच्या मधल्या वर्गाच्या शिक्षकापैकी निम्मे आणि प्रायमरीकडील एक तृतीयाश उर्दू शिक्षक असावे' असे स्पष्ट म्हटले असून उरलेल्या शिक्षकातून मराठी, कानडी व तेलगू शिक्षक त्या त्या भाषा बोलणाराच्या सख्येच्या प्रमाणात असावे असे म्हटले आहे पण वस्तुस्थिति मात्र याच्या उलट आहे त्याचप्रमाणे सेक्शन २६ मध्ये 'मुसलमान विद्यार्थ्यांच्या धर्मशिक्षणाच्या तासात हिंदू विद्यार्थ्यांना काही नक्की स्वरूपाचे नीतिपाठ शिकविण्याची व्यवस्था व्हावी असे आमचे मत असून, त्याकरता शिक्षणात मुरलेल्या शिक्षणप्रेमी हिंदचची एक कमेटी नेमून त्या कमेटीने हिंदूच्या भावना, परपरा व सस्थानचे हित यांकडे लक्ष ठेवून एक नीतिपाठाची योजना आखल्यास बरे होईल ' असे म्हटले असून देखील १९३१–३२ मध्ये आखलेल्या करीक्युलममधून या विषयाकरिता तयार केलेल्या उर्दू टेक्स्ट बुकातून इस्लामी इतिहास, इस्लामी सस्कृति इत्यादि विषय आले असून रामायण, महाभारत आणि वेद याना मात्र चाट मिळाली आहे उच्चार आणि आचार यात केवढा हा फरक !

सस्थानी प्रजेची शेवटची तक्रार म्हणजे शिक्षणखात्याचे शिक्षणप्रसाराचे आजचे प्रयत्न सस्थानी प्रजा सुशिक्षित करण्याच्या दृष्टीने अत्यत अपुरे आहेत आज मितीस सस्थानात ४ मोठी शहरे, १२९ मोठी गावे आणि २१६९७ खेडी आहेत बहुतेक कॉलेजे, हायस्कुले व मिड्ल् स्कुले याचा व त्याचबरोबर जवळजवळ ५।७ शे प्रायमरी शाळाचा पसारा या शहर व मोठ्या गावातून माडला गेलेला आहे उरलेल्या सुमारे ३४०० प्रायमरी शाळा आज २१६९७ खेड्याच्या वाट्यास जातात म्हणजे आजमितीस सस्थानातील अठरा हजार खेडी शाळाविना असून त्यातून शाळेत जाण्यायोग्य वयाची सर्वच मुले शाळाच्या अभावामुळे अक्षरशत्रू आहेत सस्थानातील जहागिरी वगळल्यास प्रत्यक्ष सस्थानी सरकारच्या ५७ टक्के क्षेत्रफळात १६६१४ गावे आहेत व एकूण शिक्षणसस्था ५५५६ आहेत १९३१–३२ मध्ये शाळेत जाण्यायोग्य मुलाच्या पैकी अवघी १५ टक्केच शाळातून जात होती अर्थात् सस्थानातील शाळेत जाण्यायोग्य वयाची शे ८५ टक्के मुले शिक्षणाभावी वाया जात आहेत ५७ टक्के क्षेत्रफळातील ११००० गावे शाळेशिवाय आहेत, व तीही शाळाखात्यावरील सरकारचा खर्च गेल्या २० वर्षांत दसपटीने वाढून. ही अनिष्ट परिस्थिति नाहीशी होण्यास सरकारच्या प्रयत्नाना खाजगी प्रयत्नाची जोड मिळाली पाहिजे अशी जोड देण्यास सस्थानी प्रजेची आजही तयारी आहे; पण सरकारचा खाजगी शिक्षणसस्थाचा कायदा प्रजेच्या त्या इच्छेला जागचे जागी नाहीशी करीत आहे हा खाजगी शिक्षणसस्थासबधीचा काळा कायदा सरकारने रद्द केल्यास सस्थानांतील शिक्षणप्रसाराच्या मार्गातील एक मोठा

अडथळा दूर होऊन ज्ञानदानाचे पवित्र कार्य करू इच्छिणाऱ्या सस्थानातील शेकडो सुशिक्षितांना शिक्षण प्रसाराच्या कार्यांत सरकारशी सहमत व सहभागी होता येईल

[वरील मजकुरात दर्शविलेली शिक्षणाच्या धोरणाची स्थिति तशी नाही असे नुकतेच निजाम सरकारच्या शिक्षण खात्याकडून जाहीर झाल्याचे समजते तथापि हैद्राबाद सस्थानातील हिदूच्या प्रतिनिधीना त्यावर प्रत्युत्तरादाखल काय म्हणावयाचे आहे हे कळेपर्यंत वरील मजकूर कायमच आहे असे मानावयास हरकत नाही —सं.]

* * *

## काश्मीरमधील मुसलमानांची बंडाळी व हिंदु

सस्थानच्या ताब्यात असलेल्या काही मशिदी मुसलमानाना परत कराव्या व हिदूना बाटवून मुसलमान केले तरी त्याची मालमत्तेवरील मालकी नष्ट होऊ नये ही वरून दिसणारी अशी दग्याची दोन कारणे मुख्य होती मशिदीचा प्रश्न कित्येक वर्षांचा जुना आहे आणि अखिल हिदूना अत्यत पूज्य असलेल्या शास्त्राविरुद्ध कायद्याची मागणी करणे हे बेअकलीपणाचे व फाजीलपणाचे द्योतक आहे पण एका दुर्दैवी हिदु सस्थानच्या—काश्मीरच्या —विरुद्ध अखिल भारतीय स्वरूपाचा वणवा पेटवून देण्यास मुसलमानाना एवढी सामग्री पुरे झाली

या दोन मागण्याना जिनाच्या चौदा मुद्याच्या धर्तीवर प्रजासत्ताक राज्यपद्धति व मुसलमानाना राज्यकारभारात आणि कायदेमडळात लोकसख्येच्या प्रमाणात जागा, या मागण्या जोडण्यात आल्या काश्मीर बडाळीचे मूळ या कारणातच होते आणि अशा किरकोळ कारणावरून उभारण्यात आलेल्या प्रचड, भयकर, बडखोर चळवळीला सुशिक्षित व सुसस्कृत मुसलमानानीहि चारी बाजूनी पाठिबा दिला,याबद्दल प्रत्येकालाच आश्चर्य आणि भीति वाटली पण सर महमद इक्बल सारख्या हिंदी मुसलमानाचे पॅन्—इस्लामचे सुखस्वप्न व त्याकरितां चाललेल्या त्यांच्या पाताळयत्री कारवाया ज्याना माहीत होत्या त्याना काश्मीरच्या बडाळीत आश्चर्य वाटण्यासारखे काहीच नव्हते हिंदुस्थानच्या नकाशाकडे सहज दृष्टि टाकल्याबरोबर असे दिसून येईल की वरील पश्चिम-उत्तर हिदुस्थानात स्थापन होणाऱ्या मुसलमानी सत्तेच्या मार्गावर काश्मीर हा एक काटाच आहे इतक्या जवळ अगदी सरहद्दीला लागून असणाऱ्या या हिदु सस्थानामुळे एक तर त्या आगामी इस्लामी बृहत्सस्थानची भौगोलिक प्रमाणबद्धता नाहीशी होते व मुसलमानी हिंदुस्थानच्या स्थापनेविषयीच्या कल्पनेलाहि त्यामुळे धक्का बसतो यामुळे पॅन् इस्लामचा श्रीगणेशा म्हणून मुसलमानानी प्रथम काश्मीरकडेच मोर्चा वळविला हल्लीचे महाराज गादीवर आल्यापासून त्यानी पुष्कळ वेळी हिदूचे नुकसान करूनहि मुसलमानाचे हित साधलेले असताना आणि मुसलमानाना केवळ ते मुसलमान म्हणून काडीइतकाहि त्रास दिला नसताना काश्मिरातील मुसलमानानी खुद्द महाराजाविरुद्ध कृतघ्नपणाने एवढी व अशा तऱ्हेची चळवळ केली हे मोठे लक्षात धरण्यासारखे आहे या बडाळीची उभारणी बरीचशी काश्मीरच्या बाहेरूनहि झालेली आहे अहरार लोकानी या चळवळीकरता लक्षावधि रुपये ओतलेले पाहून इस्लामच्या प्रचाराकरता न आटणारा पैशाचा ओघ कुठून तरी सारखा चालू असला पाहिजे असे वाटते

काश्मिरातील बडाळी फार मोठ्या प्रमाणावर झाली, पुष्कळ मोठ्या क्षेत्रावर पसरली, आणि बऱ्याच दिवसानी व उपायानी मोडली गेली राजकीय हक्क मागण्याकरता क्षुल्लक कारणावरून महत्त्वाला चढलेली अशी ही चळवळ नसून, तीत इस्लामचा प्रचार करून हिदु जातीचा व धर्माचा शक्य तितका व शक्य त्या ठिकाणी उच्छेद करणे आणि काश्मिरातील हिंदु राज्यसत्ता शक्य तितकी खिळखिळी करून टाकणे हे दोन मुख्य उद्देश होते अशा तऱ्हेच्या व्यापक बडाळीचा विचार सपूर्ण रीतीने करणें स्थलसकोचामुळे अशक्य आहे तेव्हा फक्त एका मिर-

पूरला झालेल्या लुटालुटीच्या, जाळपोळीच्या व कत्तलीच्या प्रत्यक्ष पाहून केलेल्या वर्णनातील काही उतारे वाचून त्यावरच समाधान मानले पाहिजे

**मिरपूर**—मिरपूर हा डोंगराळ जिल्हा बडाळीसाठी निवडण्यास बरीच कारणे होती. जम्मू या सरकारच्या राजधानीपासून मिरपूर पुष्कळ मैल अतरावर आहे, आणि मिरपुरला येणारे सर्व रस्ते डोगराळ व म्हणून फार बिकट आहेत जम्मूहून मिरपुरला येणारा तर एकहि चागला रस्ता नाही शिवाय या भागात पुष्कळ श्रीमत हिंदूची वस्ती असल्यामुळे तेथे बरीच लूट मिळण्यासारखी होती या जिल्हयाच्या चार लाख लोकवस्तीपैकी हिंदु अवघे दहा हजार आहेत अहरार लोकानी आपले स्वयसेवक पाठवून सबध जिल्हाभर करबदीच्या चळवळीची कधीपासूनच तयारी करून ठेविली होती २९ डिसेबर १९३१ हा दिवस सरकारने कर देण्याचा शेवटचा दिवस म्हणून ठरविला व त्याप्रमाणे हुकुमहि सोडले, पण त्याचा काहीच उपयोग झाला नाही कर न देणाऱ्याना कैद केल्याबरोबर लोकाची प्रचड गर्दी जमून ते पुढील गर्जना करीत "दोगरा राज मुरदाबाद, इस्लाम का बोलबाला दुस्मान का मून काला"

८ जानेवारी रोजी मिरपूरला १४४ कलम लागू करण्यात आले दुसऱ्या दिवशी मि लॉथर (आय. जी) आणि राजा महमद अफझलखान पोलीस व सैन्य याच्यासह रिमॉन गावी गेले गावकऱ्यानी कर दिलाच नाही, पण उलट अधिकाऱ्यावरच हल्ला चढविला तेव्हा लष्कराने गोळीबार केला एक माणूस मारला गेला व दुसरे काही जखमी झाले यानतर मुसलमान जास्तच खवळले. खुद्द मिरपुरला हजारो लोकाच्या सभा भरू लागल्या व परिस्थिति बरीच गभीर झाली. तेथील मौलवी व अहरार सभेचे डिक्टेटर यानी अत्यत जळजळीत भाषणे करून सस्थान व महाराज याच्या विरुद्ध मुसलमानाना भयंकर चिथावणी दिली; लवकरच दग्याचा जोर सर्वत्र वाढला. हिंदु जीवित व मालमत्ता केव्हा नष्ट होईल याचा नियम नाहीसा झाला. जाळपोळ, खून, लुटालूट व कत्तली याचे थैमान सुरू झाले. जम्मूला पोलीस अधिकाऱ्याच्या व इतर लोकाच्या तारावर तारा येऊन थडकू लागल्या. पुढे तर दगेखोरानी टेलिग्राफही उध्वस्त करून टाकला आणि हिंदूवर हल्ले करण्याकरिता रस्तेही रोखून धरले

हिंदु जीवित सुरक्षित नाही असे पाहताच खेड्यातील हिंदू शहराकडे धाव घेऊ लागले, पण मुसलमानानी वाटेतच त्याच्यावर हल्ले करून त्याना बेजार केले मध्यतरी जम्मू येथील एक बडा सावकार लाला भोलानाथ याचा एका मुसलमानाने खून केल्याची बातमी आली. या गोष्टीमुळे जम्मू येथे भयकर खळबळ उडाली. व मुसलमानाना खुनाखुनीची इशारत मिळाल्यासारखेच ते झाले. २७ जानेवारीला हजारो मुसलमानानी मीरपूरला वेढा घातला आतील रहिवाशानी सबध रात्र जागून काढली राजोरी, कोटली व मिरपूर या तीन तहशीलातील मिळून एकदर पसतीस खेडी बडखोरानी लुटली व जाळपोळ करून उध्वस्त केली हिंदु लोकाना मरणाची भीति दाखवून जबरीने बाटविण्याचा कारखाना तर सगळीकडे सर्रास चालू होता.

थोड्याच दिवसानी मिरपूरला भयाने लपून छपून राहिलेले एक हजार लोक सापडले बडखोरानी त्याच्या नातेवाईकाना कसे जिवत जाळले, त्याच्या बायकावर कसे अत्याचार केले, व त्याच्या मालमत्तेची कशी राखरागोळी केली याचे त्यानी दगडाला पाझर फुटतील असे वर्णन केले. बडखोराची हल्ल्याची पद्धतहि ठरलेली असे, उच टेकडीवर ते मोठा जाळ करीत व ढोल ताशे वाजवून सभोवारच्या सर्व गावातील मुसलमानाना ते दग्याकरता एकत्र जमवीत मिरपूरहून नऊ मैलावर असलेल्या सामवल गावावर अशाच रीतीने हल्ला करण्यात आला. त्या गावचा चनीलाल शहा हा दुसऱ्या गावाहून परत येत असता मुसलमानानी त्याला वाटेत अडविले. मरण समोर दिसताच त्याने पिस्तुलाचे दोन तीन

बार काढले व तो तेथून निसटला लवकरच वर सागितलेल्या पद्धतीने हजारो मुसलमानानी सामवल गावावर हल्ला चढविला, आणि शिखाची व हिंदूची घरे एका बाजूने जाळून टाकली। चुनीलालच्या कुटुबातील पाच मनुष्याचे जिवतपणी लचके तोडण्यात आले व नतर जिवतपणीच त्यास जाळण्यात आले। इतक्यात तेथे सरकारी फौज आली, पण तिने जळणाऱ्या लोकाना न वाचविता फक्त चुनीलालला कैद केले व ती निघून गेली।! गावातील दुसऱ्याहि कित्येक लोकाना जिवत जाळण्यात आले कल्याण बासी या गावावरहि असाच हल्ला चढविण्यात आला. त्यावेळी तेथे असलेल्या चौदा ब्राह्मण कुटुबानी लढण्याचे ठरविले, पण सरकारी फौजेने सगिनीच्या जोरावर त्यास घरे सोडणे भाग पाडले व ती घरे बडवाल्यानी येऊन खुशाल लुटली।

निराश्रित झालेले हिंदु पुरुष, बायका व मुले जिवाच्या भीतीने मिरपूर शहरात लपून बसली असून त्याना मुसलमानानी वेढा दिला आहे, अशा बातम्यावर बातम्या येऊ लागल्या लॉथर (आय जी पी) याची बदली करण्यात येऊन त्याच्या जागी जरूर ते सर्व अधिकार देऊन मि जार्डिन याची मिरपूरला नेमणूक करण्यात आली मिरपूरचा गव्हर्नर अफझलखान हा त्या प्राताचा रहिवाशीच असल्यामुळे बड मोडण्यास त्याचा फार उपयोग होईल असे म्हणून मुख्य प्रधानानी त्याच्यावर अवास्तव विश्वास टाकला. पण एक तर अफझलखानाला बड मोडावयाचे नव्हते, आणि तसे असते तरी, आता ती गोष्ट त्याच्या आटोक्याबाहेर गेली होती फौजेचा मुख्य कर्नल रहिमतउल्ला याच्यावर तर बडवाल्याशी कट केल्याचाच आरोप आहे

बरेच लोक मोठ्या कष्टाने झेलम येथे पोचले त्याची स्थिति पाहून व त्याच्या हकीगती ऐकून सर्वांची अत करणे पिळवटून निघाली अलीबेगचे पन्नास हजाराचे गुरुद्वार जाळून फस्त केल्याची बातमी त्यानी आणली होती. तेथून ते देवीद्वारला गेले, व ते त्यानी आंतून बंद करून घेतले. मुसलमानांनी देवीद्वारासभोंवार खूप जळण जमविले आणि सगळ्या इमारतीलाच आग लावून दिली। कित्येक हिंदु व शीख स्त्रिया बडाचा वणवा पसरताच सस्थान सोडून ब्रिटिश हद्दीत आल्या व त्यानी ठिकठिकाणच्या वरिष्ठ ब्रिटिश अधिकाऱ्याकडे तारा पाठवून आपली कहाणी त्याच्या कानावर घातली त्यानी सागितलेल्या हकीगतीहि अगावर शहारे आणणाऱ्या आहेत रूपसिग नावाच्या शिखाला त्याने 'ग्रंथसाहेबाचा अपमान कराल तर खबरदार' असे म्हणताच दुसऱ्या कित्येक हिंदु व शीख इसमाबरोबर जिवत जाळण्यात आले, ही हकीगत खुद्द त्याच्या म्हाताऱ्या आईनेच सागितली मिरपुराहून लाहोरला आलेल्या एका तरुणाने असे सागितले की स्माली येथील सर्व हिंदु घरे जाळण्यात आली, तीन हिंदूना ठार मारण्यात आले, आणि सुखचैनपुरात पधरा हिंदूना जिवत जाळण्यात आले शेकडो स्त्रिया व मुले बेपत्ता झाली आहेत.

खून, लुटालूट, जाळपोळ, कत्तली, स्त्रियावरचे बलात्कार, जबरीचे धर्मांतर या व अशा, कल्पनतील आणि कल्पनेपलीकडील पाशवी अत्याचारानी काश्मिरातील व त्याना मदत करणाऱ्या बाहेरील मुसलमानानी आपला आत्मा सतुष्ट करून घेतला. मिरपूरप्रमाणेंच कोटली, राजोरी, भिंगार या व इतर ठिकाणीं वर सागितलेल्या, मानव्याला काळिमा आणणाऱ्या गोष्टीच्या आवृत्यावर आवृत्या निघाल्या; आणि काश्मिरातील हिंदु जीविताची धूळधाण उडाली काश्मिरातील निरपराधी हिंदूच्या रक्ताचे वाहिलेले पाट पाहूनहि ज्याचे अत.करण थरारून जात नाही व ज्याच्या मनात स्वजातीबद्दल आस्था उत्पन्न होत नाही असे हिंदू दुर्दैवाने किती तरी आहेत, आणि हे असे आहे, म्हणूनच विसाव्या शतकातहि निरपराधी हिंदूंची कत्तल कोणीहि कितीहि करू शकतो।

* * *

## भोपाळमधील हिंदूंची स्थिति

भोपाळ सस्थानच्या एकूण लोकसंख्येपैकीं

शे ११ इतकेच मुसलमान आहेत म्हणजे सस्थानला मिळणाऱ्या करापैकी ९० टक्के कर हिंदु प्रजेकडूनच मिळतो हे उघड आहे जो जास्त कर देईल त्याला हक्क जास्त हे तत्त्व येथें बाजूस सारण्यात येते आणि मुसलमानाचे बाबतीत उघड उघड पक्षपात केला जातो

सस्थानचे पोलीस, पोलिसाचे मुख्य कर्तव्य बाजलाच राहो परतु पळवून नेलेल्या हिंदु मुलाचा व स्त्रियाचा शोध लावण्यास सुद्धा तयार नसतात मुसलमान काजी हिंदुसमाजास उगाचच दमदाटी करीत असतात हिंदु महाजनाकडून वळजबरीने घेतलेले कर्ज मुसलमान परत करीत नाहीत हिंदु व्यापाऱ्याच्या मालावर जास्त जकात घेण्यात येते एकादे देऊळ बाधणे हिंदूना फार मुष्कील होते एवढेच नव्हे तर कोणताहि धार्मिक समारभ वाद्ये लावून त्याना करिता येत नाही शाळातून शिकविल्या जाणाऱ्या इतिहासातून मुसलमान राज्यकर्त्यांचाच काल उज्वलतेचा असा दाखवून हिंदू हे अगदी मूर्ख होते असे दर्शविले जाते हिंदूपासून घेतलेला कर सस्थानात अगर इतरत्र कोठेही मशीद, ताझीम, ताबलिश, इत्यादिकावर खर्च केला जातो त्याबद्दल हिंदूना बिलकुल विचारता येत नाही थोडक्यात म्हणजे भोपाळ सस्थानात हिंदूना सर्वस्वी 'गुलाम' म्हणूनच वागविण्यात येते भोपाळच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलात हिंदुमुसलमानाचे प्रमाण पुढीलप्रमाणे आहे सरकारी सभासद १४ पैकी हिंदु १ मुसलमान १३, सरकारनियुक्त दोन्ही समाजातून एक, एक, लोकनियुक्त हिंदू ५ मुसलमान ३ एकूण २४ पैकी हिंदु ७ व मुसलमान १७

## सरकारी नोकऱ्यांत हिंदूंचें प्रमाण

| | एकूण | मुसल | हिंदु |
|---|---|---|---|
| पर्सनल स्टाफ ऑफ दि नबाब | २२ | २ | २० |
| स्टेट कौन्सिल | ६ | १ | ३ |
| न्याय | ८ | १ | ३ |
| सेक्रेटरिएट | २२ | १ | १९ |
| रेव्हिन्यू | २३ | ० | २३ |
| शिक्षण | ८ | १ | ६ |
| वैद्यकखाते | ११ | ३ | ६ |
| पी डब्ल्यू डी | ८ | ० | ७ |

—अखिल भा दि हितैच्छ मडळ रिपोर्ट

* * *

## लोहारू संस्थानांतील अत्याचार

लोहारू सस्थानात नबाब मुसलमान असून सहा सप्तमाश प्रजा हिंदु आहे अशा स्थितीत हिंदूचा किती छळ विनाकारण होतो ते दिसून येण्यासाठी नुकताच घडलेला एक अत्याचार दिला आहे

१५ जुलै, १९३५ रोजी लोहारूचे नबाबसाहेब आणि ए जी जी याची भेट झाली आणि त्या प्रसगी जमलेल्या काही प्रतिष्ठित लोकाना नबाबसाहेबानी खालील आश्वासन दिले, की जर लोकानी मन १९२३ चा करार मान्य केला तर उट–कराशिवाय इतर सर्व कर माफ होतील परतु रयतेची स्थिति अत्यत हलाखीची असल्यामुळे त्या लोकानी लोहारू दरबारला १९०९ चा करार स्वीकारण्यास विनति केली

बरोबर १५ च दिवसानी नबाबाने काही माणसे चेहर (कलान) या गावी उटकराची अम्मलबजावणी करण्यास पाठविली

त्या माणसानी 'रयत कर नाकारत आहे' असा रिपोर्ट दिला ताबडतोब नबाबाने सरकारी सैन्याची रवानगी केली

चेहरकलान गावी ऑगस्टच्या ५ व्या तारखेस सैन्याचे तबू ठोकले गेले, आणि लोकाची समजूत करून देण्यात आली की एजट साहेब उद्या गावाला भेट देणार आहेत, तेव्हा सर्व लोकानी आपआपली गाऱ्हाणी त्याना सागावी

उलट हे 'लोक बडाळी करण्याच्या उद्देशाने जमले असून त्याच्या मनात अराजक सत्ता प्रस्थापित करण्याचा विचार आहे' असे खोटेच उठविण्यात आले नबाबाच्या लोकानी याला घरे धुंडाळताना सापडलेल्या काठ्याचा पुरावा दिला आणि ह्या काठ्या बड करण्याच्या उद्देशाने

आधीच जमवून ठेवल्या होत्या असे विधान नबाबाच्या लोकानी केले

सहा तारखेम एजट व नबाब येण्याच्या सुमारास चेहरकलान गावातील सर्व रयत रस्त्याच्या दुतर्फा बसून वाट पहात होती प्रथम नबाबसाहेबाची मोटार आली एजटसाहेबाची सर्व लोक उत्सुकतेने वाट पहात होते परतु लोकाकडे काही एक लक्ष न देता एजटाची मोटार निघून गेली आणि त्यावेळी सर्व बसून राहिलेले लोक उठून उभे राहिले का ? तर एजटाच्या स्वागतार्थ ! परतु हे कृत्य उद्धटपणाचे व बड वृत्तीचे प्रतीक आहे असे नबाबाच्या अधिकाऱ्यानी एजटास दर्शविले

ह्यानतर नबाबाने स्वत लाठी चालवायचा हुकूम दिला व सर्व लोकाना झडत्याच्या सबबीवर ठोकून जगलात पिटाळून लावले नतर नबाबाचे लोकानी गावात लुटालूट केली देवालयाचे पावित्र्य नष्ट केले गावातील सर्व स्त्रीपुरुष मडळीना रानात हाकून दिल्यावर स्त्रियांवर हात टाकायलाही कमी केले नाही आणि मोठा विजय मिळवला अशा भावनेने ती रात्र त्यानी गाण्याबजावण्यात व विजयोत्सवात घालविली

सात तारखेस मडोली, कश्नी व गोकुलपुरा या गावावर नबाबाचे सैन्याने अवचित हल्ला केला

आठ तारखेस ते सर्व सैन्य भरलेल्या बदुकीसह 'सिधाणी' गावावर चालन गेले व त्यानी 'उटकरा'ची मागणी केली त्या गावातील लोकानी काही मुदत मागितली परतु नबाबाने त्यानी जाणन बुजून कर नाकारिला, व त्यानी नबाबाच्या लोकावर हल्ला केला असा विपर्यास केला व कोणताही अधिकार नसताना, गोळीबार केला नबाबाच्या बाजूने असे सागण्यात येते की त्यानी स्वसरक्षणार्थ गोळीबार केला

# स्फुट प्रकरणें



## स्फुट चुटके

[ एकाद्या विशिष्ट प्रकरणात सुटसुटीतपणे न बसणारी पण अनेक प्रकारे वाचकांना व प्रचारकांना उद्‌बोधक अशी स्फुटें या प्रकरणात दिली आहेत. ]

कलुशाच्या बोलण्याने आधीच अतिशय चिरडीस गेलेला सभाजी या बोलण्याने अधिकच चवताळला व एकदम वेगाने चार पावले औरगजेबाच्या अगावर धावून जाऊन त्यास म्हणतो, " माझी स्थिति तू काय चागली करणार ? चल, तुझी बेटी मला देतोस ? देत असलास तर तुझा अतिशय निंद्य असा धर्महि पतकरतो आण, तिला इथें आण, लाव तू आपल्या देखत तिचा व म झा निका " —केवळ स्वराज्यासाठी पान ९७

तेच तेच मी म्हणतो तेच, तू हालाना भितोस, मी अपमानाला भितो मला हा अपमान नको कितीहि हाल झाले तरी हरकत नाही या अपमानापेक्षा कितीही हाल करून त्यात जीव घेतला तरी पत्करला अरे, मला त्याने आपल्या पुढें नेऊन एकदा उभे कराव, नाही तर त्यान तरी माझ्यापुढे येऊन उभ रहाव म्हणजे हा शिवाजी महाराजाचा बच्चा कितीहि बहकला तरी त्याच पाणी कस आहे ते त्याला दाखवील

इतके बोलून तो फारच सतापला आणि हिंडूं फिरू लागला. 'मला तो मुसलमान करून टाकायला पाहतो आहे हे काय मला कळल नाही अस समजतोस ? मी मुसलमान होईन अस त्याला वाटत ? मी आपला धर्म सोडीन ? मग कशाला, कशाला त्या महात्म्याच्या पोटी आलो ? त्याला माझ्या समक्ष ती गोष्ट तर काढ दे की त्याला खूप तऱ्हेचे उत्तर देईन अस उत्तर देईन कीं, त्या घटकेस त्या क्षणी मला ठार माराव असच त्याला वाटेल बोल तुला जर त्यानं मुसलमान हो म्हणजे तुला सोडतो अस सागितलं तर होशील का ? —के स्व पा ७३

" काफरी धर्म कोणाच्या धर्माला म्हणतोस, या वेळी तू आपल्या प्रचड सैन्याच्या व सरदारमडळाच्या मध्यें बसून आणि मला कैद करून नि शस्त्र करून, माझ्या भोवती पहारा ठेवून, एकट्याला आपल्यापुढे उभा करून जो उपमर्द करशील, माझ्या सनातन धर्माला, देशाला, आणखी मला अपमानकारक असे जे जे शब्द उच्चारशील ते ते सगळे मुकाट्याने सहन करून घेण्यापलीकडे माझ्या हाती काही एक नाही हें जाणूनच करणार पण यात पुरुषार्थ कोणता तो तुझा तुलाच ठाऊक मुसलमान होऊन तुझी बादशहात मिळविण्यापेक्षा मी आहे तो हिंदूच राहून रस्ते झाडणारा फरास बनलो तरी मला त्यात वाईट वाटणार नाही —के स्व पा ९५

मसूरचा जगदळे पाटील —" बाप मरून गेला आपण जगद्‌गुरु पातशापाशी गेलो .' त्याच पत्रात पश्चिमवादी बापाची बिन याकूबजी मुसलमान— "पीर जलालद्दीन हा पहिले हिंदु होता त्याचेच आपण होतो" "(मुसलमान) धर्माधिकारी बोलले एका एका खुनास आकरा आकरा खन द्यावे " शेवटी निकाल असा झाला " तुज देहान्त प्रायश्चित्त द्यावे परतु, मुसलमानाची पातशाही आणि तूंही मुसलमान याकरिता क्षमा जाली " (५०–१६११)

अवरंगजेब.—आमच्या धर्माप्रमाणे असे ठरले आहे की देवळाचा नाश करू नये व नवी देवळें बाधण्यास परवानगी देऊ नये (७६४–१६५९)

"अवरगजेबाने मुसलमानांना जकातीची पूर्ण

माफी दिली असून हिंदूवर पूर्ववत् ठेविल्या आहेत. ख्रिस्त्यांनी अर्ध्या करावयाच्या आहेत
(११८७–१६६७)

"बादशहाचे धर्मवेड माजत चालले आहे एकाद्या हिंदूचे घेतलेले कर्ज बुडवावयाचा सोपा मार्ग म्हणजे सावकार हिंदूने महमद व मुसलमानी धर्म याना शिव्या दिल्याची खोटीच तक्रार काजीकडे करण्याची धमकी द्यावी म्हणजे झाले . देवळे पाडून मशिदी बाधण्याचा त्याने धोशा लाविला आहे " (११९२–१६६८)

आलेपोचे पत्र —" बादशहाचे धर्मवेड, अडचणीत पकडून धर्मांतर करणे भाग पाडण्याकरिता त्याने नेमलेले हस्तक, . ही हिदूना जाचक होत आहेत स्वर्गामध्ये अशा कृत्यानी महमदाच्या बरोबर मान्यता मिळेल असे खूळ त्याच्या मल्लानी त्याच्या डोक्यात भरवून दिले आहे " (१२४९–१६६८)

सुरत कपनी —" एका हिंदूने, काजीने खाल्लेल्या टरबुजाचा एक भाग, पाच वर्षांपूर्वी खाल्ला होता या सबबीवर त्याला जबरीने मुसलमान करण्यात आल्यामळे त्याने जीव दिला "
(१२७५–१६६८)

सुरतेच्या मुसलमान "सुभेदाराने शिवाजीचा बदोबस्त करण्याच्या सबबीवर वर्गणी जमविली हिंदूवरच कराचा बोजा पडणार हे नक्की माहित असल्यामुळे मसलमानानीही त्वरेने मान्यता दिली
(१४७५–१६७२)

ऑर्मे ११४ –"पोर्तुगीज,शिवाजीच्या जातीच्या अनाथ मुलाना रोमन कॅथोलीक धर्माची दीक्षा देतात म्हणून तो त्याचा फार द्वेष करतो "
(१७९८–१६७५)

राजापूरकर इग्रज सुरतकरास —" दहा वर्षे मोगलाकडे राहून मुसलमान बनलेल्या नेताजी नावाच्या खोल मुत्सद्दी मनुष्याला पुन्हा हिंदु करून घेऊन शिवाजीने आपल्याकडे वळविला आहे. " (१८६३–१६७६)

—विजापूर येथील अफझुल खानाच्या लेखांत त्यानें आपणांस पुढीलप्रमाणें 'बिरुद' लावून घेतलेलें आढळतें 'कातिल मत मर्रिदान मुत मुत काफ्रिान' याचा अर्थ 'बडखोर व अविश्वासी (परधर्मी) याची कत्तल करणारा' असा होतो

—भागलपूर येथे एक हिंदु पोलीस शिपाई पोलीस लोकाकरिता बाधलेल्या सरकारी इमारतीत एका बाजूस आपली नित्याची पूजा करीत असे व त्या वेळी धार्मिक विधीला अनुसरून मोठ्याने मंत्र म्हणत असे व शखहि वाजवी त्याला शख न वाजविण्यास व मत्र न म्हणण्यास पोलीस अधिकाऱ्यानी हुकूम केला एकदा तो हुकूम पाळतो की नाही हे पाहण्याकरिता अधिकारी गेले त्या वेळी तो पूजा करीत असल्याने त्याने खडी ताजीम दिली नाही म्हणून खटला होऊन त्यास शिक्षा झाली! पूजा केल्याशिवाय अन्नग्रहण करावयाचे नाही असा त्याचा नियम असल्याने त्याने उपवासास सुरुवात केली. भागलपूरच्या सेशन जज्जानी उपास करणे बेकायदेशीर ठरविले!
—केसरी ता १९।६।३४

—हिदुस्थान सरकारने सरकारी नोकरीतहि जातवारीच्या तत्त्वाप्रमाणे नवीन नियम केले आहेत त्याप्रमाणे मुसल्मानाना २५ टक्के जागा राखून ठेवण्यात आल्या आहेत सर महमद इकबल व खान बहादूर हाजी रहिम बक्ष हे त्या नियमावर मत देताना कायदेमडळातील ३३ ३३ टक्के जागाप्रमाणे नोकरीतहि ते प्रमाण पाहिजे असे म्हणत आहेत. —केसरी ता १३।७।३४

—गेल्या मार्चमध्ये बकरीदच्या वेळी गोवधावरून हिंदु मुसलमानात दगा झाला १९१६ पासून गोवधास म्युनिसिपालिटीने बदी केली होती. १९३२ पासून मुसलमानानी ग वधासबधी चळवळ सुरू केली. चौकशी करण्यास पाठविलेल्या मुसलमान तहशीलदाराने मुसलमानास कायद्याप्रमाणे गोवध करता येत नाही असे मत दिले दग्याची भरपाई म्हणून दीड लाख रुपयाचा जादा कर मुसलमानाची नुकसानभरपाई करण्याकरितां हिंदूवर सं प्रा सरकारने लादला आहे.
—केसरी ता १७–७–३४

—संभाजी महाराजाच्या पोवाड्याच्या रेकॉर्डला निजाम राज्यांत बंदी करण्यांत आली असून राज्यातील सर्व प्लेट्स् जप्त करण्याचा हुकूम सुटला आहे
—केसरी ता २७–११–३४

—सुमारे दोन वर्षांपूर्वी मुंबईस माधव बागेजवळ एक विशिष्ट जागा आपली असल्याचे मुसलमान लोक म्हणू लागले, व त्यानिमित्त तेथे दंगाहि झाला. आता मुंबई कॉर्पोरेशनने ती जागा पोलीस चौकी बांधण्यासाठी सरकारास दिली आहे
—केसरी ता ११–१२–३४

—काही मुसलमान जातीय निर्णयाला मुसलमानांना मिळालेली सनद असे सांगतात, परंतु जातीय निर्णय हा मुसलमानी समाजावर पडलेला प्राणांतिक घाला आहे मुसलमान समाजाला बुद्धिवान व संपन्न अशा हिंदु समाजापासून अलग करण्यासाठी ब्रिटिशांनी हा डाव मोठ्या कुशलतेने मांडला आहे असे उद्गार जॉ पा. कमिटीच्या रिपोर्टावर बंगाल कौन्सिलमध्ये चर्चा चालू असता मौ अबदुल सलाद यांनी काढले
—केसरी ता २५–१२–३४

—परधर्मीयांच्या धर्मभावना दुखवू नका अशा आशयाचे एक फर्मान निजाम साहेबांनी संस्थानात काढले आहे कोणत्याहि धर्मोपदेशकाने लोकांच्या धर्मभावना दुखविण्याचे शब्दाने जरी पातक केले तरी त्यास कडक शिक्षा मिळेल असे फर्मानात नमूद आहे —केसरी ता ११–१–३५

—निजाम सरकारने नवीन फर्मान काढून मशिदीतील प्रार्थनेच्या वेळा निश्चित केल्या आहेत प्रार्थना चालू असता शभर फुटाच्या आत कोठेहि घरांत देखील कोणीहि वाद्ये वाजवू नयेत, व हा हुकूम मोडणारांना एक महिना कैद अगर २०० रु दंड अशी शिक्षा देण्याचा हुकूम निघाला आहे —केसरी ता २२–१–३५

—वाशीम (अकोला) येथे काही दिवसापूर्वी हिंदु-मुसलमानांचा दंगा झाला होता दंग्याचे कारण वाशिमच्या पद्मतीर्थांत मुसलमान आपले ताबूत थंड करीत असत त्याला हिंदूंनी हरकत घेतली होती. पुढे दंग्यानंतर हिंदूंनी कोर्टांत जाऊन पद्मतीर्थ हिंदूंचेच आहे असा निकाल घेतला होता. त्यावर मुसलमानांनी अकोल्याच्या ॲडिशनल डिस्ट्रिक्ट जज्जाचे कोर्टांत अपील गुदरले होते, त्याचा निकाल ता ७–२–३५ रोजी लागून पद्मतीर्थ हिंदूंचेच ठरले मुसलमान पुन एकदां कमिशनरकडे अपील करणार आहेत
—केसरी ता १२ –२–३५

—काशी येथील एका चौकात जमीन खोदताना मंदिराचे कळस व मूर्ती मिळाल्या ज्या जागेत या मूर्ति मिळाल्या त्या जागेवर मंदिर बांधण्यासाठी हिंदूंनी परवानगी मिळवून काम सुरू केले पण मुसलमानांनी मंदिराचे काम बंद ठेवण्यासाठी शहर मॅजिस्ट्रेटकडे अर्ज केल्यावरून कोर्टाचा निकाल होईपर्यंत काम बंद ठेवण्यात यावे असा मॅजिस्ट्रेटने हुकूम केल्यामुळे हिंदूमध्ये बराच असंतोष माजला आहे —केसरी ता ८–३–३५

—बेहेराम (बिहार) येथें मुसलमानांनी गायीच्या वासराची वधार्थ मिरवणूक काढली हिंदूंनी अडथळा केला तेव्हा तीन हिंदूंना अटक केली
—केसरी ता १९–३–३५

—बडोदे येथील शहर–सुधराई संस्थेचे एक सभासद शेट इब्राहिम बोहरी यांनी रस्त्यावर येत असलेला पिराचा दर्गा काढून टाकण्याबद्दल संस्थेच्या सभेत संमति दिली होती यामुळे काही मुसलमान चिडून गेल्यामुळे त्यांनी शेठ इब्राहिमभाईसारख्या तोंडवळ्याच्या दुसऱ्या एका बोहरी इसमाचे नाक कापून त्यास बेदम मार दिला आरोपीचा पत्ता अद्यापपावेतो लागला नाही —केसरी ता २२–३–३५

—ता २४ रोजी दिल्ली येथे अरेबिक कॉलेजच्या दिवाणखान्यात डावयाच्या नबाबाच्या अध्यक्षतेखाली गोंधळ, मारामारी होऊन मुसलमानांची परिषद झाली तिने जातीनिर्णयास पाठिंबा देण्याचे ठरवून एक शिष्ट मंडळ विलायतेस पाठविण्याचे ठरविले प मालवीय व हिंदु महासभा यांचे आवाज बंद करण्याकरिता एका मुसलमानाने 'कुत्रे पिसाळतात तेव्हा त्यांना गोळी घालून ठार मारण्यांत येते या नामधारी पुढाऱ्यांच्या धमक्या

तरी निदान तुम्ही दाबून टाका' असे उद्‌गार काढले त्याचा परिषदेत कोणीहि निषेध केला नाही —केसरी ता २९-३-३५

—पानिपत येथे एक तृतीयाश वस्ती हिदूची व दोन तृतीयाश मुसलमानाची आहे गेल्या बकरीदच्या सणात दगा होऊ नये म्हणून ता १९ रोजी लोकाची होळी बद करण्यात आली येथील मुसलमान फार कट्टर आहेत येथील बायकासुद्धा ५ वेळा नमाज पढतात बरेच मुसलमान हिदूचे पाणीदेखील पीत नाहीत सर्व ऑफिसर मुसलमान आहेत हिदूनी होळीचा सण साजरा करण्याकरिता अधिकाऱ्याकडे दाद मागतली व परवानगी आल्यावर ज्या रस्त्यानी मिरवणूक निघावयाची असते त्या रस्त्यावरून मिरवणूक नेऊन शास्त्राधाराने होमहवन केले येथील हिदूहि धीट, चिकाटीचे व धर्मनिष्ठ आहेत

—केसरी ता ९-४-३५

—गुरुवार ता २१-३-३५ रोजी मि गौबा यांनी कराचीस झालेल्या गोळीबाराबाबतीत तहकुबीची सूचना आणली व सरकारास चौकशी कमिटी नेमण्याची विनति केली मि जिना यानी "निदान भूतदयेसाठी तरी स्वतत्र चौकशी मडळ नेमिले पाहिजे" असे सागितले गौबाची सूचना ६७ विरुद्ध ५२ मतानी पास झाली

—केसरी ता २६-४-३५

—कोटा सस्थानातील हबीबुन्नीसा नावाची मुसलमान तरुणी आपल्या घरच्या नातलगाशी भाडून आली येथे तिने आपण हिदु असल्याचा बाहाणा केला व शातीदेवी असे नाव सागून ती स्वामी दयानद हिदु अनाथालय अजमीर येथे जाऊन प्रविष्ट झाली मुसलमान समाजाने याचा गवगवा केला व हिदूनी मुसलमान मुलगी पळवून आणल्याचा बोभाटा केला लवकरच खरा प्रकार उघडकीस आला मॅजिस्ट्रेट समोर हे प्रकरण गेले त्या वेळी त्या स्त्रीने आपण मुसलमान असल्याचे कबूल केले व तिला तिच्या चुलत्याचे स्वाधीन केले मुसलमान समाजाने लगेच या अनाथ स्त्रीचे लग्नहि उरकून घेतले

—केसरी ता १०-५-३५

—सिधमध्ये लारखाना जिल्ह्यातील धर्मदेवी नावाच्या तरुणीने परसूलम नांवाच्या हिदु तरुणाशी विवाह केला मुसलमानाचे म्हणणे धर्मदेवी ही राहुजा नावाची अज्ञात मुसलमान तरुणी असून तिच्या इच्छेविरुद्ध हा विवाह होत आहे. यासबधी कोर्टांत काम चाल असता मुसलमान जमावाने त्या स्त्रीस पळवून नेण्याचा प्रयत्न केला, व याच सबधात पोलिसास गोळीबारहि करावा लागला तेथील आर्यसमाजाने हा खटला शेवटपर्यंत लढविला व धर्मदेवीला तिचा भ्रतार परसूमल याच्या स्वाधीन केले दगा केलेल्या सहा मुसलमानावर खटले होऊन तिघाना तीन व ंची सजा झाली व तिघाना सोडन दिले

—केसरी ता २४-५-३५

—लखनौ येथे गेल्या आठवड्यात ईस्ट इडियन रेल्वेमधील मुस्लीम नोकर सघाची परिषद झाली खासदार सर महमद याकूब हे अध्यक्षस्थानी होते त्यानी मुसलमान कामकऱ्याचे वेगळे जातवार सघ पाहिजेत या मागणीचा पुरस्कार केला व असल्या जातिविशिष्ट सघाना सरकार मान्यता देत नाही म्हणून सरकारवरहि ताशेरा झाडला सरकारने जातवार नोकऱ्याचे प्रमाण ठरविले आहे पण वरिष्ठ कायदेमडळाप्रमाणे रेल्वेच्या नोकरीत देखील त्याना ३३$\frac{1}{3}$ टक्के प्रमाण पाहिजे असा ठराव परिषदेने पास केला

—केसरी ता ७-५-३५

—मोघीर येथील चौक बाजारातील एका हिदु मदिराचा भाग डि मॅ च्या हुकुमावरून ता २६ मे रोजी पाडण्यात आला मदिर पाडू नये अशाबद्दल लोकानी अनेक प्रकारे सरकारला विनति केली असता तीहि मानण्यात आली नाही या सबधात तेथील हिदूनी कलकत्ता, पाटणा येथील वृत्तपत्रास तारा केल्या असता त्याहि आक्षेपार्ह म्हणून परत करण्यात आल्या व सरकारने लष्कराच्या पहाऱ्यात नदजीचे मदिर पाडले मूर्ति फोडून ती गगार्पण करण्यात आली हिदूनी हरताळ पाडला असून हिदु सभेने निषेध प्रदर्शक सभा केली हे मदिर अत्यत प्राचीन असून कलकत्ता

हायकोर्टाने अनेक निवाडयांत त्याचा गौरवयुक्त उल्लेख केला आहे. —केसरी ता. ७-६-३५

—बुलढाणा (मध्यप्रांत) जिल्हयातील प्रसिद्ध सरोवर लोणार येथें दरसाल धारातीर्थावर दसऱ्याचा उत्सव साजरा होत असतो लाखो लोक जमून त्या धारेची पूजा करतात परतु यदा सरकारने मुसलमानाच्या आग्रहापुढे हार खाऊन धारेची पूजा पुसून टाकण्यास समति दिली त्या निषेधार्थ हिंदूनी हा उत्सव बद करण्याचे ठरविले आहे —केसरी ता २५-६-३५

—बेळगाव जिल्हयातील गोकाक गावी किल्ल्यात जुम्मामशीद नावाची एक भव्य मशीद आहे मशिदीभोवती मोकळे आवार आहे व त्यास तारेचे कुपण आहे मशिदीचे पूर्व बाजूस येथील आवटी नावाच्या मुसलमानाची मोकळी जमीन आहे ती सव्हें नबरात सामील आहे या नबराचे पूर्वेस व दक्षिणेस हिंदु व मुसलमानाची घरे आहेत या नबराच्या दक्षिण बाजूस लागून पूर्व-पश्चिम अशी वाट म्युनिसिपल हद्दीत असून त्या वाटेचे दक्षिण बाजूस लागून आमच्या घराचे परसू आहे वाटेला लागून असलेली आमची भित पडली होती ती बाधून घ्यावी म्हणून भितीत दरवाजा लावण्यास व आमचे जागेत शौचकूप बाधण्यास परवानगी घेऊन बाधकाम आरभिले दरवाजाची चौकट, शौचकूपाची चौकट ता ३१-७-३५ रोजी बसविण्यास प्रारभ केला. इतक्यात जवळच्या मशिदीतील ५०-७५ मुसलमान जमले त्यात सर्व पेशाचे मुसलमान होते त्या लोकानी बाधकाम बंद ठेवण्यास गवडयास सागितले व भितीत दरवाजा लावण्यास आपली हरकत असल्याचे बोलू लागले गवडयाने गडबडीमुळे काम बद ठेवले पण चौकट काढून घेण्याचे नाकारले नतर काहीजणानी चौकट काढून फेकून दिली व पुन लावल्यास मारहाणीची धमकी दिली दग्याचे ठिकाणापासून पोलीस कचेरी जवळ असूनहि कोणी पोलीस आले नाहीत. मशिदीची जागा आमचे परसाला लागून मुळीच नाही बाधकामापासून कोणास त्रास होत नव्हता. आमच्या घराला लागून इतरांचे शौचकूप आहेत.

रा विनायक भिमाजी कुलकर्णी वकील, गोकाक याचा लेख —केसरी ता ९-८-३५

—इडिया बिलातील जुने ३०४ व हल्लीचे ३०६ कलम लॉर्डांच्या सभेपुढे मजुरीकरितां आले असता लॉर्ड मिडल्टन व लॉर्ड लॉईड यानी कडव्या मुसलमानाची भूमिका घेतली यदाकदाचित् जातिनिर्णयात दहा वर्षांच्या आतदेखील अनुभवाने काही दुरुस्त्या कराव्याशा वाटल्या तर त्यासाठी पुन दुरुस्तीचा कायदा नको, हिदी कायदेमडळाने तसे मत प्रदर्शित केले म्हणजे गव्हर्नर अगर गव्हर्नर जनरल यानी ते पार्लमेटकडे पाठवावे व ती दुरुस्ती "ऑर्डर-इन्-कौन्सिल" काढून अमलात यावी या सोयीसाठी या ३०४ कलमातील चौथे पोट कलम आहे मसलमानाच्या समतीशिवाय जातिनिर्णय बदलणार नाही हे जातिनिर्णयाच्या मसुद्यात दिलेलें आश्वासन मुसलमानाना कायद्याच्या मसुद्यात घालावयास पाहिजे कायदेमडळात मत मुसलमानाचे व्यक्त होईलच असे लॉर्ड झेटलड यानी सागितले पण त्याचे मत उपयोगी नाही, त्याची समति घेतली पाहिजे ही दुरुस्ती असावी असा लॉर्ड मिडल्टन यानी हेका धरला शेवटी लॉर्ड मिडल्टन याची दुरुस्ती बिलात सामील केली

—केसरी ता २३-७-३५

—खोपोली येथे पीराच्या ओटयावर हिंदूना कान्होबाची वारी शात करण्याची परवानगी देऊ नये असा मुसलमानानी अर्ज केला होता म्हणून २१-८ रोजी कर्जतच्या मामलेदारानी अगात वारी येणाऱ्या लोकानी पिरापासून दूर जागी आपली वारी थड करावी असा हुकूम काढला आहे —केसरी ता ३०-८-३५

—आग्रे राजाच्या कारकीर्दीत पोर्तुगीज, श्यामल, सिद्दी, मुस्लीम वगैरे जबरदस्त परक्या सत्ताचा धर्मच्छल कुलाबा जिल्ह्यातील कोरलाई गावाखेरीज इतर गावाना भोवला नाही परतु मुबई, वेसावे, वसई वगैरे बदर किनाऱ्याचे गावी व हल्लीच्या ठाणें जिल्ह्यात पूर्वकाली इतक्या झपाटयाने धर्मांतरे झाली की गावचे गांव ख्रिश्चन

झाले. हल्ली घरांत कृष्ण आणि दारांत ख्रिस्त अशी धर्माच्या दृष्टीने त्याची दुहेरी वागणूक दृष्टीस पडते.

—रा दामोदर गोपाळ ढबू वकील अलिबाग यांचा लेख. —केसरी ता ६–९–३५

—प्रत्येक शीख स्त्री–पुरुषाजवळ तरवार असतेच. त्यास कृपाण म्हणावयाचे अशी हायकोर्टाने व्याख्या केली आहे मुसलमानानी आपल्यासहि सरसहा तरवारी वापरण्यास परवानगी द्या असा लकडा मागे लावला व त्याबाबत आपण सत्याग्रह सुरू करू अशी त्यानी सरकारला धमकी दिली. काही शिखावर दोन तरवारी बाळगून त्यानी हत्याराचा कायदा मोडला म्हणून खटले भरले हिदुस्थान सरकारच्या परवानगीने व अनुमतीने पजाब सरकारने तरवारीवरील हत्याराच्या कायद्याचा निर्बंधच काढून घेऊन सर्वांनाच कृपाणे व तरवारी वाटेल तेवढी वापरण्याची परवानगी दिली —केसरी ता १७।९।३५

—कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद राजा रघुनदन प्रसाद सिग यानी गोवधबदीची मागणी करणारी सूचना ता १८–९–३५ रोजी वरिष्ठ कायदेमडळात माडली " दुभत्या गायीचे रक्षण करण्यासबधीचे बिल मध्यवर्ती कायदे मडळातील बारा सभासदाचे कमिटीकडे विचारासाठी सोपवावे" अशी सूचना माडली लाला रामशरण दास, दरभग्याचे महाराज, मि. बानर्जी यानी पाठिबा दिला. सर उमर हयातखान यानी असे सांगितले की गायीगायीतहि फरक असतो सर्वच गायी सरक्षणीय असत नाहीत सरकारतर्फे दुभत्या गायीचा आकडा वाढत आहे तेव्हा गोवधाने गागरून जाऊ नका गायीची सख्या वाढविण्यापेक्षा तिची पैदास करणे हितावह आहे, व तसे प्रयत्न करण्यात येत आहेत १८ विरुद्ध २६ मतानी ही सूचना नापास झाली

—केसरी ता. २४–९–३५

* * *

## हिंदूच्या घटत असलेल्या संख्येची सरकारी उपपत्ति

१८९१ सालापेक्षा १९०१ त हिंदची संख्या सुमारे ५ लाख कमी झाली ज्या भागांत हिंदूची सख्या जास्त आहे त्या भागात दुष्काळ पडल्यामुळे हिदूची सख्या घटली. हिंदूची वाढ त्याच्या लग्नाच्या चालीरीतीमुळे विशेषत विधवाना पुर्नविवाहास बदी असल्यामुळे व बालविवाहाच्या चालीमुळे खुटली आहे तसेच हिंदूची संख्या मुसलमान व ख्रिश्चन याच्या बाटविण्यामुळे घटत आहे गेल्या दहा वर्षांत ख्रिश्चनाची सख्या ६ लाखानी वाढलेली आहे हिदूत रानटी जातीचा समावेश केल्याने धर्मांतरामुळे कमी झालेली सख्या भरून निघाली असे दिसते.

—सेन्सस रिपोर्ट १९०१

१९११ त हिदूची सख्या १९०१ पेक्षा शेकडा ५ ने वाढलेली आहे मुसलमानाची, शीखाची व बुद्धाची अनुक्रमे ७, ३७ व १३ ने वाढलेली आहे बालविवाह व विधवाना पुर्नविवाहास बदी असल्यामुळे हिदूच्या लोकसख्येवर परिणाम होत आहे प्लेग, देवी, याच्या साथीमुळे व दुष्काळामुळे सख्येत घट झाली आहे पजाबात गुरु गोविंद सिंगाचे अनुयायी जे शीख त्याचा हिंदूपासून निराळा वर्ग केल्यामुळे हिदूची सख्या कमी झाली 'शीख' म्हणून निराळा वर्ग जो या खानेसुमारीच्या वेळी करण्यात आला त्याची सख्या सुमारे ५ लाख आहे

जो जन्मत च हिदु आहे तोच हिंदु असे हिंदु धर्मातील तत्त्व असल्यामुळे जे मूळचे मुसलमान किवा ख्रिश्चन त्याना हिंदु धर्मांत शिरकाव नाही एकदा हिदु धर्म सोडून दुसरा धर्म स्वीकारल्यावर पुन हिंदु धर्मांत येता येत नाही हे हिंदूची सख्या कमी होण्याचे कारण आहे मुसलमानाच्या व ख्रिश्चनाच्या सक्तीच्या बाटविण्यामुळें हिंदूची सख्या कमी होत आहे. पजाबात गेल्या दहा वर्षांत ४०००० हिंदू मुसलमानानी बाटविले आणि जवळ जवळ याच्या तिप्पट ख्रिश्चनानी बाटविले. हिंदूच्या संख्येंत रानटी लोकाच्या टोळ्यांची भर

पडत असल्यामुळें हिंदूच्या सख्येवर मुसलमान व ख्रिस्ती याच्या बाटविण्यामुळे झालेला परिणाम दिसून येत नाही

—सेन्सस रिपोर्ट १९११

हिंदु हा शब्द सर्वव्यापी आहे यात देश, सस्कृति व समाजव्यवस्था हे अनर्भूत होतात यामुळे खाने-सुमारीच्या वेळी हिंदू म्हणून एकादी जात, टोळी ठरविण्यास फार त्रास पडतो

आसामात डोगराळ भागातील लोकसख्या जरी इन्फ्लुएन्झाच्या साथीनें कमी झालेली आहे तरी हिंदूच्या सख्येत मणिपूर वगैरे भागातील टोळया हिंदू धर्मांत समाविष्ट झालेल्या आहेत खाशी, जइन्तिया, लुझाई या डोगराळ भागातील टोळया गेल्या दहा वर्षांत मिशनऱ्याच्या प्रयत्नामुळे ख्रिस्ती झाल्या

यदाच्या खानेसुमारीत 'रानटी धर्म' या शीर्षकाखाली ज्या रानटी टोळयाच्या धर्माबद्दल काहीच नक्की ठरविता येत नाही त्याचा उल्लेख केला आहे

चातुर्वर्ण्य जे पाळतात किवा मानतात अशा हिंदूची सख्या वायव्यप्रात, बलुचिस्थान, काश्मीर, पजाब, बगाल व ब्रह्मदेश या प्रांताखेरीज इतर प्रातात व सस्थानात जास्त आहे मुबई, मध्यप्रात या प्रातात हिंदूची सख्या थोडी वाढली आहे, परतु एकंदरीत हिंदूची सख्या घटत आहे बगालमध्यें हिंदू शेकडा ४५ होते ते शेकडा ४४ राहिले, व मुसलमान शेकडा ५२ होते ते ५४ झाले हिंदूत रानटी टोळयाची जरी भर पडत आहे तरी हिंदूतील खालच्या जातीतील लोक ख्रिश्चन बाटवीत असल्यामुळे हिंदूच्या सख्येवर परिणाम होत आहे

गेल्या दहा वर्षांत हिंदूची लोकसख्या शेकडा १०४ या प्रमाणात वाढली आहे पजाबातील काही अस्पृश्यानी आपणास हिंदू म्हणून घेण्याचे नाकारल्यामुळे त्याचा समावेश 'इतरात' केला आहे. 'इतर हिंदूत' आदि हिंदु, आदि द्रविड, आदि कर्नाटक, देवसमाज याचा समावेश केला आहे पंजाबांतील अस्पृश्याचा 'आदि धर्म' हा धर्म असून त्याना 'इतरात' सामील केले आहे. त्याची सख्या जर हिशेबात धरली तर हिंदूची सख्या आणखी शेकडा २ वाढेल

'चातुर्वर्णीय हिंदू' या सदराखालील हिंदूची वाढ केवळ नैसर्गिकच म्हणता येत नाही काही मुसलमान व ख्रिश्चन याच्या शुद्धीकरणाशिवाय हिंदूच्या सख्येत डोगरी आणि जगली टोळयाचा अतर्भाव झाल्याने हिंदूच्या सख्येत वाढ दिसत आहे आसाममध्ये हिंदु मिशनऱ्याच्या चळवळीमुळे रानटी टोळयात जागृति झाली त्यामुळे आसामच्या हिंदु सख्येत ३५०००० ची भर पडली मध्यप्रातातसुद्धा गेल्या खानेसुमारीच्या वेळी गणलेले 'रानटी' या सदराखालील लोक कमी झाले अर्थात् त्याचा हिंदुधर्मांत अतर्भाव झाला राजपुतान्यात 'रानटी' लोकापैकी सुमारे २५०००० लोक हिंदु धर्मांत सामील झाले गेल्या शिरगणतीच्या वेळी १६१६२९ इतके लोक ग्वाल्हेर सस्थानात 'रानटी' या सदराखाली होते ते या वेळी फक्त १८२९१ लोकानी 'हिंदु रानटी' या सदराखाली आपली नांवे नोदविली

—खानेसुमारी १९३१

* * *

## हिंदुस्थानची सैन्यभरति कशी होते ?

हिंदुस्थानची सैन्य-भरती कोणकोणत्या प्रातातून किती प्रमाणात केली जाते हे दाखविणारे आकडे

| | | |
|---|---|---|
| १ | पजाब | ८६००० |
| २ | नेपाळ | १९००० |
| ३ | सयुक्तप्रात | १६५०० |
| ४ | राजपुताना | ७००० |
| ५ | मुबई | ७००० |
| ६ | काश्मीर | ६५०० |
| ७ | वायव्य सरहद्दप्रात | ५६०० |
| ८ | मद्रास | ४००० |
| ९ | ब्रह्मदेश | ३००० |
| १० | हैदराबाद | ७०० |
| ११ | बलुचिस्तान | ३०० |
| १२ | बिहार-ओरिसा | ३०० |
| १३ | मध्यहिंदुस्थान | २०० |

| | | |
|---|---|---|
| १४ | मध्यप्रात | १०० |
| ५ | म्हैसूर | १०० |
| १६ | बगाल | ० |
| १७ | आसाम | ० |
| | इतर | १९०० |
| | एकूण | १,५८,२०० |

सैन्यात घेताना मार्शल आणि नॉन मार्शल असा जातीवरून भेद केला जातो विशेषत पुढील जातीना सैन्यात शिरण्याचा पहिला मान मिळतो (१) पजाबातील मुसलमान (याची सख्या सर्व जातींपेक्षा नेहमी जास्त असते) (२) शीख, (३) दोगरा, जम्मू आणि काग्रा प्रातातील रजपूत, (४) पठाण (वायव्य सरहद्द प्रात), (५) जाट, (६) अहिर, (७) गुजार (पजाब), (८) गढवाली, (९) कुमाउनी (अल्मोरा जिल्हा), (१०) गुरखा, (मध्य आणि पूर्व नेपाळ), (११) रजपूत (राजपुताना व स प्रात), याच्यातही प्रथम मुसलमान रजपुताना वाव मिळतो (१२) राजपुताना मुसलमान, (१३) मराठा, (१४) शेलके मद्रासी, (१५) ब्रह्मदेशातील जाती

"सैन्यभरती करताना मार्शल आणि नॉन मार्शल असा फरक असावा तितका वस्तुत नसून हेतुपुरस्सर तो करण्यात येतो" अशा आक्षेपास सायमन कमिशनच्या रिपोर्टांत उत्तरादाखल असे म्हटले आहे की "महायुद्धाचे वेळी सैन्यभरती केली त्या वेळी तरी कोणासहि सैन्यात मज्जाव नव्हता ना? मग त्यावेळी बगालने अवघे ७००० सैनिक पुरविले व पजाबने तर तीन चतुर्थांश भरती केली इतके सोपे उत्तर या आक्षेपास पुरे आहे" शभर वर्षे सैनिकी बाणा नष्ट केलेल्या लोकात एकदम वीरश्री कशी उत्पन्न होणे शक्य आहे ते सायमन साहेबच जाणोत !

* * *

## पाकस्तान चळवळीचें पत्रक

पाकस्तान या शब्दाचा कामीरर, पजाब, सीमाप्रात, सिध, बलुचिस्थान मिळून झालेला वायव्येकडील हिंदुस्थानाचा भाग असा अर्थ पाकस्तान चळवळीचे पत्रकात दिला आहे. हे पाकस्तान हिंदुस्थानपासून अलग करण्यात यावे असे मतहि या पत्रकात माडले आहे हे पत्रक ब्रिटिश उमराव, पार्लमेंटचे सभासद, राजकारणी पुरुष, वर्तमानपत्रे व सस्था याचेकडे प्रसृत करण्यात आले आहे

**पाकस्तान चळवळीचा इतिहास** – गेल्या दीड वर्षापासून हिंदुस्थानातील मुस्लीम प्राताचे पाकस्तान या नावाचे स्वतत्र सयुक्त घटनात्मक राज्य करावे अशी चर्चा चालू आहे अफगाणिस्तानाचाही समावेश त्यात करावा असे मत होते पाकस्तान या नावाची व्युत्पत्ति प–पजाबकरिता, अ हे अफगाणिस्तानाकरिता व क हा कराचीकरिता मिळून पाक झाले हिंदुस्थानपासून ब्रह्मदेश वेगळा करण्यासारखीच ही चळवळ आहे त्या पत्रकात पुढे असे म्हटले आहे "सर्व हिंदुस्थानच्या सयुक्त घटनेच्या पायावर उभारलेल्या इडिया बिलाने पाकस्तानच्या राष्ट्रीय जीवनावर सकट ओढवले आहे सामाजिक, सास्कृतिक, धार्मिक व ऐतिहासिक कारणावरून आम्ही हिंदुस्थानपासून वेगळी अशी स्वतत्र घटना पाकस्तानासाठी का मागतो हे समजण्यासाठी हिंदुस्थान व पाकस्तान याच्यातील मूलभूत भिन्नपणा ध्यानात आणला पाहिजे ज्याप्रमाणे हिंदुस्थानी लोक हिंदुस्थान ही आपली मायभूमि मानतात त्याप्रमाणे पाकस्तान ही आमची मायभूमी आहे

"लोकसख्येमध्ये हिंदुस्थानात हिंदु लोकाचे प्रमाण तीन चतुर्थांश इतके असल्यामुळे जसे ते हिंदुस्थान आपले म्हणतात तसेच पाकस्तानात आमचे तसेच सख्याधिक्य असल्यामुळे आम्ही पाकस्तान आमचे म्हणतो भौगोलिक दृष्टयाहि पाकस्तानची भूमी स्वतत्र व वेगळी भूमि आहे"

"इडिया बिलातील सर्व हिंदुस्थानच्या सयुक्त राज्यघटनेत आम्हाला सामील केल्याने आमची पूर्ण राष्ट्रीय उन्नति होणे अशक्य होऊन जाईल आमचे स्वतत्र राष्ट्रीयत्व मान्य करा हीच आमची मूलभूत मागणी राउड टेबल परिषदेंतील स्वय-

मन्य मुसलमानानी हिंदुस्थानच्या संयुक्त राज्याला मान्यता देऊन आमचा राष्ट्रीय भविष्य काळ गमाविला आहे." —केसरी ता ९-८-३५

* * *

## मुसलमानांनीं जातीय प्रतिनिधित्व कसें मिळविलें ?

इ स १८९२ सालच्या कौन्सिल अँक्टाप्रमाणे कायदेमडळातल्या जागा, सरकार म्युनिसिपालिटचा, लोकलबोर्ड, युनिव्हर्सिटी, व्यापारी सस्था अशा सस्थानी जे आपले प्रतिनिधी निवडले असतील त्यातून वाटेल त्यास देई ही पद्धत चालू असतानाच काही विशिष्ट जातीना व विशष कार्य करणाऱ्या सस्थाना प्रतिनिधित्व देण्यात यई या विशिष्ट जातीत 'मुसलमानही' एक असे

मुसलमानाना वेगळे प्रतिनिधित्व देण्याचा ठराव १९०९ सालच्या इडियन कौन्सिलस् अँक्टाने झाला १९०६ साली व्हाइसरॉयाच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलातून एक सुधारणा कमिटी नेमिली गेली याच वेळी ना आगाखान याचे अध्यक्षतेखाली मुसलमानाचे एक शिष्टमडळ व्हाइसरॉय लॉर्ड मिटो याजकडे गेले; शिष्टमडळाने केलेल्या मागण्या व त्याचे मुद्दे पुढीलप्रमाणे होते —

(१) हिंदुस्थानात मुसलमानाची सख्या एकूण लोकसख्येच्या एक पचमाश पेक्षा जास्त आहे. (त्यावेळी एकूण २९ कोटी ४० लक्षापैकी ६ कोटी २० लक्ष होती)

(२) मागसलेल्या जाती व रानटी जाती याची गणना हिंदूत केली म्हणून, नाही तर मुसलमानाचे हिदूशी प्रमाण आहे त्यापेक्षा जास्त आहे.

(३) रशिया सोडून इतर कोणत्याहि पहिल्या दर्जाच्या युरोपिअन राष्ट्रातील लोकसख्येपेक्षा हिंदुस्थानांतील मुसलमानाची सख्या जास्त आहे.

(४) अल्पसख्य असूनहि साम्राज्यरक्षणासाठीं मुसलमानांनीं जास्त हातभार लाविला आहे.

(५) मुसलमानाना पूर्वी दिलेले प्रतिनिधित्व अयोग्य तर आहेच, परतु सरकारने निवडलेले प्रतिनिधी नेहमी जातीला मान्य असेच असतात असे नाही वरील मुद्दे दाखवून पुढील मागण्या करण्यात आल्या.

(१) (मुसलमानाना) जातीय तत्त्वावर सख्याबल, सामाजिक स्थिति व एकदर जनतेवर वजन या गोष्टीच्या इतमामाप्रमाणे लोकल बोर्ड व म्युनिसिपालिटयामधून प्रतिनिधित्व देण्यात यावे

(२) विद्यापीठाच्या नियामक मडळयातून मुसलमानाचे प्रतिनिधी राहातील अशी खबरदारी (सरकारने घ्यावी)

(३) मुसलमान जमीनदार, वकील, व्यापारी पदवीधर (काही ठराविक लायकीचे) म्यु सभासद व लोकलबोर्डाचे सभासद याच्या मतदार सघानी निवडलेले लोक प्रातिक कायदे मडळात घ्यावे

(४) वरिष्ठ कायदेमडळात मुसलमान प्रतिनिधी किती असावयाचे ते त्याच्या सख्येवर अवलबून नसावे कायदेमडळात क्षुल्लक वाटेल इतकी मुसलमानाची अल्पसख्या नसावी ( Mohammedans should never be in an ineffective minority. ) शक्य तर सरकारने निवड करण्याऐवजी प्रतिनिधीची पुढील मतदारसघाकडून निवड झाल्यावर जसेच्या तसेच कायदेमडळात जावे मतदारसघ प्रातिक प्रतिनिधी, जमीनदार, वकील, विद्यापीठाचे फेलो, व्यापारी, अशाचे असावे

मुसलमानाच्या वरील मागण्याना लॉर्ड मिंटो यानी दिलेल्या उत्तराने मुसलमानाच्या स्वतत्र प्रतिनिधित्वाच्या मागणीला पहिल्याने सरकारी मान्यता मिळाली असे समजण्यात येते, आणि सरकारने दिलेले खास वचन म्हणून मुसलमान अजूनहि त्या उत्तराकडे बोट दाखवितात या उत्तरातील अतिशय महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे होता.

"जीमध्यें मतदार-घटना नवीन निर्माण करावयाची आहे किंवा वाढवावयाची आहे,

अशा कोणत्याहि प्रातिनिधिक पद्धतीत—मग तिचा संबध एकाद्या म्युनिसिपालिटीशी असो, जिल्हा -बोर्डाशी असो, किंवा कायदेमडळाशी असो,— मुसलमान जातीला एक स्वतत्र गट म्हणून प्रतिनिधित्वाचा हक्क मिळावा, हाच मला वाटते तुमच्या म्हणण्याचा आशय आहे तुम्ही असेहि म्हणत आहा की, पुष्कळ ठिकाणी सध्याच्या पद्धतीप्रमाणे ठरवून दिलेल्या मतदारसघातून मुसलमान उमेदवार निवडून येईल अशी आशा करणे व्यर्थ आहे, आणि यदाकदाचित् असे झालेच, तर ते त्या मुसलमान उमेदवाराने स्वत ची मते गुडाळून ठेवून स्वजातीविरुद्ध असलेल्या बहुमतापुढे मान वाकविल्यामुळेच होऊ शकेल, आणि अशा उमेदवाराला त्याच्या जातीचा म्हणजे मुसलमानाचा प्रतिनिधी म्हणणे हास्यास्पदच ठरेल आणि राज्यकारभारातील तुमचे स्थान ठरविताना केवळ तुमच्या लोकसख्येच्या आकड्याकडेच लक्ष न देता, तुमच्या जातीचे राजकीय महत्त्व व तिने केलेली साम्राज्य-सेवा ही लक्षात घेऊनच ते ठरवावे हे तुमचे म्हणणे अगदी न्याय्य आहे ! माझेहि मत अगदी बरोबर तुमच्यासारखेच आहे. कृपा करून माझ्या म्हणण्याचा विपर्यास करू नका जातीचे प्रतिनिधित्व कोणत्या उपायानी ठरविता येईल हे दाखविण्याचा माझा उद्देश नाही, पण हिंदुस्थान हा अवाढव्य देश असल्यामुळे, एकदर लोकसख्येतील निरनिराळ्या जातीच्या धर्मसमजुती व परपरा लक्षात न घेता, वैयक्तिक मताधिकार देणाऱ्या कोणत्याही प्रातिनिधिक मतदानपद्धतीचा येथें बोजवारा उडाल्याशिवाय राहणार नाही अशी माझी ठाम समजूत आहे, आणि माझा असा विश्वास आहे की, तुमचेही मत अगदी माझ्यासारखेच आहे ''

व्हाइसरॉयाच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलच्या कमिटीनेहि यावेळी मुसलमानाचे पुरेसे प्रतिनिधी घेतले जात नाहीत असा निकाल देऊन सर्वसाधारण प्रतिनिधीमध्ये जे मुसलमान निवडून येतील त्याशिवाय काही वेगळ्या जागा त्याचेसाठी राखून ठेवण्यात याव्या, तसेच वरिष्ठ कौन्सिलातील ४६ जागापैकी ४ मुसलमानाकरिता राखून ठेवाव्या; त्यापैकी २ जागा निवडणूक होऊन भराव्या व २ गव्हर्नर जनरलने भराव्या, अशा सूचना केल्या या योजनेवर त्या वेळचे भारतमत्री लॉर्ड मोर्ले यांनी मुसलमानाना दुबार मतदानाचा (एकदा सर्वसाधारण मतदार सघातून व दुसरा स्वतत्र जागासाठी म्हणन) अधिकार मिळतो अशी शका काढली परंतु १९०९ च्या कायद्यात वरील कल्पनेलाच मर्त स्वरूप मिळाले मुसलमानाना मध्यवर्ती कायदेमडळात ५ जागा, प्रातिक कायदे मडळापैकी, मद्रास २, आसाम २, मुबई ४, बिहार ओरिसा ४, सयुक्त प्रात ४, आणि बगाल ५ याप्रमाणे जागा मिळाल्या यानतर १९१६ मध्ये त्यावेळचे व्हाइसरॉय लॉर्ड चेल्म्सफोर्ड याचेकडे १९ हिंदू व मुसलमान पुढाऱ्याचे शिष्टमडळ गेले शिष्ट मडळाने प्रत्यक्ष निवडणुकी व्हाव्या, तसेच मुसलमानाना स्वतत्र प्रतिनिधित्व दिल्यानतर सर्वसाधारण मतदार सघातून मतदानाचा त्याचा अधिकार काढून घेण्यात यावा असे सुचविले प्रतिनिधीचे प्रमाण लोकसख्येप्रमाणे ठरविण्यात आले, परतु त्यात मुसलमान जास्त आहेत तेथे प्रमाणात बसेल त्यापेक्षा थोडी कमी व इतर प्रातात थोडी प्रमाणाबाहेर जास्त अशी सख्या ठरविण्यात आली. या करारास कॉंग्रेस व मुस्लीम लीग यानी मान्यता दिली करारमदार लखनौ येथे प्रथम झाले, त्यामुळे पुढे मॉंटेग्यू चेल्म्सफर्ड रिपोर्टांत ते शिक्का मोर्तब झाले तरी लखनौ पॅक्ट याच नावाने ओळखले जातात. या कराराने झालेली प्रातिक कौन्सिलातील जागाची प्रातवार वाटणी

मुसलमानाना पुढीलप्रमाणे मिळाल्या —

| प्रात | जागाचे शेकडा प्रमाण |
|---|---|
| बिहार ओरिसा | २५ |
| बगाल | ४० |
| मध्यप्रात वऱ्हाड | १५ |
| मूबई | ३३ |
| मद्रास | १५ |
| पजाब | ५० |
| सयुक्तप्रात | ३० |

* * *

## हिंदु–मुसलमानांच्या ऐक्याचे प्रयत्न

[ हिंदु मुसलमानाचे दगे जसे वारवार होत आले आहेत तसेच पण ज॰ा थोडया प्रमाणावर त्याच्या ऐक्याचे प्रयत्न झालेले आहेत त्या प्रयत्नाचे वेळी पुढाऱ्यानी काढलेले उद्गार व पुढचे वर्तन याची सागड ज्याची त्याने घालावी ]

इडियन मुस्लीम लीगच्या १२ व्या अधिवेशनाच्या वेळी अध्यक्ष हकीम अजमलखान याच्या भाषणातील हिदु मुसलमानाच्या ऐक्यासबधीचे उद्गार—

" हिदुस्थान व इतर देशात हिदी स्वराज्याची चळवळ चालू ठेवण्याच्या कामी यश मपादन करण्याची गरुकिल्ली हिदु–मुसलमानाचे ऐक्य कायम राखण्यात आहे

हिदु मुसलमानात झालेले ऐक्य कायम टिकवावयाचे असेल तर मुसलमानानी गोवध बद करण्याच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करता कामा नये कुरबानीच्या प्रमगी उट, मेढा, बकरा किवा गाय यापैकी कोणत्याहि जनावराचा बळी दिला तरी चालतो अरब लोक या प्रसगी कधीही गोवध करीत नाहीत म्हणून ते धर्मभ्रष्ट झाले आहेत असे कोणी म्हणत नाही सर्व यज्ञपशूत बकराच अधिक शुद्ध आहे असे पैगबराचे म्हणणे आहे "

—केमरी ता ६ जानेवारी

मुस्लीम लीगच्या अमृतसर येथील १२ व्या अधिवेशनातील पास झालेला एक ठराव —

" हिदु देशबाधवाच्या मनोवृत्ति मुसलमानानी यापुढे दुखवू नयेत व हिदु मुसलमानातील ऐक्य वाढवावे या करिता बकरीदच्या सणाच्या दिवशी गायीशिवाय इतर जनावराचा बळी द्यावा "

—केसरी ता ६।१।२०

यानतरच्या नागपूरच्या अधिवेशनात गाईसबंधीच्या ठरावाचा पुनरुच्चार करण्यात आला तसेच या ठरावास अनुलक्षून अधिक झटन प्रयत्न करण्यासबधी लोकास साग याचा रावहि झाला या नतरचा ठराव हिदूना कायद्याने गोरक्षण न करण्याबद्दल आग्रह करावा असा होता

ता ६।११।२१ रोजी दिल्ली येथें भरलेल्या हिदुमहासभेच्या जादा अधिवेशनाचे वेळी अध्यक्ष या नात्याने लाला लजपतराय यानी केलेल्या भाषणातील काही वाक्ये "कायद्याने गोवध बद करणे बहुताशी अशक्य असून तो मुसलमानाच्या स्नेहभावानेच घडून येणे शक्य आहे स्वराज्यच गोवध थाबवू शकेल, व स्वराज्य हे केव्हाहि हिदु मुसलमानातील एकीवर अवलबून आहे गोमास खाणारे इग्लिश लोक गोवध बदीस यत्किचितहि मदत करतील अशी आशा करू नका —केसरी ता ८–११–२१

* * *

### दिल्ली ऐक्य परिषद्—(२५–९–२४)

या ऐक्य परिषदेस हकीम अजमलखान, स्वामी श्रद्धानद व मौ महमद अल्ली यानी पाचारण केले सभेस सर्व प्राताचे मिळून तीनशेवर प्रतिनिधी हजर होते अध्यक्षस्थान प मोतीलाल नेहरू यास देण्यात आले होते सभेत पास झालेल्या ठरावापैकी पुढील दोन महत्त्वाचे आहेत

१ प्रत्येक मनुष्यास पूर्ण धार्मिक स्वातत्र्य असावे, इतकेच नव्हे तर आपल्या सदसद्विवेक बुद्धीप्रमाणे वागण्याची मोकळीक असावी कोणत्याहि धर्माच्या लोकाची देवस्थाने भ्रष्ट करणे, आणि एकाद्या धर्माचा स्वीकार केल्याबद्दल किवा परत एकाद्या धर्मात आल्याबद्दल एकाद्या व्यक्तीस शिक्षा करणे ही गोष्ट निषेधार्ह आहे असे या परिषदेचे मत आहे

**२ मौ. शौकतअल्लीचा ठराव**

"हिदुस्थानात ठिकठिकाणी हिदू व मुसलमान याच्यात तटे होऊन वित्त व जीवित याची हानि होत आहे, कित्यक देवालयेहि उध्वस्त केली जात आहेत, याबद्दल या परिषदेस अत्यत वाईट वाटत आहे ही कृत्ये रानटीपणाची असून त्यामुळे ज्य.ना त्रास मोसावा लागला त्याच्याविषयी या परिषदेला पूर्ण सहानुभूति वाटत आहे प्रति-

कार करण्यासाठी आपल्याच हाती कायदा घेऊन शिक्षा करणे हे गैरकायदा व अधार्मिकपणाचे कृत्य आहे असे या परिषदेचे मत आहे आपसात काही मतभेद असेल तर ते पचायती मार्फत तोडून घ्यावेत व पचायतीमार्फत तुटण्यासारखे नसल्यास न्यायकोर्टांतून तोडून घ्यावेत असेहि या परिषदेचे मत आहे " —केसरी ३०-९-२४

—पधरा गृहस्थाची एक राष्ट्रीय पचायत स्थापन करण्याविषयीहि एक ठराव करण्यात येऊन तिचे अध्यक्षस्थान महात्माजीना देण्यात आले

मशिदीवरून वाद्ये वाजविण्याबाबत मुसलमानानी तटे करू नयेत व हिदूच्या आरत्या वगैरेना अडथळा करू नये तसेच वरील गोष्टी करताना हिदूनीही मुसलमानाच्या धर्मभावना लक्षात घ्याव्या असे ठरले

गोवधाचे बाबतीत हिदूनी जुलम-जबरदस्ती करू नये किवा कायद्याने त्यास प्रतिकार करण्याचे भानगडीत पडू नये, हे काम दोन्ही समाजाच्या सलोख्यावर व विश्वासावरच सोपविण्यात यावे असे ठराव करण्यात आले

—केसरी ता ७-१०-२४

* * *

## दिल्लीची ऐक्य सभा

(ता २५ जानेवारी १९२५)

प्रथम महात्मा गाधीचे भाषण झाले कॉंग्रेस मधील सर्व पक्ष एक व्हावे यासाठी हिदु-मुसलमानात ऐक्य असावे व ब्राह्मण अब्राह्मण हा वाद मिटावा अशी योजना कमिटीने करावी असा त्याच्या भाषणाचा आशय होता

मुसलमानाच्या वतीने बॅ जिना म्हणाले, "लखनौचा करार हा कायमचा करार नसून तो केवळ प्रास्ताविक स्वरूपाचा होता मुसलमानानी पजाब व बगाल येथे आपल्या बहुमताचा हक्क सोडून दिला परतु त्याना तो बहुमताचा हक्क आता पाहिजे आहे लखनौ कराराचा मूळ उद्देश अल्पसंख्याकाना दोन रीतीनी सरक्षण देण्याचा होता त्याना जादा प्रतिनिधित्वाचे हक्क देणें व कायदेमडळात त्याना आपले स्वत्व टिकविता येईल अशी व्यवस्था असणे परतु दुसरी गोष्ट केवळ कागदावरच राहिली यापुढे अल्प संख्याकाची वाट काय लावावयाची हे कमिटीने ठरविले पाहिजे —केसरी ता २७-१-२५.

* * *

## मुस्लीम सर्वपक्षीय परिषद

ता ३१ डिसेबर १९२८ रोजी दिल्ली येथे ना आगाखान याचे अध्यक्षतेखाली राष्ट्रीय पक्ष सोडलेल्या मुसलमानाची सर्वपक्षीय परिषद झाली ना आगाखान म्हणाले —" सद्गृहस्थ, नीट ध्यानी धरा, आपल्या भावी हिताच्या हिदुस्थानात ज्या सुधारणा होणार त्या एका दिवसात होणार नाहीत किवा रात्री घरात चोर शिरावा याप्रमाणे त्या रशियात झाल्या तशाहि त्या येथे होणार नाहीत

मला एक गोष्ट सागावयाची ती ही की, मुसलमानानी हिदूसबधाने नेहमी शकित वृत्ति धरता कामा नये अशी वृत्ति धरल्यास त्यास सुखाने येथे राहताच येणार नाही व त्यामुळे हिदी उत्कर्षालाहि बाध येईल मुसलमानानी आपल्या ज्ञातिहितापुरतेच पाहून भागणार नाही. सर्व हिदुस्थानाच्या हिताच्या दृष्टीने राष्ट्रीय प्रश्नांचा विचार करावा लागतो

हिदी मुसलमान ही एकच जात नसून अनेक जातीचे असलेले एक राष्ट्रच आहे

हिदू-मुसलमानात अलीकडे जे कलह उत्पन्न होत आहेत त्यासबधी मला कळकळीने इतकेच सागावयाचे आहे की यापुढे असे कलह होऊ देऊ नका या कलहाचे मुख्य कारण गोवध हे आहे यावर उपाय आपण काढला पाहिजे इब्राहिम याने मूळ कुरबानी केली परतु त्याने गाय केव्हाहि मारली नाही गोवध आपल्या धर्मांत सागितलाच नाही उट अगर मेंढी याचाच उल्लेख आढळतो इस्लामी धर्माची मूळ गादी जे अरबस्थान तेथे हाजी लोकानी कधी गोवध केला आहे काय ? व त्यानी जर गोवध केला नाही तर त्यानी अधर्मा-

चरण केले असे तुम्ही म्हणाल काय ? याचे उत्तर तुम्हांस नकारार्थीच द्यावे लागेल मग हिंदुस्थानांतच तुमची दृष्टि अशी का फिरली? अकबर, हुमायून, अमीर हबीबुल्लाखान यानी गोवधास बंदी केली होती काश्मीरमधील मुसलमान गोवध कधीच करीत नाहीत रक्त, मास ही परमेश्वरास पोहोचत नाहीत असे मुळी आपले धर्मसूत्रच आहे कोणीहि उलेमानी माझे हे विधान खोडून काढावे त्याना खोडताच येणार नाही

—केसरी ता २२-१-१९२९

* * *

## भिल्ल हे हिंदू आहेत, अगर रानटी ( जातीपैकीं ) आहेत?

### रे. डॉ. इनॉक हेडबर्ग डी लिट्. यांचें पत्र

या (वरील) प्रश्नास बरोबर उत्तर देताना एक प्रश्न माझे पुढे उभा रहातो आणि तो म्हणजे 'हिंदु म्हणजे कोण ? ' मला जर हिंदु या शब्दाची व्याख्या द्यावयाची झाली तर मी असे म्हणेन की, "जो कोणी आपणास हिंदु म्हणवून घेत असेल व जो हिंदुत्वाची मुख्य तत्त्वे पाळीत असेल तो हिंदु" ही व्याख्या जर बरोबर असेल आणि ती आहे असे मला वाटते, तर तीच भिल्ल लोकाना लागू केली असता काय होते ते पाहू

सगळे भिल्ल अत्यत रानटी आणि मागासलेले सुद्धा, त्याच्यातील जे काही थोडे मुसलमान किंवा ख्रिस्ती झाले आहेत असे सोडून, आपण हिंदु आहो असे सागतात आणि त्याप्रमाणे एतद्देशीय ख्रिस्ती, मुसलमान व हिंदु त्यास आपापल्या जातीत समाविष्ट करून घेतात ज्या भागात ख्रिस्त्यात व मुसलमानात बाटलेले हिंदु आहेत तेथील आपल्या पूर्वापार हिंदुधर्मास चिकटून राहिलेल्या भिल्लाना सगळीकडे व सगळे लोक हिंदु-भिल्ल म्हणून ओळखतात याचे एकच उदाहरण द्यावयाचे झाल्यास 'अकराणी' (Akrani) येथील अत्यत रानटी भिल्लाचे घेता येईल (आणि) त्याना तुम्ही हिंदू नाही असे सागितले तर त्याचा अपमान होतो.

त्याच्या हिंदुत्वाची मुख्य तत्त्वे पाळण्याबद्दल येवढे सागितले म्हणजे पुरे होईल की, (१) ते जाती मानतात (२) हिंदु सणवार पाळतात, (३) हिंदु देव, देवताची पूजा करितात (आता) त्याच्यातील जातिभाव एकदर हिंदूप्रमाणे तीव्र नसेल हे खरे आहे, तरी पण जाती त्याच्यात आहेत, आणि ही गोष्ट काही प्रसगी ठळकपणे दिसून येते महार, चाभार, माग, होलार व इतर हलक्या जातीचे हिंदु याना खरे (Respectable) भिल्ल हलकेच समजतात, मग स्वत ते कोणत्याही जातीचे असोत ते त्याचे खात नाहीत किंवा त्याचे बरोबर बेटीव्यवहार करीत नाहीत इतकेच नव्हे तर त्याना शिवणे सुद्धा ते कमी समजतात

त्याचे धार्मिक उत्सव व सणवार (Holidays) इतर हिंदूप्रमाणेच आहेत उदाहरणार्थ होळी, दसरा, दिवाळी (वगैरे) इतर हिंदूचे बारीक-सारीक सणसुद्धा दिवसानुदिवस त्याच्यात जास्त रूढ होत आहेत

हिंदूची देवळे, देवता, अवतार व मोक्ष (याच्या कल्पना) भिल्लानी जशाच्या तशा उचलल्या आहेत ते त्याना (वहाणी) वाहतात (They bring them their sacrifices) व त्याची पूजा करितात त्याच्यात जाति-देवता किंवा ग्रामदेवता आहेत हे कबूल आहे परतु त्या हिंदुस्थानातील इतर हिंदूतही आहेत (आणि) ही गोष्ट फक्त खालच्या दर्जाच्या हिंदूतच नसून पुष्कळशी बौद्ध, ज्यू आणि मुसलमान लोकातहि दिसून येते, आणि ईजिप्त मधील अशिक्षित ख्रिस्ती व रशियातील शेतकरी याच्याबद्दल कोणी बोलावे ?

असे असूनसुद्धा भिल्ल आणि सामान्य हिंदु याच्यामध्ये दिसून येण्यासारखा फरक असू शकेल परतु तो फरक धार्मिक स्वरूपाचा नसून वर्णाचा आहे व तोहि झपाट्याने कमी होत आहे

मी भिल्लाच्या काही रूढ कल्पना गोळा केल्या आहेत आणि त्या कधीं तरी प्रसिद्ध करीन या प्रश्नावर लख्ख प्रकाश पडून मी जे यांत विधान

केले आहे त्यास त्या आधारभूत होतील असे मला वाटते

साराश भिल्लाना, इतर हिंदूना किवा जगांतील इतर धर्मीयाना, धार्मिक बाबतीत त्याच्यावर विश्वास टाकण्यात जो हक्क दिलेला आहे तो देण्यात यावा या देशातील इतर हलक्या जातीचे जे हिंदू आहेत तसेच तेही आहेत ज्या अर्थी ते स्वत स हिंदू म्हणवतात त्या अर्थी त्यांच्या म्हणण्या-प्रमाणेच त्याचा वर्ग पाडण्यात यावा

—खानेसुमारी १९२१

[ वरील पत्रक येथें देण्याचा हेतु इतकाच की भिल्लांप्रमाणेच इतर रानटी जातीहि हिंदुस्थानांत पुष्कळ आहेत व त्याना काहीतरी सबबीवर आपआपल्या धर्मांत ओढण्याचा इतरांचा सारखा प्रयत्न चालू असतो या मागसलेल्या जातीच्या चालीरीतीवरून त्याचें हिंदुत्व आपणास पटतेच परंतु इतर धर्माचे लोक सुद्धा अर्थातच अपवादा-दाखल ही गोष्ट कबूल करतात. हिंदूनीं वेळीच सावध होऊन जरूर तो इलाज करणे अवश्य आहे —सं. ]

# हिंदु समाजाचें अंतरंग

अस्पृष्टांच्या प्रश्नाची चर्चा सध्यां इतकी जोरानें चालू आहे की, त्या-विषयीं आतां मुद्दाम जास्त कांहीं लिहावयास हवें असें वाटत नाहीं. अस्पृश्यता निवारणाच्या कार्याला जें कांहीं यश आतांपर्यंत आलें आहे तें प्रश्नाच्या महत्त्वाच्या मानानें फारच अल्प आहे. स्पृश्य समाज या प्रश्नाकडे सहानुभूतीनें पाहूं लागला असला तरी त्याचा अस्पृश्य समाजाला प्रत्यक्ष उपयोग फार थोडा होत आहे. अस्पृश्यांना छळण्याचें काम चालूच आहे. कायदे होऊनसुद्धां त्यांची अंमलबजावणी होत नाहीं असें झालें आहे. अस्पृश्य पुढाऱ्याचें जें मत तेंच एकंदर अस्पृश्य समाजाचें व्हावयाचें असल्यामुळें तेंच येथें घेतले आहे.

## अस्पृष्टांच्या आकांक्षा

### अस्पृश्यांची मतें व त्यांच्या आकांक्षा

अस्पृश्य समाज अजून मूकच आहे शिक्षणाचा सस्कार नसल्यामुळे आपल्या गाऱ्हाण्याना किती तऱ्हानी तोड फाडावे हे त्याना अजून साधलेले नाही पण त्याचे पुढारी व त्याच्या पुढारी सस्था याच्या द्वारा ही गाऱ्हाणी व्यक्त झालेली आहेत भावी कालात आपले काय व्हावयाचे या विषयाची जबर चिता या पुढाऱ्याना लागली आहे असे खालील उताऱ्यावरून दिसून येईल राजसत्ता जर स्पृश्य लोकाच्या हाती गेली तर आपले हाल होतील असे त्यास वाटते पुढील उद्धृत उद्गार निरनिराळ्या काळचे व ठिकाणचे आहेत

'अस्पृश्यता' हेच काय ते मुख्य सकट आहे यातून मुक्तता झाली पाहिजे हा सर्व उद्गाराचा इत्यर्थ आहे पण ही जर अजून आहे तर आम्हाला राजसत्तेत स्वतत्र हक्क हवेत. कारण त्यावाचून आमच्या तक्रारी मिटावयाच्या नाहीत व स्पृश्य हिंदूनाही आम्हास बचकात ठेवता यावयाचे नाही असे त्याचे ठाम मत आहे

पु सामाजिक बाबतीत प्रान्तनिहाय अस्पृश्य ढाऱ्यांची काय मते आहेत हे जरी नीट अजमावता आले नाही तरी आपल्या प्राताला अस्पृश्याचे जे प्रमुख पुढारी डॉ आबेडकर यानी अनेकदा बोलून दाखविले आहे की, सर्व हिंदू समाजात आमूलाग्र क्राति घडवून आणणे हेच आमचे काम आहे जातिसस्था नष्ट झाली पाहिजे व रोटी-बेटी व्यवहार स्थापित झाला पाहिजे असेहि त्यानी अनेकदा सागितलेले आहे हिंदू लोकानी आपल्याला जर नीट वागविले नाही तर आम्ही अस्पृश्य लोकानी मुसलमान का होऊ नये असेहि त्यानी एका परिषदेत विचारले होते देवालय-प्रवेशासबधाने ते इतकेसे खळखळ करीत नाहीत त्याना तो हवा आहे यात तिलप्राय सदेह नाही, पण त्यापेक्षा आर्थिक उन्नतीवर त्याचा भर विशेष आहे स्पृश्यासबधीचा अविश्वास हा त्यानी इग्लडच्या राजदरबारी किती कडकडून वर्णन केला हे त्याच्या उद्गारावरून दिसून येईलच

* * *

दुसऱ्या गोलमेज परिषदेतील श्रीनिवास याच्या भाषणातील निवडक उतारे —

**अस्पृश्यांचा निराळा मतदारसंघ—**

या आमच्या मागणीला लोक जादा मागणी समजतात आम्हाला असे सागण्यात येते की, काही झाले तरी आम्ही हिंदू जातीचेच एक घटक

आहोत व आम्हाला स्वतंत्र मतदारसघ दिले तर आमच्या दोघामधील अतर दुरावत जाईल असे बोलणाऱ्या लोकाबद्दल योग्य तो आदर दाखवून मला असे सागणे भाग आहे की, त्याच्या विधानाचे मर्म माझ्यातरी ध्यानात येत नाही अस्पृश्य वर्गाचे जीवित व रहाणी ही इतर हिंदूपेक्षा अजिबात निराळी आहेत कोणताही हिंदू भटजी अस्पृष्टाच्या घरात कोणताही सस्कार करणार नाही व त्याला आपल्या देवळात येऊ देणार नाही हिंदू न्हावी त्याची हजामत करणार नाही, हिंदू धोबी त्याचे कपडे धुणार नाही, इतकेच नव्हे तर कोणताही हिंदू अस्पृष्टाबरोबर रोटीव्यवहारही करणार नाही! मग बेटीव्यवहार तर स्वप्नातही आणावयास नको स्पृश्य व अस्पृश्य हिंदूमध्ये असणाऱ्या तीव्र सामाजिक विषमतेहून अधिक विषमतेची आम्हाला कल्पनाही करता येणार नाही शेवटी मला इतकेच सागावयाचे की या ठिकाणी "परमेश्वराने ज्याची गाठ बाधली आहे त्याची कुणीही ताटातूट करू नका" हा बायबलातील उपदेश अनुसरण्यासारखी आमची स्थिति नाही खरोखरीच जर विषमता आहे, तर ती लक्षात घ्यावयास नको काय ?

स्पृष्ट व साध्या सयुक्त मतदारसघामध्ये अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधी म्हणजे बहुतकरून चातुर्वर्णीय हिंदूपैकी नियोजित लोक अशीच स्थिति होणार व त्यामुळे आमच्या प्रतिनिधित्वाच्या मुख्य तत्त्वाचे समूळ उच्चाटन झाल्याखेरीज रहाणार नाही याकरताच सायमन कमिशनने निर्दशित उमेदवारीपद्धतीचाच पुरस्कार केलेला आहे, आणि आम्ही निराळे म्हणजे स्वतत्र मतदारसघ मागतो यातील इगित तरी हेच आहे

या न्याय्य मागणीला आम्हाला तरी कोणतीच हरकत दिसत नाही कित्येक वेळा आम्हाला असे विचारण्यात येते की, 'अहो, या जागा स्वीकारण्यास तुमच्याजवळ लोक तरी आहेत का ?' वक्रोक्ति वगळल्यास वरील प्रश्नाचे उत्तर कोणत्या प्रकारच्या लोकाची जरूरी आहे यावर अवलबून राहाते आपल्या वक्तृत्वाने कायदेमडळांत गोधळ माजविणाऱ्या बी. ए. व एम् ए लोकाची फरड आम्हास उभी करतां येणार नाही विरोधकाच्या अग्रभागी चमकणारे आणि तिजोरीवर अधिकार चालविणारे लोक आम्हाला कदाचित् निर्माण करता येणार नाहीत! आणि आम्हाला तशी जरूरीही नाही राज्यकारभार बळकावण्याचा नव्हे तर तो आमच्या विरुद्ध चालविला जात नाही अशी खबरदारी घेण्याचा आमचा मुख्य इरादा आहे याकरता आमची परिस्थिति जाणणारे व आमच्या हालअपेष्टा वेशीवर टागणारे असे लोक आम्हाला पाहिजेत या गोष्टी करावयास खबीर अशी कैक माणसे आमच्याजवळ आहेत मला मोठे आश्चर्य वाटते की, "या जागा स्वीकारण्यास तुमच्याजवळ लोक तरी आहेत का ?" हा प्रश्न फक्त अस्पृश्य वर्गांनाच विचारण्यात येतो कायदेमडळातील जागाच्या ज्याच्या हक्काचे प्रमाण अस्पृश्य वर्गापेक्षा कितीतरीच जास्त आहे अशा शीख, मुसलमान अगर दुसऱ्या कोणत्याही अल्पसख्याक जमातीला हा प्रश्न विचारला जात नाही तरी पण, या अल्पसख्याक जमातीच्या अगर जातीच्या, सध्याच्या कायदेमडळातील प्रतिनिधीची काय लायकी असते ? मुबई कायदेमडळात एकोणीस सभासद सिधच्या वाट्यास आलेले आहेत या एकोणीस सभासदापैकी अदाजे चवदा सभासदाना इग्रजीचा एक शब्द माहीत असेल तर शपथ! त्यानी वादविवादात कधीही भाग घेतला नाही इतकेच काय पण त्यानी अजूनपर्यंत एकादा प्रश्नसुद्धा विचारलेला नाही त्याच मडळामध्ये सात का काही जागा ब्राह्मणेतराकरिता राखीव आहेत या सातापैकी एकदोन तरी सभासद असे असतात की त्याना इग्रजी येत नाही मद्रास कायदेमडळामध्ये इग्रजी न येणारे चार सभासद आहेत व त्यापैकी दोन ब्राह्मणेतर पक्षाचे आहेत पजाब कायदेमडळात शभर सभासद आहेत, त्याच्यापैकी फक्त वीस लोकाना इग्रजी येते बाकीचे लोक आपापल्या मातृभाषातून बोलतात इतर प्रातिक कायदेमंडळातूनही अशाच तऱ्हेची उदाहरणें नि सशय दाखविता येतील; इतकेच

नव्हे तर इंग्रजी न येणारे लोक खुद्द लेजिस्लेटिव्ह असेंब्लीतही आहेत हें ध्यानांत ठेवावयास हवे. आतां, इतर जातींच्या इंग्रजी न येणाऱ्या प्रतिनिधींकडून जर कायदेमंडळाचा कारभार चालणें शक्य होतें तर इंग्रजी न येणाऱ्या पण अस्पृश्य लोकांचे प्रतिनिधी असलेल्या अशा लोकांनाच काय म्हणून हरकत असावी ? इंग्रजी भाषेच्या महत्त्वाची आम्हांला जाणीव आहे व सध्या असलेलें तिचें उच्च स्थान ती यापुढेंही कायम राखील अशी आम्हास आशा आहे पण प्रतिनिधी असण्याकरतां इंग्रजी जाणणें ही लायकी ठरविणे, ही मात्र निराळी गोष्ट आहे अस्पृश्य वर्गांच्या हक्काची गळचेपी करण्याकरता ज्यांना एकादे शस्त्र पाहिजे असेल त्याना मात्र यामुळे समाधान वाटेल यामुळे लोकांचे बुद्धिवैभव रसातळाला जाईल व केवळ त्यांच्याच हातून त्याची भरभराट घडवून आणण्याकरता अस्तित्वात येऊ घातलेल्या संस्थांमध्ये शिरून विचारविनिमय करणें त्यांना शक्य होणार नाही, आणि म्हणूनच वरीलसारखी विक्षिप्त आणि जंगली योजना घातुक ठरल्याशिवाय कधीही राहणार नाही म्हणून आम्ही असे म्हणतो की, वरील हरकत कदाचित् प्रामाणिकपणाने घेतलेली असली, तरी ती निराधार व म्हणून निरर्थक आहे

## आधीं मुग्धवृत्ति सोडा

अस्पृश्यवर्गाच्या राजकीय मागण्याच्या बाबतीत स्वत ची भूमिका स्पष्ट करण्याऐवजी आमच्या हिंदु मित्रांनी स्वीकारलेली मुग्ध वृत्ति पाहून आम्ही तर आश्चर्यचकित झालों हिंदी लोकांच्या राजकीय मागण्यांच्या बाबतीत स्वत ची भूमिका कोणती आहे ते ब्रिटिश सरकारने भरीव योजनांच्या द्वारा स्पष्ट करावें असा तर त्यांनीं सारखा आग्रह चालविला आहे त्याच न्यायाने, अस्पृश्य वर्गाच्या राजकीय मागण्यांबद्दल स्वत ची भूमिका कोणती हें आमचे हिंदु मित्र उघडपणें सांगतील असें आम्हांस वाटलें होते कारणें काय असतील तीं त्यांचीं त्यांनाच ठाऊक; पण असें करणें ठीक नव्हे असें त्यांना वाटलें खरें अशा प्रकारच्या गोष्टींत त्यांनीं कसें वागावें हें त्यांना सांगण्याचे काम आमचें नाही. मुत्सद्दीपणाचा काटा त्यांच्या बाजूला झुकलेला आहे हें आम्ही जाणतों या प्रश्नाचा मला अधिक्षेपच करावयाचा आहे; पण असें करतांना मला सभ्यतेचा उसना आव आणतां येत नाही आम्हीं त्याना एकच गोष्ट सांगू शकतो आणि ती ही की, तुम्ही आम्हांला जर 'जबाबदार कार्यकारी मडळाला तुमचा पाठिंबा आहे काय ? ' असा प्रश्न विचारलात, तर तशाच तऱ्हेचा दुसरा प्रश्न तुम्हाला विचारून आम्ही त्याचे उत्तर देऊं तो प्रश्न हा की, 'ज्याला तुमचे कार्यकारी मडळ जबाबदार असावयाचे म्हणून तुम्ही म्हणता तं कायदेमंडळ कोणत्या प्रकारचे होणार आहे ? ' कायदेमंडळाची घडण आणि भूमिका या दोन गोष्टी जबाबदार राज्यघटनेच्या बाबतीत आम्हाला निर्णयाच्या वाटतात

## शेवटचे तीन मुद्दे

शेवटी मी तीन मुद्दे सागून भाषण सपविणार आहे पहिला मुद्दा असा की, स्वतंत्र प्रतिनिधित्वामुळे आमच्यावर 'खास अस्पृश्य' असे शिक्कामोर्तब होईल व त्यामुळे आमच्या हितसबंधाला धक्का बसेल, या सूचनेला आम्ही काडीचीही किमत देत नाही आमचे मत अगदी निराळे आहे व ते असे की, आजारी माणसाने स्वत ची दु खें उघडपणे बोलावीत, त्यावर उपचार करावेत व अशा रीतीनें एक दिवस त्या रोगाच्या तावडीतून सुटावे हेंच त्याच्या दृष्टीने अधिक चागले त्या आजाऱ्यानें लाजेने जर आपला रोग लपविला व त्यावर वेळींच उपचार केले नाहीत तर त्याचे परिणाम भयकर होतील आम्हाला जरूर ते खरेखुरे सरक्षण मिळविण्याच्या कामी आम्ही चालविलेल्या यत्नांमध्यें अशा तऱ्हेच्या लटपटी आम्हास मुळीच खपणार नाहीत. दुसरा मुद्दा हा की, कायद्याच्या जोरावर मूलभूत हक्कांचे दाव आणि अस्पृश्यतेचें उच्चाटन या गोष्टी जरी घडवून आणल्या, तरी त्यामुळे सर्व कार्य होत नाहीं अस्पृश्यतेचें कायद्यानें उच्चा-

टन ही एक बाब आहे, तर तिचे व्यवहारांतून उच्चाटन ही निराळी पण पहिलीहून अधिक महत्त्वाची बाब आहे व्यवहारातून अस्पृश्यतेचे उच्चाटन करणे हे कायदेकारी व कार्यकारी अशा दोनही सरकाराचे मिळून काम आहे व त्यामुळेच आमचा दर्जा आमच्या इतर बाधवाच्या बरोबरीचा होऊ शकेल कायदेमडळ व कायदेमडळाच्या मध्यस्थीने कार्यकारी मडळ यावर हुकमत चालविण्याकरता पुरेशी सत्ता अस्पृश्य वर्गाच्या हाती आल्याशिवाय वरील गोष्ट घडणे शक्य नाही आमच्याकरिता घातलेली सरक्षक बधने आणि आमचे हक्क या गोष्टी राज्यघटनेच्या अतर्भूत पाहिजेत आमच्या भविष्यकालीन स्थितीसबधी कोणाही एका व्यक्तीचा हवाला स्वीकारण्यास आम्ही तयार नाही, मग त्या व्यक्तीचा अधिकार वा योग्यता, किती का असेना"

* * *

दुसऱ्या गोलमेज परिषदेतील डॉ आबेडकर याच्या भाषणातील निवडक उतारे—

## अस्पृश्यांची परिस्थिति

(१) हे विचार किंवा ही मते,४,३०,००,००० लोकांची म्हणजे ब्रिटिश हिदुस्थानच्या एकूण लोकसख्येपैकी एकपचमाश लोकाची आहेत सर्व अस्पृश्य वर्ग मिळून त्याचा स्वत चाच असा एक गट तयार होतो हा गट मुसलमानाहून अगदी निराळा व भिन्नसस्कृत असून, त्या गटाचा जरी हिंदू लोकात समावेश होत असला तरी तो हिंदु समाजाचा एक केवळ अवश्यच असा पोटभाग नाही त्याचे जीवितच निराळे आहे असे नव्हे तर हिदुस्थानातील इतर कोठल्याहि समाजापेक्षा अत्यत चीड आणणाऱ्या अशा भलत्याच परिस्थितीत हे लोक डावले गेले आहेत हिदुस्थानांत हीन व खालच्या दर्जाचे इतर समाज नाहीत असे नाही, पण अस्पृश्याची स्थिति मात्र अगदी निराळ्या स्वरूपाची आहे. ही स्थिति शेत—गुलाम (शेतीबरोबरच विकली किवा खरेदी केली जाणारी माणसे) व गुलाम याच्या स्थितीमधील आहे व तिला सोईकरता दास्य किंवा गुलामगिरी असें म्हणतां येईल, मात्र शेत—गुलाम किंवा गुलाम यांना असलेली शारीरिक स्पर्शाची परवानगीही या लोकाना नाही हे ध्यानांत घ्यावयास हवे याहूनही अत्यंत वाईट गोष्ट ही की, त्या लोकाच्या अस्पृश्यतेमुळे त्याच्यावर गुलामगिरी जबरीने लादली जाते व मनुष्यजातीबरोबर मिसळून वागण्याच्या मार्गांत एक मोठाच कोलदांडा घातल्यासारखे होते या दोन गोष्टीचे परिणाम सार्वजनिक जीविततील सापत्न भावावरच थांबत नाहीत, तर त्यामुळे त्याना जीवितात नशीब काढण्यास इतरास असलेली सधि मिळत नाही; व मानवी जीविताला अत्यावश्यक असे नागरिकाचे मूलभूत हक्कहि त्या वर्गाला नाकारण्यात येतात लोकसख्येत इग्लडची किवा फरान्सची बरोबरी करणाऱ्या व जीवनकलहात अस्पृश्यतेचे लोढणे गळयात बाधलेल्या या लोकाचे मत हिदुस्थानचा राजकीय प्रश्न यथायोग्य सोडविण्याच्या कामी लक्षात घेतलेच पाहिजे अशी मला खात्री वाटते, व म्हणून ते परिषदेला आरभीच समजलेले असावे असा माझा आग्रह आहे

उपरिनिर्दिष्ट मत मला जितक्या सक्षेपाने माडता येईल तितके मी माडीन ते असे आहे हिदुस्थानातील सध्याच्या नोकरशाहीऐवजी नवीन अमलात येणारी राज्यघटना लोकाची, लोकाकरिता व लोकानी चालविलेली अशी असावी अस्पृश्य वर्गाचे हे मत काही काही लोकाना अगदीच अनपेक्षित वाटेल याची मला पूर्ण जाणीव आहे अस्पृश्य वर्ग आणि ब्रिटिश सरकार याचे सबध एका विशिष्ट प्रकारचे आहेत पुराणमतवादी हिंदूकडून आज शतकानुशतके चाललेल्या जुलुमजबरदस्तीपासून आमची सुटका करणारे थोर लोक म्हणून अस्पृश्य वर्गांनी ब्रिटिशाचे स्वागत केले हिंदू, मुसलमान व शीख याच्याशी लढून अस्पृश्यानी ब्रिटिशास हिंदी साम्राज्य जिंकून दिले ब्रिटिशानी परतफेड म्हणून आम्हा अस्पृश्य वर्गांच्या हितसरक्षकपणाची जिम्मा घेतली. दोन पक्षाचे सबध इतके निकटचे असताना, ब्रिटिश सत्तेसबंधाने अस्पृश्य वर्गांच्या मनात वर सागितलेली बुद्धि उत्पन्न व्हावी हा एक अपूर्व चमत्कार आहे. पण

या चमत्काराची कारणें शोधण्यास काही दूर जावयास नको बहुमतवाल्याबरोबर आमचे काय व्हावयाचे ते होईल एवढ्याच केवळ विचाराने आम्ही हे लोकसत्तेचे मत पत्करले नाही कारण, बहुसख्याक व मी ज्याच्यासबधी बोलत आहे ते अल्पसख्याक याची मैत्री कितपत आहे हे आपण जाणताच आम्ही पत्करलेले हे मत स्वतत्र विचारावर आधारलेले आहे केवळ आमच्याच परिस्थितीच्या दृष्टीने सध्याच्या राज्यपद्धतीचा अभ्यास केल्यानतर, सध्याच्या राज्यपद्धतीत उत्तम राज्यपद्धतीतील काही मूलभूत तत्त्वाचा समावेश झाला नाही ही गोष्ट आमच्या लक्षात आली आमच्या सध्याच्या परिस्थितीची ब्रिटिश-पूर्व कालातील हिदु समाजामधील आमच्या स्थितीशी तुलना केल्यास असे दिसून येते की, आमची प्रगति म्हणजे प्रगति नसून आम्ही जागच्या जागीच पाय वर खाली करीत आहो ब्रिटिशाच्या-पूर्वी आमच्या अस्पृश्यतेमुळे आमची स्थिति अत्यंत किळसवाणी होती, तिच्यात फरक पाडण्याकरिता ब्रिटिश सरकारने एक तरी गोष्ट केली आहे काय? त्यावेळी आम्हाला खेड्यातील पाणवठ्यावर पाणी भरता येत नव्हते, ब्रिटिश सरकारने आम्हाला पाणी भरण्याचा हक्क दिला आहे काय? त्यावेळी आम्हाला देवळात जाता येत नव्हते, आता तरी जाता येते का? त्यावेळी आम्हाला पोलीस खात्यात नोकऱ्या मिळत नसत, ब्रिटिश सरकार तरी आम्हास पोलिसाच्या जागा देते का? ब्रिटिशाच्या पूर्वी आम्हाला फौजेत नोकरी करता येत नसे, आता तरी आमच्या करतां ते क्षेत्र मोकळे आहे का? वरीलपैकी एकाही प्रश्नास होकारार्थी उत्तर येणे शक्य नाही इतक्या दीर्घकालपर्यंत आमच्यावर अशी विस्तृत सत्ता गाजविणाऱ्या सरकारने आमचे थोडेफार चांगले केले आहे हे नमूद करण्यास आम्हाला आनंद वाटतो, पण त्यामुळे आमच्या परिस्थितीत मात्र मूलभूत असा काहीएक फरक झालेला नाहीं. केवळ माप घेण्यासाठी एक जुना कोट दला असतां चिध्या शिवून व ठिगळे मारून मोठ्या िलानें त्या जुन्या कोटाबरहुकूम नवा कोट तयार करणाऱ्या एका चिनी शिंप्याची गोष्ट सांगतात; ब्रिटिश सरकारने अगदी तसे केले त्यावेळी सामाजिक व्यवस्था जशी दिसली तशीच स्वीकारून सरकारने आजतागायत ती काळजीपूर्वक अगदी तशीच राखिली आहे ब्रिटिशाची सत्ता सुरू होऊन दीड शतक पुरे झाले असले, तरी आमच्या अगावरील क्षते अजून तशीच आहेत, त्यावर कोणी उपचारहि केलेले नाहीत

## गंभीर स्वरूपाचीं दोन बंधनें

ब्रिटिशावर निष्काळजीपणा किवा सहानुभूतीचा अभाव याचा आरोप करण्यास आम्ही तयार नाही आम्हास इतकेच समजते की, आमचा प्रश्न सोडविण्यास ते सर्वथैव असमर्थ आहेत जर हा सर्व निष्काळजीपणाचाच परिणाम असता तर त्याला इतके महत्त्व देता आले नसते, व त्यामुळे आमच्या भूमिकेमध्येही इतका खोल फरक पडला नसता थोडासा खोल विचार केल्यावर आम्हास असे आढळून आले की, या बाबतीत निष्काळजीपणाचा काही सबध नसून आमचा प्रश्न सोडविण्यास लागणाऱ्या पात्रतेचा अभाव हीच यातील मेख आहे अस्पृश्य वर्गाचे असे मत आहे की, हिदुस्थानात ब्रिटिश सरकारला अडथळा करणारी गभीर स्वरूपाची अशी दोन बधने आहेत पहिले म्हणजे आतर्बंधन, हे राज्यकर्त्यांचा नेसर्गिक स्वभाव, हेतु व फायदे यांपासून उद्भवते या बधनाचा परिणाम असा होतो की, राज्यकर्त्यांना आमच्या समाजामध्ये चालू असलेल्या घडामोडीची खरी किमत अजमावता येत नाही, त्याच्या महत्त्वाकाक्षेकडे ते निष्काळजीपणाने व शत्रुत्वाच्या दृष्टीने पाहतात, आणि त्याच्या शिक्षणासबधाने तर ते उदासीनच होतात या वर सांगितलेल्या गोष्टीत आम्हाला मदत करणे राज्यकर्त्यांना शक्य नाही असे नाही, पण अशी मदत करणे म्हणजे त्यानी आपला नैसर्गिक स्वभाव, उद्दिष्ट हेतु व फायदे याच्यावर बोळा फिरविण्यासारखेच आहे दुसरे बधन बाह्यबधन आहे ते म्हणजे बाह्य प्रतिकाराची सरकारला वाटणारी मरणप्राय भीति.

आज वर्षानुवर्षे अस्पृष्ट वर्गाचे प्राण होरपळून काढणाऱ्या व हिंदी समाजाचे काळीज कुरतडणाऱ्या निंद्य व तिरस्करणीय सामाजिक चालीरीतीच्या हकालपट्टीची जरूरी हिंदुस्थानसरकार पूर्णपणे ओळखून आहे जमीनदार लोक शेतकऱ्याना पिळून काढीत आहेत व भांडवलवाले मजुराना घाणेरड्या परिस्थितीत काम करावयास लावून वर पोटभर जेवूही देत नाहीत, याचीही जाणीव सरकारला आहे तरी पण या पापाविरुद्ध ब्र काढण्याचीही सरकारची छाती झाली नाही, ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे का ? या गोष्टीना मूठमाती देण्यास सरकारला कायदेशीर सत्ता नाही हे तर त्याचे कारण नसेल? छे, छे ! तसे मुळीच नाही सरकार या भानगडी करीत नाही याचे कारण इतकेच की, प्रचलित सामाजिक किंवा आर्थिक घटनेत आपण जर काही उठाठेवी केल्या तर आपण होऊनच जोरकस विरोध उत्पन्न केल्यासारखे होईल, अशी धास्ती सरकारला आहे कुणाला झाला तरी असल्या सरकारपासून काय फायदा होणार ? या दोन बंधनात विकल झालेल्या सरकारच्या अमलाखाली जीविताला उपकारक अशा व्हावयाच्या गोष्टी थबकन राहाव्या हे ओघानेच येते आम्हाला असे सरकार पाहिजे की, त्यातील सत्ताधारी माणसे देशाच्या खऱ्याखुऱ्या हिताकडे कसून लक्ष पुरवितील आम्हाला असे सरकार पाहिजे की त्यातील सत्ताधारी माणसे लोकाची विरोधबुद्धि जागी होऊ न देता, सध्या न्याय व जरूरी या दृष्टीनी ज्याची तीव्र उणीव भासत आहे अशा सामाजिक व आर्थिक सुधारणा निर्भयपणाने ताबडतोब अमलात आणतील हा चमत्कार ब्रिटिश सरकारला केव्हाही दाखविता येणार नाही लोकाचे, लोकाकरिता व लोकानी चालविलेले सरकारच त्या गोष्टी करू जाणे

## आमच्या उद्धारासाठीं स्वराज्य हवें !

अस्पृश्य वर्गांनी उपस्थित केलेले काही प्रश्न व त्याच्या मताप्रमाणे त्याची उत्तरें ही अशी आहेत तात्पर्य, हिंदुस्थानातील नोकरशाहीचे हेतु कितीही उच्च असले तरी आमची विशिष्ट दुःखे निवारण्याच्या कामी तिला काडीभरही हालचाल करता यावयाची नाही आता हे तात्पर्य ऐकायला वाईट आहे, पण आमच्या अभ्यासाचा निष्कर्ष तोच आहे हेही तितकेच खरे आहे आम्ही स्वतःच आमची दुःखे निवारण करू, तशी ती इतर कोणालाही करता येणार नाहीत अशी आमची ठाम समजूत आहे, व आमच्या हातात राजकीय सत्ता मिळाल्याशिवाय आम्हालाही ती गोष्ट करता येणार नाही ब्रिटिश सरकार सध्या आहे तसे असेपर्यंत तिळभरहि राजकीय सत्ता आम्हास मिळावयाची नाही हे उघडच आहे आमच्या उद्धाराला जरूर ती राजकीय सत्ता आमच्या स्वतःच्या हातात येण्याचा स्वराज्यामध्ये मात्र बराचसा संभव आहे

मागासलेल्या वर्गाचे विचार आपल्या समोर मांडताना मी डोमिनियन स्टेटस् हा शब्दप्रयोग योजिलेला नाही मात्र त्यातील गुतागुत मला कळत नाही किंवा अस्पृश्य वर्ग हिंदुस्थानला डोमिनियम स्टेटस् मिळण्याच्या विरुद्ध आहेत म्हणून मी तो टाळला असे मुळीच नाही अस्पृश्य वर्गांना नेमके काय म्हणावयाचे आहे ते त्या शब्दाने व्यक्त होत नाही व म्हणूनच मी तो शब्दप्रयोग योजला नाही ज्या वेळी अस्पृश्य वर्ग संरक्षक बंधनांतर्गत डोमिनियन स्टेटसला मान्यता दर्शवितात त्या वेळी ते एका विशिष्ट प्रश्नालाच अत्यंत महत्त्व देत असतात ! आणि तो प्रश्न हा की, डोमिनियन स्टेटस्चा कारभार कसा चालेल ? राजकीय सत्तेचा मध्यबिंदु कोठे असेल ? त्याचा ताबा कुणाकडे राहील ? अस्पृश्य वर्गांना यात मालकीहक्क मिळेल काय ? अस्पृश्य वर्गांच्या विशिष्ट संबंधाचे असे हे प्रश्न आहेत नवीन अमलात येणारी राज्यघटना विशिष्ट प्रकारची बनविल्याशिवाय आपल्याला त्यात काडीभरही राजकीय सत्ता मिळणार नाही असे अस्पृश्य वर्गांना वाटते या नवीन राज्यघटनेच्या नियंत्रणाचा विचार करताना सामाजिक हिंदी जीवनामधील काही बिकट प्रश्नाकडे दुर्लक्ष करणें योग्य होणार नाही हिंदू समाज म्हणजे अनुलोम पद्धतीची तिरस्कार बुद्धि

व प्रतिलोम पद्धतीची आदर बुद्धि यांवर रचलेल्या जातीची एक उतरंड आहे हे ध्यानांत घ्यावयास हवें या पद्धतीमुळें लोकसत्ताक राज्यपद्धतीचे आधारस्तंभ अशा ममता व बंधुभाव यांच्या वाढीला वावच शिल्लक राहात नाही तसेच देशांतील स्वतंत्र विचार करणाऱ्या लोकांचा वर्ग हा जरी हिंदी समाजाचा एक अत्यंत उपयुक्त व तितक्याच महत्त्वाचा भाग असला, व राजकीय चळवळीचे नेतृत्व पत्करून, सबंध देशाचा कैवार घेऊन हा वर्ग भांडत असला, तरी या वर्गांत समाजाच्या वरच्या थरांतील लोक असतात व ते त्या त्या वर्गाच्या आकुंचित दृष्टीपासून अलिप्त नसतात, इकडेही दुर्लक्ष करून चालण्यासारखे नाही निराळ्या शब्दांत बोलावयाचे तर, आम्ही जोराने एवढेच प्रतिपादतो की नवीन राज्यघटनेच्या यंत्रणामध्ये आमचे मनोगत काय आहे हे पाहिले पाहिजे व त्या यंत्रणाचा या मनोगताशी मेळ घातलेला असावा. नाही तर, आमच्या समाजाच्या दृष्टीने अत्यंत गैरलागू व शेंडाबुडखा नसलेली पण वरून दिसण्यात मात्र प्रमाणबद्ध अशी एकादी राज्यघटनाच तुम्ही निर्माण करून बसाल

या प्रकरणाचा विचार संपविण्यापूर्वी मला आणखी एक मुद्दा मांडावयाचा आहे जेव्हा तेव्हा आम्हांला असे सांगण्यात येते की, अस्पृश्य वर्गाचा प्रश्न हा एक सामाजिक प्रश्न असून त्याचे उत्तर कोठेही असले तरी ते राजकीय क्षेत्रात मात्र खास सापडणार नाही या विधानाला आमची मोठी हरकत आहे स्वतःच्या हातात राजकीय सत्ता मिळाल्याशिवाय अस्पृश्य वर्गाचा प्रश्न आम्हाला कधीही सोडविता येणार नाही अशी आमची खात्री आहे हे जर खरे असेल–तदितर मत सिद्ध करता येईल असे मला वाटत नाही–तर अस्पृश्य वर्गाचा प्रश्न, मी म्हणतो त्याचप्रमाणे, मुख्यत्वेकरून एक राजकीय प्रश्नच आहे व त्या दृष्टीनेच त्याचा विचार झाला पाहिजे राजकीय सत्ता ब्रिटिशांच्या हातातून, आमच्यावर आर्थिक, सामाजिक आणि राजकीय बाबतीत प्रचंड अधिकार गाजविणाऱ्या लोकांच्या हातांत जात आहे हे आम्ही जाणतो स्वराज्याच्या कल्पनेने गतकालीन स्वराज्यात आमच्यावर झालेले जुलूम, जबरदस्त्या व अन्याय याची आठवण ताजी होते, व आगामी स्वराज्यात त्याच्या पुनरागमनाचीहि भीति वाटते तरी पण स्वराज्याचे स्वागत करण्यास आम्हाला आनंद वाटतो आमच्या देशबांधवाबरोबर आम्हालाही योग्य व पुरेशा प्रमाणांत राजकीय हक्क मिळतील या आशेच्या जोरावरच येऊ घातलेल्या अनिवार्य परिस्थितीचे जोखीम उचलण्यास आम्ही तयार झालो आहो मात्र त्याला आम्ही एकाच अटीवर सम्मति देऊ, व ती अट ही की, आमचा प्रश्न सोडविण्यास मुळीच उशीर होता उपयोगी नाही काळ काही तरी घडवून आणील या आशेने आम्ही कंटाळा येईपर्यंत वाट पाहिली आहे इतकी की, आम्हाला अजूनही वाट पाहावयास लावणे माझ्या मते धोक्याचे ठरेल प्रातिनिधिक राज्यघटनेचे महत्त्व वाढावे म्हणून ब्रिटिश सरकारने जे लागोपाठ उपक्रम केले त्या प्रत्येकाच्या वेळी अस्पृश्य वर्गांना पद्धतशीर रीतीने वगळण्यात आले आहे अस्पृश्य लोकांच्या राजकीय हक्काविषयी मुळी विचारच झालेला नाही याचा तीव्र निषेध करून मी, असे स्पष्ट सांगतो की, अशी स्थिति आम्ही यापुढ मुळीच सहन करणार नाही भविष्यकालीन राज्यकर्त्यांच्या सहानुभूतीवर व सदिच्छारूपी चचल वाळूवर आमचा प्रश्न अवलबून ठेवता उपयोगी नाही मुख्य राजकीय प्रश्नाबरोबरच आमचा प्रश्नही निकालात निघाला पाहिजे अस्पृश्य वर्गांचा तरी असाच अट्टाहास का? याची कारणे अगदी उघड आहेत मालकाच्या हातात मालक नसलेल्या माणसापेक्षा अधिक सत्ता असते हे कोणालाही न सागता कळण्यासारखे आहे सत्तावान् माणूस सत्ताहीन माणसाकरता फारच क्वचित् झीज सोसतो हेही आपणापैकी प्रत्येकाला माहीत आहे सत्ता व प्रतिष्ठा यांच्या सिंहासनावर चढून बसण्याकरिता आम्ही आज ज्यांना हातभार लावीत आहोत त्या लोकांचे नवीन घटनेत सामाजिक नुकसान होणार आहे; पण त्यांना पदच्युत करण्याचें हत्यार हातांत

असल्याशिवाय आज जर आम्ही त्यांच्या हाती सत्ता आऊं दिली तर आमचा सामाजिक प्रश्न सोडविण्यास जोराची चालना मिळेल अशी आशा करणे वेडेपणाचे ठरेल उगाच भलता विश्वास उराशी बाळगून आत्मनाश करून घेण्यापेक्षा दूरदृष्टीने शक्य ती आगामी दु खे व सकटे आधी पाहाणेच आम्हाला अधिक परवडते, मग त्याबद्दल लोक आम्हांस किती का नावे ठेवीनात

## आमच्या दौर्बल्याकडे पहा

स्पष्ट शब्दात बोलावे लागत आहे याबद्दल फार वाईट वाटते, पण माझा तरी काय इलाज? अस्पृश्य वर्गांना वाली असा कुणीच उरला नाही आपले राज्य हिंदुस्थानवर का टिकून राहावे हे दाखवावयासाठी मात्र इग्रज सरकारने आमचा उपयोग सारखा करून घेतला आहे हिंदू लोक त्यांना आपलेच म्हणतात, पण त्याना कसलेच हक्क देत नाहीत, व असलेले गिळकृत करतात मुसलमान मात्र आमचे निराळे अस्तित्व मान्य करण्यास मुळीच तयार नाहीत, कारण आम्ही म्हणजे अल्पसख्याकाचा एक निराळा वर्ग असे एकदा ठरले म्हणजे मुसलमानाना मिळणारे खास हक्काचे घबाड आमच्यामुळे थोडे तरी कमी होईल अशी त्याना धास्ती पडली आहे सरकारकडन दडपलेल्या, हिंदूकडून चिरडलेल्या व मुसलमानांकडून दुर्लक्ष केले गेलेल्या आमची स्थिति अत्यत दु.सह झाली आहे माझी खात्री आहे की, आमच्या दौर्बल्याची आता सीमा झालेली असून असे उदाहरण दुसरीकडे कोठेही सापडणार नाही विशेषेकरून या दौर्बल्याकडेच आपले लक्ष वेधावे अशासाठी माझा हा सर्व यत्न आहे

मी या परिषदेला आलो तेव्हा मला वाटले होते की, मतदानाच्या हक्कापुरती तरी वादविवादाची लढाई सपलेली आहे, पण फ्रँचाइज् कमिटीमध्ये माझ्या भ्रमाचा भोपळा फुटला नेहरू रिपोर्टावर सह्या करताना सर्वांनीच आपल्या मनांत कांहीं तरी चोरून ठेविले होतें हें पाहून मी तर आश्चर्यचकित होऊन गेलों ही चोरी इतकी मोठी होती की, प्रांतिक कायदेमंडळाकरितां शेकडा २५ लोकांना मताधिकार देण्यास हिंदुस्थानांतील उदार मतवाद्याचीही संमति मिळणे महा कठिण कर्म होऊन बसले मध्यवर्ती कायदेमडळाच्या निवडणुकीसाठी किती मताधिकार द्यावयाचा हे अजून अज्ञातच आहे. पण, या मताधिकारामुळे आगामी प्रातिक कायदेमडळापेक्षा मध्यवर्ती कायदेमडळ अधिक प्रातिनिधिक होईल अशी आशा निदान मला तरी वाटत नाही मताधिकार इतका मर्यादित केल्यामुळे 'हिंदुस्थानचे भावी सरकार म्हणजे सर्व जनसमूहाचे पण विशिष्ट वर्गांनी चालविलेले सरकार' अशी स्थिति येणे अपरिहार्य आहे असे मला वाटते आमच्या हक्कात बदल व्हावा म्हणजे सुधारणा व्हावी व ज्याच्या मर्यादा आणि सत्ता ही दोनही वाढली आहेत अशा नव्या राज्याचे एक घटक म्हणून आम्हांस योग्य ते सर्व हक्क मिळावे असे आमचे जोराचे मागणे आहे होणारे बदल व सुधारणा कोणत्याही असोत, एकदा जो पाया घातला गेला आहे तो उखडून टाकण्याचे धाष्टर्य कोणासच करवणार नाही अस्पृश्य वर्गांचा प्रश्न हा अगदी निराळ्या स्वरूपाचा आहे ते काय माग तात हे आता कुठे ऐकून घेतले गेले आहे त्याच्या हक्काची अजून चौकशीही झालेली नाही व आता तरी त्याना मोठे घबाड मिळणार असे थोडेंच आहे? दुसऱ्या जातीनी आपल्या सरक्षणाकरता नव्हे तर स्वत च्या हातात सत्ता खेळावी म्हणून अनेक डाव चालविले आहेत मला तर अशी जबर शका येते की, या निरनिराळ्या झुजीमुळे त्याची म्हणजे भाडखोर लोकाची भूक शमविण्याकरता, सरकार, अस्पृश्य वर्गांच्या दुबळेपणाचा फायदा घेऊन त्याचे प्रतिनिधित्वाचे न्याय्य हक्क लुबाडून घेण्यासहि मागेंपुढें पाहाणार नाही

या बाबतीत माझी भूमिका नेमकी काय आहे हे मला पूर्णपणें स्पष्ट केले पाहिजे. आगामी राज्यघटनेमध्ये अस्पृश्य वर्गांना किती हक्क द्यावयाचे हे ज्याअर्थी निश्चित झालेले नाही, त्याअर्थी प्रातिक किंवा मध्यवर्ती सरकारात जबाबदार राज्यपद्धतीची सुरुवात म्हणून राजेसाहेबांचें सरकार जी कोणती योजना जाहीर करणार असे

तीत ही गोष्ट स्पष्ट केलेली असावी की, या दृष्टीने जी सुधारणा व्हावयाची ती निरनिराळ्या जातीच्या समतीनेच झालेल्या ठरावानुरूप व्हावी, अशाकरता की, त्यामुळे अस्पृश्य वर्गाच्या सरक्षणाचा प्रश्न उरणार नाही व त्याचे हक्क आणि हितसंबंध यानाही धक्का लागणार नाही

चालू परिस्थिति किती गभीर स्वरूपाची आहे याची आपणास तीव्र जाणीव करून देणे व यासबधी काय तो एकदा स्पष्ट निकाल मिळाल्याशिवाय आम्हाला कोणत्याही योजनेस मान्यता देता येणार नाही, हे आपल्या नजरेस आणणे हे मी आपले कर्तव्य समजतो असा निकाल जर झाला नाही तर परिषदेच्या पुढील कामात भाग घेण्याची जबाबदारी मला किंवा माझ्या मित्राना स्वीकारता येणार नाही, व आम्ही तिच्याशी असलेला आमचा सबध तोडून टाकू महाराज, असे बोलताना मी आपल्याला, पूर्वी दिलेले वचन खरे करून दाखवा, यापेक्षा अधिक असे काहीच सांगत नाही ब्रिटिश पार्लमेंटच्या प्रतिनिधींनी आपण अस्पृश्य वर्गाच्या हक्काचे व हितसबधाचे सरक्षक असल्याबद्दल कैक वेळा बोलून दाखविले आहे, व ते त्याचे बोलणे म्हणजे मनुष्याचे परस्पर सबध चागले राहावेत म्हणून आपण सुधारलेली माणसे नेहमी ज्या गप्पा झोकून देत असतो त्यापैकी एकादी गप्प नव्हे, असा मला विश्वास वाटतो म्हणून आमचा विश्वासघात होऊ न देणे हे राजेसाहेबाच्या कोणत्याही सरकाराचे पण विशेषत मजूर सरकाराचे आवश्यक कर्तव्य आहे असे मी समजतो आणि मी आपणास हेही सागून ठेवतो की, ज्याची भरभराट आणि मोठेपणा, आमची अवनति व नाश याच्या पायावर उभारलेला आहे व आमच्या हिताहिताशी ज्याचा काहीच सबध नाही अशा लोकाच्या लहरीवर जर आमचा प्रश्न अवलबून ठेवावयाचा असेल तर राजेसाहेबाच्या सरकारने आमचा भयकर विश्वासघात केला असेच अस्पृश्य वर्ग समजतील

अशा तऱ्हेने बोलल्याबद्दल हिंदुस्थानातील राष्ट्रीय प्रवृत्तीचे लोक व देशभक्त मला जातिनिष्ठ म्हणून डिवचतील याची मला पूर्ण जाणीव आहे, पण मला त्याची थोडीच फिकीर आहे ? हिंदुस्थान हा एक विशिष्ट देश आहे व तेथील राष्ट्रीय प्रवृत्तीचे लोक आणि देशभक्त म्हणजे काही निराळेच लोक आहेत स्वजातीयाना लोक माणूसही म्हणण्यास तयार नाहीत ही स्थिति जो उघड्या डोळ्यानी पाहातो, तो हिंदुस्थानातील राष्ट्रीय प्रवृत्तीचा माणूस किंवा देशभक्त होय ते दृश्य पाहूनहि या देशभक्ताची माणुसकी सतापाने उसळून बाहेर येत नाही या विशिष्ट स्त्रीपुरुषाचे अगदी साधेसाधे मानवी हक्क सुद्धा लाथाडले गेले आहेत याची जाणीव त्याला असते, पण त्याचा प्रतिकार करण्याकरिता त्या भल्या नागरिकाची कर्तव्यबुद्धि काही खडबडून जागी होत नाही सार्वजनिक व्यवहार, व्यापार आणि नोकरीधदा यामध्ये सबध वर्गचे वर्ग बहिष्कृत झालेले आहेत हे तो पाहात असतो, तरी पण त्याची न्यायबुद्धि या अन्यायाविरुद्ध चग बाधीत नाही व्यक्ति आणि समाज याना घायाळ करणारे शेकडो अत्याचार या देशभक्तासमोर प्रत्यही घडतात. पण त्यामुळेहि त्याला चेव येत नाही त्याची सारी ओरड सत्तेकरता असते व स्वत ला आणि स्वत च्या वर्गाला अधिक सत्ता मिळावी अशी त्याला हाव असते अशा देशभक्ताच्या मालिकेत माझी गणना होत नाही याबद्दल मी धन्यता मानतो समाजहित आणि कोणत्याही प्रकारच्या मक्तेदारीचा विध्वस ही ज्याची तत्त्वे त्या वर्गाचा मी आहे राजकीय, आर्थिक, सामाजिक अशा सर्व प्रकारच्या आयुष्यामध्ये प्रत्येक व्यक्तीला विशिष्ट महत्त्व आहे हे आमचे तत्त्व प्रत्यक्ष व्यवहारात आणण्याचा आमचा इरादा आहे हे ध्येय गाठण्याकरता प्रातिनिधिक राज्यघटना हा एक उपाय आहे व म्हणूनच मी, आणि अस्पृश्य वर्ग त्या घटनेला इतके विशेष महत्त्व देतो तरी तुमच्या जाहीरनाम्याप्रमाणे प्रातिनिधिक राज्यघटना स्थापन झाली पाहिजे असा जो आग्रह आम्ही चालविला आहे तोहि उपरिनिर्दिष्ट महत्त्वामुळेच तुम्ही आम्हांला असेहि सागाल की अस्पृश्य वर्गांबद्दल आम्हांला फार सहानुभूति आहे त्याला माझें उत्तर असे

आहे की, पूर्ण खचून गेलेल्या लोकाकरिता याहून अधिक भरीव व याहून अधिक स्पष्ट असे काही तरी पाहिजे असते भलभलते तर्क लढविण्या-बद्दल तुम्ही खुशाल माझी कुचाळकी करा, मला एवढेच समजते की उगीच भलता विश्वास उराशी बाळगून आत्मनाश करून घेण्यापेक्षा शक्य ती आगामी दु खे व सकटे आधी हेरून ठेवणेच आम्हास अधिक परवडते

* * *

## महाराष्ट्रांतील मागांनी (मातंगांनी)
# सायमनसाहेबांना पाठविलेला अर्ज

"महाराष्ट्रातील आम्ही मातग समाजाचे पुढारी खाली दिलेला मजकूर आपल्या विचारा-करता आपणाकडे पाठवीत आहो

हिंदू लोक ज्या जातीना अस्पृश्य म्हणून समज-तात त्या दुर्दैवी अस्पृश्य जातीपैकी आम्ही माग अगर मातग जातीचे लोक आहोत आम्ही सख्येने २० लाख असून आमचा धदा दोर वळणे व खेडे-गावातून शेतकऱ्याची पडतील ती कामे करणे हा होय आमची जात १२ जिल्हयातून पसरली आहे आमची सघटित अशी लहानशी सस्थाहि आहे आमच्याजवळ जमिनी नाहीत म्हणून ज्याला थोडा अभिमान आहे तो घ्यावयास कच-रेल अशा, शेतकऱ्यानी अगर ज्याची आम्ही नोकरी करतो त्यानी टाकलेल्या, तुकडयावर आम्ही गुजारा करतो

ही परिस्थिति बदलण्याची वेळ जवळच आली आहे, ती फार लाब नाही आपल्या नजरेस प्रथ-मच ही गोष्ट आणू इच्छितो की, श्रेष्ठ जाती-कडून जी अपमानकारक वागवणक झाली त्या-बद्दल व अस्पृश्यतेमुळे भाग्य काढण्यास सधि मिळाली नाही याविरुद्ध आम्हाला तक्रार करा-वयाची नाही ते आमचे धर्मबाधव आहेत आमची सुधारणा आम्हीच केली पाहिजे याची जाणीव आम्हाला आहे,व तसे आमचे प्रयत्न चालू आहेतच आमच्यावर होत असलेल्या व झालेल्या अन्या-याची जाणीव त्याना होत आहे व त्याचेही तसे प्रयत्न चालू आहेत यामुळे अस्पृश्यतेचा किल्ला दोहो बाजनी उखडला जात आहे तेव्हा केवळ सत्ताधारी सरकारलाच नाहीशा करता येतील अशा आमच्या अडचणी आपल्या नजरेस आम्ही आणू इच्छितो

आम्ही अत्यत दरिद्री आहो व हे आमचे दारिद्रय दिवसेदिवस वाढतच आहे दोर वळून व तसेच काही धदे करून आमचे पोट भरत नाही पुष्कळाना जगणे अशक्यप्राय होऊन बसले आहे शहराकडे कामधदा मिळेल म्हणून जावे तर अजूनपर्यंत कष्टाने जतन करून ठेवलेल्या ससाराची झोपडी मोडून टाकणे शिवावर येते शिवाय लाखो मागाना शहरातून देखील कामधदा मिळेल असे नाही आमची स्थिति तर फारच अनुकप-नीय आहे आम्ही अस्पृश्य जातीत अगदी खालच्या थरात आहो अशीच जर स्थिति कायम राहिली तर आमच्या जातीचे काय होणार हे समजत नाही जरी बहुजनसमाज व शेतकरी वर्ग आम्हास जास्त उदारतेने पोसू लागला तरी आमची आर्थिक परिस्थिति सुधारेल असे आम्हास वाटत नाही अशा स्थितीत आमच्या मताप्रमाणे खालील गोष्टी घडवून आणण्यास आपल्या कमिशनने खटपट केली, तर आमची सापत्तिक स्थिति थोडी सुधारेल अशी आशा वाटते

(१) आमची कुटुबसस्था मोडली जाणार नाही असा धदा आम्हास देणे आधुनिक पद्धती-वर दोर वळण्याचा धदा आम्हास दिल्यास चालेल आधुनिक यत्रसामग्री पुरवून आधुनिक पद्धतीचे ज्ञान देऊन आमच्यातील तरुणाना जर त्यात तरबेज केले व या गोष्टीकरता केतकीची मोठ्या प्रमाणात लागवड करण्याच्या सवलती व जमिनी दिल्या तर या योजनेने आमची सापत्तिक स्थिति सुधारेल

(२) सरकारी नोकऱ्याचे दरवाजे आम्हाला खुले करणे

(३) आमच्यातील होतकरू व शिकाऊ मलाकरिता वसतिगृहाची स्थापना करणे.

(४) सरकारजवळ पुष्कळ पडित जमीन आहे,

ती आम्हास शेतीकरिता सरकारने द्यावी व सारा देण्याची ऐपत येईतो आमचेकडून सारा घेऊं नये

वरील सवलती जर आम्हाला मिळाल्या तर आमची स्थिति सुधारण्याकरता व स्वतःची उन्नति करून घेण्याकरिता व स्पृश्याकडून आमचे सामाजिक हक्क मिळविण्याकरता झगडण्यास आम्हास सामर्थ्य येईल सांपत्तिक स्थिति सुधारली म्हणजे सामाजिक व धार्मिक उन्नति आपोआप होईल, आणि अशी सांपत्तिक स्थिति आम्हास प्राप्त करून देण्यास आपणच समर्थ असल्यामुळे आपणापुढे हा अर्ज ठेविला आहे

वायदडे, सकट, शेडगे, गायकवाड, इगळे, आवळे, अवघडे, काकडे, शेलार, गेडगे, लोखंडे
पुणे १–९–१९२८ "

* * *

रा ब **एस्. सी. राजा,** एम् एल् ए यानी ३१।१०।३१ व १।११।३१ रोजी गुरगाव (पंजाब) येथे अखिल भारतीय अस्पृश्यांच्या परिषदेत अध्यक्ष या नात्याने केलेल्या भाषणातील उतारे –

"निरनिराळ्या प्रांतीय कौन्सिलातून अस्पृश्याना जागा ज्या द्यावयाच्या त्यासंबंधी सरकारचे धोरण अस्पृश्यांच्या हिताला मारक आहे, व हे धोरण सरकारने वेळीच बदलले नाही तर सरकार या मोठ्या समाजाचा आदर व पूज्यबुद्धि गमावील, व या राजनिष्ठ व कायद्याला भिऊन वागणाऱ्या समाजात असंतुष्टता उत्पन्न होण्यास कारणीभूत होईल असे झाले तर ते दोघांनाहि घातुक होईल एवढेच मी नम्रपणे त्यांच्या नजरेस आणू इच्छितो

हिंदुस्थानला ज्या नव्या सुधारणा देण्याचे घाटत आहे त्याना आमचा विरोध नाही जबाबदारीचे, वसाहतींच्या दर्जाचे अगर संयुक्त घटनेचे स्वराज्य दिले तरी त्यास आमची हरकत नाही परंतु स्वराज्यात देशांतील एक पंचमांश लोकाना म्हणजे अस्पृश्याना, समान हक्क व दर्जा प्राप्त न होता केवळ बुद्धिजीवी लोकांचे कल्याण साधणार असेल तर तसल्या स्वराज्याला आमची तीव्र नापसंति व विरोध राहील.

प्रत्येक मनुष्याला जास्तीत जास्त ऐहिक सुख भोगता येईल व जेथे अशा सुखासाधनाची वाढ होण्यास भरपूर वाव राहील, तेथेच खरे स्वातंत्र्य नांदते आहे असे म्हणता येईल स्वातंत्र्य मिळाल्यानंतर बंधुभावाची जोपासना व वाढ झाली नाही तर ती स्थिति असहज व जुलमाची वाटेल परंपरागत धार्मिक सत्तेच्या व रूढीच्या नावाखाली संघटित प्रयत्न करून आर्थिक सत्ता बळकावून श्रेष्ठ जातीच्या लोकानी आजपर्यंत जो जाच व जुलूम केला तो यापुढे आपण सहन करणे शक्य नाही याच धार्मिक रूढीमान्य जुलमात आणखी आता राजकीय वर्चस्वाने प्राप्त होणाऱ्या जुलमाची भर नको

या वरिष्ठ हिंदू जातीनी आपल्याबद्दल पुष्कळ पोकळ सहानुभूति दाखविली ! अस्पृश्य आपलेच देशबांधव असून आपल्याच हाडामासाचे आहेत असे यानी वेळोवेळी उद्गार काढले ! पण हिंदुधर्माला लागलेला हा काळा डाग धुवून काढण्याकरता यानी काय केले ? तर पशूपेक्षा हीनतेने त्यानी आपल्याला वागविले ! अजूनही राजरस्त्यावर फिरकण्याची आपल्याला मोकळीक नाही ! सार्वजनिक पाणवठ्यावर आपणांस पाणी भरू देत नाहीत, आपल्या मुलाना शाळातून शिक्षण घेऊ देत नाहीत, सार्वजनिक धर्मशाळा वगैरेतून आपल्याला क्षणभर विश्रांतिहि घेऊ देत नाहीत! मूर्तींच्या पूजेकरताहि आपल्याला देवळात प्रवेश नाही व सार्वजनिक समारंभात भाग घेऊ देत नाहीत आपण वेद वाचावयाचे नाहीत अगर आपली प्रेते या श्रेष्ठ हिंदूंच्या स्मशानात जाळायची अगर पुरावयाची नाहीत आणि असे म्हणतात की, हिंदूंच्या स्वर्गांत देखील अस्पृश्याना जागा नाही! असे असूनही, अस्पृश्य हिंदू अशीच चिठी त्यांच्या कपाळावर मारली जाते! अशी चिठी कपाळावर मारली असली तरी आम्ही व आमची सारी जात हे स्वतंत्र लोक, जमात आहे

इंग्लंडमध्ये आमच्याबद्दल भ्रामक कल्पना पसरविल्या जात आहेत. वर्तुळ परिषदेत महात्मा गांधींनी असे म्हटल्याचे सांगतात की, राष्ट्रीय

सभा अगदी पहिल्यापासून अस्पृश्यांची सर्वतोपरी काळजी घेत आहे, राष्ट्रीय सभेचे धोरण अस्पृश्यता निवारणाचे असून तत्प्रीत्यर्थ अनेक प्रयत्न झाले व होत आहेत. अस्पृश्याच्या कल्याणाची काळजी राष्ट्रीय सभेने वाहिली व अस्पृश्यता-निवारणाची जबाबदारी अगावर घेऊन राष्ट्रीय सभेने सर्व देशभर चळवळ केली ही सर्व विधाने साफ खोटी आहेत असे मी म्हणतो

राष्ट्रीय सभा अस्तित्वात आली त्याला ४६ वर्षे झाली, या सभेने अस्पृश्यतानिवारणाचा ठराव पास केला त्याला अजमासे दहा वर्षे झाली, आणि महात्मा गाधींनी राष्ट्रीय सभेच्या विधायक कार्यक्रमात खादीप्रसार व दारूबदी याबरोबरच अस्पृश्यता निवारण या बाबीचा समावेश अगदी अलीकडे केला मला म गाधींना असे विचारावेसे वाटते की, राष्ट्रीय सभेच्या अनुयायानी खादीप्रसाराप्रीत्यर्थ जितका वेळ व पैसा खर्च केला त्याच्या एकशभराश वेळ व पैसा त्यानी अस्पृश्यतानिवारणाच्या कार्याकरता खर्च केला काय ? खादी प्रसाराची चळवळ चागली आहे पण गिरणी कापडाशी टक्कर देण्यास ती असमर्थ असल्यामुळे, राष्ट्रीय सभेने त्या एका कार्यावर भर न देता अस्पृश्यता निवारणावर आपले सारे सामर्थ्य वेचले असते तर मला वाटते स्वराज्याचे हक्क आपल्या पदरात पडण्यास फार वेळ लागला नसता

काही विवक्षित कपूंच्या हातांत राज्यसूत्रे जाण्याऐवजी खरेखुरे स्वराज्य मिळावे अशी जर म गाधींची प्रामाणिक इच्छा असती तर गांधींनी राष्ट्रीय सभेच्या द्वारे अस्पृश्यता निवारणाचे कार्य हाती घेऊन त्याची कड लावावयास हवी होती "अस्पृश्यतेचा हिंदु धर्मावरील हा डाग जितक्या लवकर धुतला जाईल तितक्या लवकर हिंदुस्थानला स्वातत्र्य मिळेल" "अस्पृश्यता न घालविता जर स्वराज्य मिळाले तर दुसऱ्याच महिन्य न नाहींसे होईल," आणि "ही सुधारणा स्वराज्यापूर्वीच झाली पाहिजे" असा अट्टाहास जर म गाधींनी धरला होता व आहे, तर खादी-प्रचाराचे ते अचाट प्रयत्न, त्या अवाढव्य सस्था व सघटना व मोठा फंड त्यानी कां जमवला ? खादीप्रसाराकरिता साऱ्या देशभर चळवळीची धुमश्चक्री कां माजविली? या खादीच्या नगाऱ्यापुढे बिचाऱ्या अस्पश्यता निवारणाची टिमकी वाजली नाही! आणि कोण वाजविणार ? व्यासपीठावरून समभाव, बधुत्व यावर लाब लाब व्याख्याने झोडणारे राष्ट्रीय सभावाले लोक कोठे गेले ? राष्ट्रीय सभेच्या चळवळीच्या कार्यक्रमात सामाजिक सुधारणेची एकादी बाब अतर्भूत केली आहे काय, असे मी विचारतो राष्ट्रीय सभेची अस्पश्याबद्दलची ही सहानुभूति दिखाऊ व वरवरची असून जगाच्या डोळ्यात धूळ फेकण्याचे प्रयत्न ती करीत आहे, यापलीकडे त्यात काही नाही

तसे जर नसते तर "आधी अस्पृश्यता निवारण व मग स्वराज्य" असे एका बाजस म्हणत असताना दुसऱ्या बाजूने केवळ स्वराज्य मिळविण्याचे प्रयत्न म गाधी का करीत आहेत ? त्यानी आपली सर्व शक्ति व वेळ अस्पृश्यता निवारणाच्या कार्याला का देऊ नये ?

म० गाधीसारख्या अद्वितीय पुढाऱ्याने अस्पृश्यता निवारणाकरता साऱ्या देशभर चळवळीची धुमश्चक्री उडवून दिली असती तर तो एक मोठा चमत्कार झाला असता यात शका नाही मिठाचा कायदा मोडण्याकरता दाडीला जाणाऱ्या सत्याग्रही गाधींचे चित्र आपल्या डोळ्यापुढे उभे करा, त्याप्रमाणेच तुरुगात घालण्याच्या भीतीने अस्पृश्याना देवळे बद करणाऱ्या लोकाविरुद्ध अगर जुन्या व पवित्र देवळात अस्पृश्याना प्रवेश मिळवून देण्याच्या निश्चयाने म गाधींनी मोहीम काढली आहे असे चित्र डोळ्यापुढे उभे करा नसती कल्पना करून काय उपयोग ? म गाधींना अशी मोहीम काढण्याची कल्पनाहि आली नाही याबद्दल मला वाईट वाटते कोणी म्हणतील अशा मोहिमेत दाडीच्या मोहिमेचे गाभीर्य दिसले नसते व देवालयावरील ही मोहीम अयशस्वी झाली असती, पण मी म्हणतो की, ही अयशस्विता इतिहासात नमूद करून ठेवण्यासारखी

झाली असती इतके महत्त्व तिला प्राप्त झाले असते आणि माझें असे म्हणणे आहे की, अस्पृश्यता निवारणाचे ध्येय डोळ्यापुढे ठेवून म. गाधीसारखा पुढारी देवालयावर अस्पृश्याना दरवाजे उघडून वाट मिळवून देण्याकरिता मोहीम काढू लागला तर त्याला अपयश का यावे ? सनातनी लोकाचा तिरस्कार व द्वेष पतकरूनहि या महात्म्यानी देवालयप्रवेशाची चळवळ हाती घ्यावयास पाहिजे, मग त्यात त्या महात्म्याचे प्राण गमावले तरी त्याची फिकीर त्यानी केली नसती ! अस्पृश्यता निवारणाचे कार्य प्राण देऊनहि करावयास पाहिजे इतके ते थोर व पवित्र नाही का ?

नवीन सुधारणेमुळे कौन्सिलाची सत्ता वाढेल व लोकाना जास्त हक्क मिळतील असे मी अनेकदा बोलून दाखविले आहे माञ हे हक्क आपल्यावर जुलूम करणाऱ्याच्या हाती जाणार नाहीत याबद्दल खबरदारी घेतली पाहिजे नाही तर त्याच्या हाती आपल्यावर जुलूम करण्याकरिता हे हक्काचे व सत्तेचे नवीन शस्त्र दिल्यासारखे होऊन त्याखाली आपण उखडले जाऊन त्यातून सुटण्याकरिता आपणास बडच उभारावे लागेल अशीही अडचणीची परिस्थिति निर्माण न होईल याबद्दल आपण काळजी घेतली पाहिजे "प्रथम स्वराज्य मिळवू व नतर आपआपसातील तटे मिटवू अगर अस्पृश्यतानिवारणाचे पाहू," हे बोलणे दिसायला फार चागले आहे माल वाईट लागला तर पैसे परत म्हणणाऱ्या बाजारी वाण्याच्या बोलण्यासारखे हे बोलणे आहे एकदा पैसा हाती आला म्हणजे तो वाणी सोडत नाही, त्याप्रमाणेच स्वराज्य मिळाल्यानतर हे लोक अस्पृश्यतेबद्दल एक शब्दही बोलणार नाहीत आणि मग आपणावर नुसती पश्चात्ताप करण्याची पाळी येईल

राज्यकर्त्यांविषयी बोलताना म गाधी "अत - करणांत बदल" पाहिजे असे नेहमी म्हणतात तद्वत् स्पृश्य हिदूच्या अत करणात आपल्याविषयी बदल झाल्याची अगर होण्याची वेळ अजनपर्यंत आली नाही काय ? मला तर तशी चिन्हे कांही दिसत नाहीत !

म गाधीना वाटले की शीख–मसलमानाचा तटा मिटवला की स्वराज्याचा मार्ग सुकर झाला पण ही त्याची चूक आहे असे मला वाटते शीख-मुसलमानाच्या मागणीतल्या न्याय्यपणापेक्षा आमच्या मागण्या कमी न्याय्य आहेत असे का त्याना वाटते? हिदू–मुसलमानातील तटा मिटावा असे सर्वांप्रमाणे मलाहि वाटते पण इतर हिदूनी आजपर्यंत अस्पृश्यावर गाजविलेल्या जुलमाचे व अत्याचाराचे काय ? त्याचा जाब कोण देणार?

शीख–मुसलमानाच्या तक्रारीत सत्याश असेल, पण अस्पृश्याच्या तक्रारी तितक्याच खऱ्या आहेत असे असूनहि म गाधीनी आमच्यावर होत असलेल्या अन्यायी जुलमाकडे दुर्लक्ष केले आहे हिदु–मुसलमानाचे तटे फक्त पजाब–बगाल पुरतेच आहेत, पण अस्पृश्यावर तर साऱ्या हिदुस्थानभर जलूम चालला आहे शीख लोक २० लाख आहेत तर अस्पृश्य ५ कोटी आहेत या अल्पसख्याक लोकावर सामाजिक अन्याय असे होत नाहीत, तर अस्पृश्यावर त्याचा कहर चालला आहे राजकीय हितरक्षणार्थ शीख–मसलमानापुढे हिदूनी नमते घ्यावे, आणि राजकीय व सामाजिक हक्काची समानता मिळावी म्हणून झगडणाऱ्या अस्पृश्याकडे याना नुसते पहाण्यास वेळ नाही! कोणत्याही अल्पसख्याक जातीपेक्षा आमच्या जातीचा प्रश्न महत्त्वाचा आहे सरक्षणाची जर खरोखरीच कोणाला जरूरी असेल तर ती आम्हालाच असे असूनहि सामाजिक सुधारणेचे कळकळीचे पुरस्कर्ते असे म गाधी वर्तुळ परिषदेत असे बोलले की, अस्पृश्याना स्वतत्र मतदार सघ दिल्यास ते नाहीसे करण्याकरता मी आपले प्राण पणास लावीन पण तेच महात्मा गाधी आम्हाला जे पाहिजे ते मुसलमानास व शिखास देण्यास तयार आहेत! आम्हाला स्वतत्र–मतदार–सघ तात्पुरते पाहिजे आहेत. तर म गाधीनी आमच्यावर मिश्रमतदार–सघ लादण्याचा अट्टाहास चालविला आहे आमची दुःखे

काय आहेत ही म. गाधीना समजणे शक्य नाही. जोडा कोठें चावतो हे जो घालतो त्यालाच कळते.

म गांधी सदय अत करणाचे, कनवाळू वृत्तीचे गृहस्थ असून ते आज जगाला वद्य आहेत व्यक्तिश मला त्यांच्याबद्दल आदर आहे वर्तुळ–परिषदेला ते राष्ट्रीय सभेचे प्रतिनिधि म्हणून गेले आहेत राष्ट्रीय सभेच्या धोरणाने त्याचे हात बाधले आहेत व म्हणून ते अस्पृश्याच्या हिताला विरोध करीत आहेत, की व्यक्तिश त्याना अस्पृश्याचा समावेश मिश्र मतदारसघात व्हावयास पाहिजे हे समजणे कठीण आहे परतु व्यक्तिश गाधी हे कितीही मोठे असले तरी राजकारणी गाधीबद्दल हुशार रहा असा मी इशारा देऊन ठेवितो

माझे व गाधीचे काही भाडण नाही आणि आपल्याला सध्या त्याच्याशी काही कर्तव्य नाही अस्पृश्याकरता कौन्सिलातून काही जागा राखून ठेवून अस्पृश्याचा अतर्भाव मिश्रमतदारसघात करावा अशा मताचे डॉ आबेडकर असूनहि त्यानी आपले हे वैयक्तिक मत बाजूला ठेवून ज्या अस्पृश्याचे प्रतिनिधी म्हणून ते गेले आहेत त्याचे मत ते वर्तुळ–परिषदेत मोठ्या उत्साहाने दर्शवून, स्वतत्र मतदारसघाकरता गाधीनाही ते जो जोराचा विरोध करीत आहेत त्याबद्दल मी त्याचे अभिनदन करतो येथून पुष्कळशा अस्पृश्य सस्थानी त्याच्या या धोरणाला तारा पाठवून पुष्टि दिली व पसति दाखविली आहे हे फार चागले झाले

आपले हित व हक्क, आपली लोकसख्या, आपले राजकीय महत्त्व व सामाजिक वैगुण्ये इतक्या बाबी लक्षात घेतल्या म्हणजे कायदे–मडळात आपले प्रतिनिधी हमखास निवडून यावेत, म्हणून आपल्याला स्वतत्र मतदारसघच हवेत व त्याकरता आपण प्रयत्न केला पाहिजे आपणास स्वतत्र मतदारसघ मिळाला पाहिजे व तो आपला हक्क आहे आणि त्याकरता आपण भाडले पाहिजे या सघातून निवडून गेलेल्या प्रतिनिधीनाच आपली दुःखें व अडचणी काय आहेत ती सरकारच्या कानावर योग्य रीतीने व परिणामकारक रीतीने घालतां येतील.

मिश्र मतदारसघात अस्पृश्यांचा समावेश झाल्यास त्यांचा प्रतिनिधी कायदेमडळांत निवडून जाणे जवळजवळ अशक्य आहे इतर लोक त्यांच्या ऐवजी त्याची जागा अडवतील अगर एकादा अस्पृश्य गेला तर तो स्पृश्याच्या हातचे खेळणे होऊन राहील! आपल्या हितरक्षणार्थ व आपल्या हक्कसपादनार्थ स्वतत्र मतदारसघ पाहिजेत, याबद्दल शका नाही

परतु काही काळ गेल्यानतर अस्पृश्यास जर अशी खात्री वाटू लागली की स्पृश्य हिंदू, बहुमतवाले, हे आमच्या हक्कावर गदा न आणता आमच्या हितसरक्षणार्थ आपलेपणाने प्रयत्न करीत आहेत, तर आम्ही मिश्रमतदारसघाला मान्यता देऊ. पण ही गोष्ट ध्यानात धरावयास पाहिजे की, ३७ सस्थानी आपल्या साक्षी इडियन स्टॅटयूटरी कमिशनपुढे दिल्या, त्यापैकी ३५ सस्थानी स्वतत्र मतदारसघ पाहिजेत असे सागितले नेहरू–रिपोर्टांतहि या जातीला स्वतत्र मतदारसघ द्यावेत असे प्रथम म्हटले, पण पुढे असे मतदार सघ देणे देशाचे हिताचे नाही असे सागून मतदारसघाची शिफारस फेटाळन लावण्यात आली तामील–नाडू कॉंग्रेसचे अध्यक्षाची अस्पृश्याच्या स्वतत्र मतदारसघाला मान्यता आहे ही गोष्ट मी आपल्या नजरेस आणू इच्छितो

सरकारने अस्पृश्याचे प्रतिनिधी कायदेमडळातून नेमावेत ही पद्धति यापुढे कायमची नष्ट होणार आहे अस्पश्याना राजकीय हक्काची जाणीव व्हावी व त्यानी आपली राजकीय जबाबदारी हळुहळू ओळखण्यास पात्र व्हावे म्हणून राजकीय प्रगतीची पहिली पायरी म्हणून त्याना स्वतंत्र मतदारसघ देऊन आपले प्रतिनिधी निवडण्याची सधि देणे योग्य आहे हे हक्क पदरी पाडून घेण्याकरिता बाजूला उभे राहून अस्पृश्यानी हिंदु–मुसलमानाचे भाडण न पाहता आपले हक्क सपादण्याकरता हिंदूशी झगडण्याकरिता मुसलमान, ख्रिस्ती अगर अँग्लोइडियन याच्याशी एक होऊन झगडा केला पाहिजे मिश्र–मतदार–सघ आपणात एकी व्हावी म्हणून आपल्यावर लादले

जाणार नसून आपल्यावर निरंतरचा अव्याहत जुलूम करता यावा, म्हणून मिश्रमतदार–सघ आपणावर लादण्याचे स्पृश्यांचे प्रयत्न चालले आहेत

लोकसख्येच्या प्रमाणात प्रातीय व वरिष्ठ कायदेमंडळांत अस्पृश्याना जागा मिळाल्या पाहिजेत, इतकेच नव्हे तर मी असेहि म्हणतो की, जरा जास्त जागा मिळाल्या तर त्या जरूर द्याव्यात शिवाय मत्रिमडळात अस्पृश्याचे प्रतिनिधी सरकारने घ्यावेत

मतदानाच्या हक्काचा विचार करता अस्पृश्याच्या बाबतीत हा अधिकार वयात आलेल्या सान्या अस्पृश्य स्त्री–पुरुषाना द्यावा या मताचे आपण आहोतच पण सध्या ते शक्य नाही व म गांधीनाही तसेच वाटते तरीहि अस्पृश्याना स्वतत्र मतदारसघ देण्यास ते विरुद्ध आहेत सध्यांच्या परिस्थितीत मत देण्याची जी लायकी ठरविली आहे त्याचे प्रमाण उतरवून मतदाराची सख्या दुप्पट होईल असे करावे व अशी सख्या वाढवितां वाढविता काही कालाने सर्व वयात आलेल्या स्त्री–पुरुषाना मतदानाचा अधिकार मिळेल अशी योजना करून ठेवावी सापत्तिक दृष्ट्या आधीच खालावलेल्या समाजात मतदानाच्या अधिकाराची पात्रता ठरविण्याकरिता " स्थावर इस्टेट असणें " ही कसोटी लावणे योग्य नाही तरी पण त्याबरोबरच सध्या तरी ज्याला लिहितां वाचता येते अशास मताधिकार देण्यास हरकत असूं नये असे माझे मत आहे लोकसंख्येच्या प्रमाणांत कायदेमडळात प्रतिनिधित्व मिळेल अशी काही तरी योजना फ्रँचाइज कमिटीने हुडकून काढावी अशी जी सूचना करण्यात आली आहे ती मला मान्य आहे

व्यक्तीचा धर्म, जातगोत, रग, वश, काय वगैरे गोष्टीचा विचार सरकारी नोकरीत घेताना पहावयाचा नाही असा नियम असतांनासुद्धां अस्पृश्यांना नोकऱ्या दिल्या जात नाहीत सायमन कमिशनच्या रिपोर्टांत तर असे नमूद केले आहे कीं, अस्पृश्यांना अस्पृश्य म्हणन मुंबई, पजाब, बगाल, यू पी, आसाम या प्रांतातून पोलीस खात्यात घेतले जात नाही तर यापुढे न्यायाला स्मरून म्हणून तरी लहानमोठ्या नोकऱ्यावर सर्व खात्यातून सरकारने अस्पृश्याच्या नेमणुका कराव्यात " वगैरे

* * *

### भारतीय अस्पृश्य समिती व सोमवंशी संस्था यांचें संयुक्त पत्रक —

आमची राजकीय व आर्थिक स्थिति सुधारावी म्हणन सरकारने आम्हास मदत करावी असे आम्ही म्हणत असताना देशाच्या रक्षणाची जबाबदारी आम्ही घेतली आहे व घेतो आहोत, हे आम्ही विसरणे शक्य नाही ज्या दिवशी पेशव्याचे राज्य जाऊन इग्रजाचे राज्य आले त्या दिवसापासून आम्हास आमची वीरवृत्ति व लढाऊ वृत्ति दाखविण्याची सधि मिळाली हिंदी लष्करात आम्हास नोकऱ्या मिळाल्या व पुष्कळाना तदनुषगिक धदे मिळाले

आमच्या लढाऊ वृत्तीबद्दल मध्यभाग कमिशनर मि माटफोर्ड यानी कायदेमडळात धन्योद्गार काढून आमच्या जातीने दाखविलेल्या शौर्याचा उल्लेख केला मूठभर महाराच्या फौजेनिशी कोरेगावला पेशव्याच्या अफाट सैन्याशी इग्रजानी टक्कर देऊन जय मिळविला याचे स्मारक कोरेगावला उभे केले आहे त्यावर शूर महाराची नावे कोरली आहेत मि माटफोर्ड साहेबानी वरील शब्दात महाराच्या शौर्याचा गौरव केला

अलीकडे लष्करातील अधिकाराच्या जागावर हिंदी लोकाची नेमणूक करावी अशाबद्दलचे प्रयत्न चालू असून काहीना अधिकाराच्या जागा दिल्या आहेत आमची हीन स्थिति लक्षात घेतली असता आम्हास असे वाटते की, आमची लढाऊ जात वगळून इतराना सैन्यात घेणें बरोबर होणार नाही या हिंदीकरणाला आमचा विरोध आहे लष्करात उच्चवर्णीय हिंदू उच्च जागा एकदा पटकावून बसले म्हणजे तेथें अस्पृश्याना मुळीच वाव मिळणार नाही त्यांनी फार तर या अधिकारी स्पृश्याची लाकडें फोडावी. या

हिंदी अधिकाऱ्यापेक्षा युरोपियन अधिकारी फार बरा त्याला स्पृश्यअस्पृश्य हा भेद नाही नेहमीच युरोपिअन अधिकारी मिळतील असे नाही पण या सक्रमणकालात आम्हाला लष्करी अनुभव येईतोपर्यंत तरी तेच अधिकारी असावेत असे आम्हास वाटते, आम्ही आधीच मागासलेले व हीन दर्जाचे व शिक्षणाच्या सवलती नुकत्याच कोठे आम्हास मिळू लागल्या आहेत अशा स्थितीत आमच्या बाबतीत नोकरीला जरूर असलेली वयाची मर्यादा वाढवावी नोकऱ्या देण्याच्या बाबतीत अस्पृश्य उमेदवाराचा आधी विचार करावा हे योग्य होईल इ इ

* * *

अखिल भारतीय परिषदेचे अध्यक्ष **श्री. एम. व्ही. भाग्यारेड्डी,** हैदराबाद, यानी जे अध्यक्षीय भाषण केले त्याचा गोषवारा लखनौ २७–९–३१

गेली कित्येक शतके वरिष्ठ जातीचा आपणा आदिहिंदूवर होत असलेला व झालेला जुलूम व आपल्याशी झालेली अतिनिष्ठुरतेची वर्तणूक याचा इतिहास वर्तुळ परिषदेला गेलेल्या सर्वांना परिचित असावा असे मी धरून चालतो आमच्यात असलेली वैगण्ये व आमच्या जातीची अवनति याला कारण सामाजिक अगर धार्मिक स्वरूपाचे नसून ते राजकीय स्वरूपाचे आहे हे सागावेसे वाटते हल्ली ज्याना वरिष्ठ हिंदू असे म्हणतात त्याचे पूर्वज बाहेरून जेव्हा हिंदुस्थानात आले तेव्हा राजकीय व आर्थिक वर्चस्वाकरिता त्याच्यात व येथील मूळच्या रहिवाशात म्हणजे आदि हिंदूत भयकर लढा झाला व या लढ्याचे पर्यवसान अस्पृश्यतेत झाले

हे आर्य येण्यापूर्वी आपण या देशाचे मालक होतो आपण त्या वेळेस प्रबल सत्ताधारी होतो आपले सामर्थ्य अचाट होते पौर्वात्य व पाश्चिमात्य इतिहासकारानी असे सिद्ध केले आहे की, या आर्यांना आपण जिंकले होते इतकेच नव्हे तर हे आर्य लोक कित्येक शतके आपले दास होते

जेत्यांना आपले वर्चस्व कायम टिकावे असे वाटतें व या लोभापायी त्याचे जित लोकाना कायमचे दास्यात ठेवण्याचे प्रयत्न चालू असतात असे प्रयत्न चालले असतांनासुद्धां जित लोकानी आपले स्वातंत्र्य पुन्हां मिळविल्याची उदाहरणे आहेत. पण आदिहिंदूना आर्यांनी जेव्हां जिंकले तेव्हा त्याना कायमचे दास्यात ठेवण्याकरता त्यानी ज्या युक्त्या योजिल्या त्या मात्र खरोखर आश्चर्य करण्यासारख्या आहेत त्या वेळी जिकलेल्या लोकानाच नव्हे तर त्यांच्या पुढच्या पिढ्यानासुद्धा कायम दास्यात ठेवण्याकरता या आर्यांनी युक्ति शोधून काढिली! प्रथम त्यानी या जित लोकाना –आदिहिंदूना ज्ञानाचे दरवाजे बद केले ! पूर्वजन्मानुसार परमेश्वरानेच जित हे अत्यज केले आहेत अशी भोळी भावना त्याच्या हृदयात उत्पन्न केली ! आणि जर या नीच स्थितीतून वर येण्याचे प्रयत्न अत्यजानी केले तर अत्यज नरकात जातील अशी धार्मिक भीति आमच्यात या लोकानी उत्पन्न केली! अशा रीतीने आपण या अस्पृश्यतेच्या गर्तेत कायमचे येऊन पडलो आहोत लक्तरे आगावर पाघरून उपाशी पोटाने आपण आपले कष्टमय जीवित कठीत आहोत आपल्याला राजरस्त्यावर फिरण्याची मनाई आहे सार्वजनिक पाणवठे आपल्याला बद आहेत देवळातून आपल्याला प्रवेश नाही धर्मशाळातून उतरण्यास आपणास बदी आहे इतकेच नव्हे तर आपली प्रेते पुरण्याकरिता आपणास टीचभर जागा हवी असेल तर या वरिष्ठ जातीच्या तोडाकडे आपणास पहावे लागते.

या इग्रजी अमदानीतच आपल्याला ज्ञानभाडार खले झाले ईश्वरनिर्मित नव्हे तर मानवनिर्मित या अवनत स्थितीचे ज्ञान आपणाला या शिक्षणाने प्राप्त होऊन आपले डोळे उघडले. स्वातत्र्य, समता व बधुभाव या उच्च ध्येयाने प्रेरित झालेल्या या पाश्चिमात्य लोकाचा व आपला सबध आला नसता तर अस्पृश्यता हा हिंदुधर्मावरील डाग आहे ही गोष्ट स्पृश्याना समजली असती का नाही याची वानवाच आहे या उदारधोरणी इग्रजाचा राज्यकर्ते म्हणून हिंदुस्थानशीं सबध आला म्हणूनच स्पृश्याना या अस्पृश्यतेबद्दल शरम वाटू लागली आहे

जित राष्ट्राचे प्रतिनिधी म्हणून काही लोक

राष्ट्रीय हक्क मिळविण्याकरितां विलायतेला गेलेले आहेत. पण आम्हां अस्पृश्याचा त्याना असा सवाल आहे की, आम्हाला वगळून राष्ट्राचे प्रतिनिधी म्हणून जाण्याचा तुम्हांला कोणता हक्क आहे ?

सर्वतोपरी स्पृश्याची अशी जी राष्ट्रीय सभा, तिने आमच्या उन्नतीचे कोणते प्रयत्न केले? ज्याना लीलेने चिरडता येईल अशा आपणा अस्पृश्याना बाजूला सारून मुसलमान व शीख समाजाना वाजवीपेक्षा जास्त हक्क देण्यास ही राष्ट्रीय सभा तयार आहे! यावरून अस्पश्यावर कायमचे वर्चस्व ठेवण्याचे राष्ट्रीय सभेचे धोरण आहे असे आपण का म्हणू नये ?

हिंदू जातीत जी असमानता दिसते आहे ती नाहींशी व्हावी म्हणून समतेच्या व न्यायाच्या दृष्टीने मतदानाचा अधिकार वयात आलेल्या सर्वांना द्यावा असे तत्त्व हे स्पृश्य प्रतिपादीत आहेत अशा मानभावीपणाच्या गोष्टी आता आम्ही ऐकून घेणार नाही धर्माच्या खुळचट कल्पना आमच्या माथी मारून आम्हाला आजपर्यंत पायी तुडविले ते आता पुरे झाले आमच्याबद्दल सहानुभूतीचा नसता उमाळा स्पृश्याना आताच का आला ? अस्पृश्याच्या दु खानी आमची मने विदीर्ण होऊन आम्हाला त्याच्या उन्नतीच्या प्रयत्नात यश यावे म्हणून राजकीय हक्क मिळविण्याकरिता झगडावे लागत आहे, असा देखावा हे स्पृश्य केवळ जगाच्या डोळ्यात धूळ फेकण्याकरता करीत आहेत हे विसरू नका वयांत आलेल्या साऱ्या हिंदूना मत देण्याचा अधिकार मिळाला तर अस्पृश्याचे त्यामुळे कोणते हित साधणार आहे ? आम्ही साऱ्या देशभर पसरलो असून प्रत्येक ठिकाणी आमची सख्या फार कमी आहे. अस्पृश्यतेचा शिक्का आमच्या कपाळी आधीच मारला असल्यामुळे निवडणुकीत आम्हास भाग घेता येणार नाही शिवाय आमच्यात ज्ञानाचा गडद अंधःकार इतका आहे की, आमच्यातील एकहि माणूस कायदेमंडळांत आमच्यातर्फे निवडला जाईल कां नाही याची शंका आहे मात्र गेल्या निवडणुकीत कांही प्रांतांत ज्याप्रमाणें काही दयाळू राष्ट्रीय सभेच्या अनुयायानी आमच्यातील अस्पृश्य पुढाऱ्याना निवडून येणे शक्य केले त्याप्रमाणे पुढेहि होऊ शकेल पण ही त्याची व त्याच्या सामर्थ्याची घमेड होती हे विसरू नका सरकारला खिजविण्याकरिता म्हणून आम्ही एकादा झाडूवाला सुद्धा कायदेमडळात पाठवू शकतो व जेथे झाडूवाला प्रतिनिधी बसतो त्या कायदेमडळाची लायकी किती हीन आहे हे जगाला दाखवू शकतो अशी ती त्याची घमेड होती महार कायदेमडळावर बहिष्कार घातला पाहिजे, नव्हे, बहिष्कार घालण्यास पात्र अशी ती कायदेमडळे आहेत हे दाखविण्याकरिताच राष्ट्रीय सभावाल्याचा, हे असे अस्पश्य प्रतिनिधी निवडून आणण्यात उद्देश होता राष्ट्रीय सभा व तिचे अनुयायी आपल्याबद्दल ही अशी अपमानकारक खोटी सहानुभूति दाखवितात आणि असलेच प्रतिनिधि आपल्या हक्काकरता वर्तुळ-परिषदेत भाडत आहेत!

हिदुस्थानला स्वराज्य मिळाले तर हे स्पृश्य हिंदू आपल्याला कोणत्याही प्रकारचे हक्क देणार नाहीत आपल्यावर वर्चस्व गाजविण्याची त्याना लागलेली सवय एकाएकी नाहीशी होणार नाही आणि असे वर्चस्व तुम्ही चालू दिले तर तुमच्याकरता ते वाटेल तितकी पोकळ सहानुभूति दाखवितील

आर्यांच्या कालापासून आजपर्यंत जर आपण अशाच अवनत स्थितीत आहोत तर ती सुधारण्याकरता आपणच स्वतत्रपणे प्रयत्न केले पाहिजेत. त्याकरता स्पृश्यावर अवलबून राहिल्यास आपल्यावर पश्चात्तापाची पाळी येईल यात शका नाही या अनत कालाच्या दास्यातून मुक्त होण्याकरता आपण आपल्याच पायावर उभे राहून प्रयत्न केले पाहिजेत आपल्या हक्काकरता झगडण्यास आपलेच प्रतिनिधी कायदेमडळांत हमखास निवडून गेले पाहिजेत आपलेच प्रतिनिधी खात्रीने निवडन यावेत असे वाटत असल्यास त्याला आपल्यास स्वतंत्र मतदारसघच पाहिजे

ठिकाणी आपली संख्या कमी असल्यामुळे
त–मतदारसघात आपला समावेश केल्यास
ाला प्रतिनिधी कायदे मडळात पाठविणें जवळ
ळ अशक्य आहे शिवाय मध्यवर्ती व प्रातीय
कारच्या मत्रिमडळात अस्पश्याचा एक तरी
ानिधि हवाच त्याशिवाय आपल्या हिताचे
ाण व्हावे तसे होणार नाही
अस्पृश्यता नाहीशी करण्याकरता सार्वत्रिक
तीचे शिक्षण व्हावयास हवे शेवटी या दास्या-
ा मोडविण्याचा प्रयत्न सरकारने केला पाहिजे
ारे

* * *

नागपूर येथून ३०।३।३२ ला **ऑल इंडिया
ःप्रेस्ड् क्लास असोसिएशनचे अ सेक्रेटरी
. म ढवरे** यानी काढलेल्या पत्रकाचा साराश—
असोसिएशनने लोकसख्येच्या प्रमाणावर मिश्र
तदार सघाची मागणी केल्याबरोबर डॉ आबेड-
र व त्याचे सहकारी या असोसिएशनवर तुटून
डल्यासारखे दिसतात माझी साक्ष हिदी मत-
ाननिर्णायक मडळापुढे ता १५ मार्च रोजी
ोणार मी त्या असोसिएशनचा अ जनरल
ोक्रेटरी असल्यामुळे मी मिश्र मतदारसघच
ागणार व माझे व्यक्तिश मत मिश्र मतदार-
ाघाकडेच आहे

दिल्लीला अखिल भारतीय अस्पृश्य–परिषद
भरली त्या परिषदेचे अध्यक्ष म्हणून डॉ आबेड-
कराची निवड झाली ते येऊ शकले नाहीत म्हणून
रा. ब राजा याची निवड करण्यात आली यामुळे
डॉ आबेडकर व परिषद भरविणारी मडळी
यांमध्ये वितुष्ट उत्पन्न झाले व डॉ आबेडकर
यानी आपला सवतासुभा स्थापन केला

नागपूरच्या कॉंग्रेसमध्ये डॉ आबेडकरानी
आपल्या भाषणात सागितले की, माझे मत मिश्र
मतदारसघाकडे आहे व त्याप्रमाणे त्या कॉंग्रेस-
मध्ये अस्पृश्य समाजाला मिश्र मतदारसघ मिळावा
असा ठराव मजर झाला. ही कॉंग्रेस आमच्या
असोसिएशनची नव्हती. सायमन कमिशनच्या
वेळेला डॉ आंबेडकरांनी साक्षीत मिश्र–मतदार-
संघच मागितला. व १९३० च्या राऊड–टेबल-
कॉन्फरन्समध्ये त्यांनीं जें भाषण केलें त्यातसुद्धां
त्यांनीं मिश्र–मतदारसघावरच जोर दिला आहे.
आम्ही त्या वेळेला वेगळा मतदारसघ मिळावा
या मताचे होतो, त्यानतर कांही दिवसांनीं डॉ.
आबेडकर वेगळ्या मतदारसंघाकडे झुकले अर्थात्
सर्व अस्पृश्याची मागणी एक झाली.

### आम्ही मिश्र–मतदारसंघ कां मागतों ?

१९१९ पासून आम्ही वेगळ्या मतदारसघाचे
भोक्ते होतो व ते १९३१ सालच्या अखेरपर्यंत;
म्हणजे पूर्ण बारा वर्षें लोकसख्येच्या प्रमाणावर
वेगळ्या मतदारसघाकरतां तप केले, पण त्याचें
काहीच चीज न होता आमच्या हाती भोपळाच
मिळण्याचे भविष्य दिसल्यामुळे आम्हास आमचें
मत बदलणे भाग पडले. आम्हांला लष्कर नको,
खजिना नको, पण लोकसख्येच्या प्रमाणात जागा
पाहिजेत, अशी १२ वर्षें सारखी ओरड करून
मध्यप्रात सरकारने अस्पृश्यसमाज व मजूर मिळून
फक्त १० जागाचीच शिफारस केली, लोकसख्ये-
च्या प्रमाणात आपल्याला २२ जागा येतात; तर
हा काय न्याय झाला ? रा ब श्रीनिवास
यानी वर्तुळ–परिषदेत आपल्या भाषणात मुंबई
व मद्रास इलाख्याकरिता लोकसख्येच्या प्रमाणां-
पेक्षा इतर प्रातातील अस्पृश्याच्या जागा कमी
करून डॉ आबेडकरांच्या सल्ल्याने जास्त जागा
मागितल्या मध्यप्राताच्या जागा कमी करून
मुबई–मद्रासला का द्याव्या ?

आमच्यावर असा आक्षेप आहे की, आम्ही
लवकरच आपले मत बदलले, पण डॉ. आबेड-
कराप्रमाणे लवकर दुसऱ्या राऊड–टेबलमध्यें
जसे ते बदलले तसे आम्ही न बदलतां १२ वर्षांनी
मत बदलले आहे व ते बदलण्याचे या दोन कारणां-
शिवाय मुख्य कारण म्हणजे मुख्य वजिरांनी
आपल्या भाषणात प्रातिक स्वायत्तता देण्याचे
सागितले आहे सध्यांच्या राज्यघटनेत व भावी
प्रातिक स्वायत्ततेत बराच भेद आहे सध्यांचा
अधिकार इग्रजांकडे आहे व कौन्सिलने जें कांहीं
सध्या ठरविले ते सध्याचे सरकार धाब्यावरही
ठेवू शकतें तसेच आपल्यावर अन्याय होण्या-

पाड्यांतून हिंदूसमाजाकडून जुलम झाला व सरकारला आपण दाद मागितली, तर सरकारने आपल्याला त्याबद्दल बरीच मदत केली पण प्रातिक स्वायत्ततेंत आता असा राज्यकारभार राहणार नाही. बहुमतवाल्यांच्या हाती सूत्रे राहणार सारे समाज एक झाले तरी बहुमत स्पृश्य हिंदूचे राहणार अस्पृश्य–समाज वेगळा होऊन कौन्सिलात आपल्याला काहीच करता येणार नाही जर आपल्याला आपल्या समाजाकरता काही करून घ्यायचे असेल तर हिंदूशी मिळूनच वागले पाहिजे आपला प्रयत्न अस्पृश्यता निवारणाचा आहे जर आपण राज्यघटनेत हिंदूपासून वेगळे झालो तर अस्पृश्यता कायमची राहणार आणि अस्पृश्य समाज व स्पृश्य हिंदूसमाज याच्यामधील द्वेषाची वृद्धि मात्र होणार यामुळे आपल्या समाजाचा काही फायदा होणार नाही

मिश्र मतदारसघाने हिदूचे बगलबच्चे येतील असा हि काही लोकाचा आक्षेप आहे पण तोच आक्षेप वेगळ्या मतदार सघावरहि येतो अस्पृश्य समाजांतून मिश्र मतदारसघाने योग्य माणसाचीच निवड होईल हे रा ब राजाचे टाइम्स आफ इडियाने ता. २५।३।३२ रोजी जे पत्र प्रसिद्ध केले ते वाचल्याने प्रत्येक अस्पृश्य समाजाची खात्री झाल्याशिवाय राहणार नाही मॉंटेग्यू–चेल्सफर्डच्या चौकशीच्या वेळेला मद्रासच्या ब्राह्मणेतरांनी स्वतत्र मतदारसघ मागितला पण त्याना स्वतत्र मतदारसघ न मिळता सयुक्त मतदारसंघ व राखीव जागा (जी मागणी ऑल इडिया डिप्रेस्ड् क्लासेस अॅसोसिएशन करीत आहे) हेच मिळाले, व सध्या आपण मद्रास इलाख्यात पाहतो तर ४५ ब्राह्मणेतर, मिश्र मतदारसघाने बिनहरकत लायकच निवडून येतात मध्यप्रातात मुसलमानाना स्वतंत्र मतदारसघ आहे व त्याचे ७ मेंबर कौन्सिलांत असून त्याच्यामधून एकदाच दिवाणाची नेमणूक झाली, पण लवकरच त्या दिवाणाची उचलपट्टी झाली कारण स्वतत्र झाल्याने इतर समाजांनी का मदत करावी ? कौन्सिलचा अध्यक्ष म्हणून हिंदूच्या मदतीने एकादा अस्पृश्य निवडून येणें शक्य आहे पण ते सध्यांच्या द्विदल पद्धतीतच, प्रातिक स्वायत्ततेंत होणार नाही कॉंग्रेस व मुसलमान यांच्या लखनौच्या कराराप्रमाणें मुसलमानाना लोकसख्येपेक्षा अधिक जागा मिळतात त्याप्रमाणें त्याना जर मिळताहेत तर आपण आपल्या लोकसख्येच्या प्रमाणांतच जागा मिळण्याकरिता हिंदु महासभेशी करारनामा कां करू नये ? व याचकरिता आमच्या असोसिएशनने आपले मत बदलले आहे वेगळ्या मतदार–सघात आपल्या समाजाचे अहित व मिश्र मतदार सघात हित आहे, अशी खात्री झाल्यामुळे मिश्र मतदार–सघच आपल्या समाजाला "हितावह' आहे अशी आमच्या असोसिएशनची खात्री झाली आहे

* * *

## डॉ. आंबेडकरांचा मायनॉरिटी पॅक्ट

डॉ. आबेडकर व डॉ. श्रीनिवासन् यानी इतर अल्प सख्याकाशी करारनामा करून स्वार्थ साधण्यापलीकडे काहीच केलेले नाही यानी मुबई व मद्रास (आपापल्या) प्राताला लोकसख्येच्या प्रमाणापेक्षा ज्यास्त जागा मागितल्या याशिवाय त्यानी अस्पृश्याच्या हिताकडे दुर्लक्ष करून मुसलमानाना फक्त खूष ठेविले आहे. लोकसख्येच्या मानाने अस्पृश्याना ५९ जागा कमी घेण्यास व मुसलमानाना १७७ जागा अधिक देण्यास आबेडकराचा लडनचा करारनामा कोणताही विचारी अस्पृश्य कबूल करणार नाहीच उलट असे केल्याबद्दल डॉ आबेडकराचा धिक्कारच करील यामुळे अस्पृश्याचे फार नुकसान झाले आहे डॉ आबेडकराच्या लडनच्या करारापेक्षा रा ब राजानी दिल्लीस डॉ मुजे याच्याशी केलेला करारच न्याय्य व रीतसर आहे.

* * *

## ज्ञानदेव ध्रुवनाथ घोलप

इग्रज सरकारच्या हातून आम्हा अस्पृश्याची दु खे कमी होतील अशी आम्हाला आशा नाही आमच्या तक्रारीची दाद लावून घ्यावयाची तर सरकार डोळे असून पाहात नाही व कान असून ऐकत नाही. तशीच स्थिति आमच्या धर्मबांधवाची दोघेहि एकाच माळेचे मणी मराठी राज्यांत

आमचा सामाजिक व राजकीय दृष्ट्या अत्यंत छळ झाला व त्या पापाचे धनी मराठे आहेत पेशवे तर बोलूनचालून ब्राह्मण, तेव्हां या दोषांतून त्याची मुक्तता होणे नाही ! या दोषारोपात किती तथ्यांश आहे याला इतिहासात पुरावा नाही अगर असल्यास कोणी पुढे आणीत नाही मात्र एवढी गोष्ट खरी की, ब्राह्मण पेशव्यानी आपल्या फौजात महाराना नोकऱ्या देऊन आपली वीरवृत्ति दाखविण्यास संधि दिली आणि महार हा एकाद्या इंग्रज टॉमीपेक्षा लढण्यात व शौर्यांत कमी नाही हे जगाला दाखवून दिले आपल्या लढाऊ वृत्तीस पेशव्यानी अशी संधि दिल्यामुळे अस्पृश्याचा सामाजिक व आर्थिक दर्जा वाढला व त्याच्या मनात भावी उत्कर्षाची आशा उत्पन्न झाली या कारणामुळे त्या वेळी अस्पृश्याना स्वतःच्या धार्मिक अगर सामाजिक अवनतीबद्दल काही वाटले नाही परंतु इंग्रजी अमदानीपासून महाराना व इतर अस्पृश्याना लष्करात वाव मिळाला नाही आम्हाला लष्करी चाकरीचे दरवाजे बंद करण्याचे संघटित प्रयत्न या सरकारच्या अमदानीतच सुरू झाले सर्व जातीना या राज्यात समानतेने वागविण्यात येईल अशी घोषणा एकीकडे चालू असताना अस्पृश्याना मात्र चोहोकडे सांपत्तिक दृष्ट्या तुडविले जात आहे सरकारचे कान स्पृश्याच्या हाती असल्यामुळे अस्पृश्याची स्थिति दिवसेदिवस वाईट होत चालली आहे आणि म्हणून आमच्या या अवनत स्थितीची कारणे शोधून काढून ती नाहीशी करण्याचे प्रयत्न सरकारकडून होतील अशी आम्हाला आशा नाही दास्य-विमोचनाच्या चळवळीचे पुरस्कर्ते म्हणून सरकारने कितीही ओरड केली तरी येथे कायद्याने जोपर्यंत सरकार काही जातीना गुन्हेगार जाती म्हणून ठरवीत आहे तोपर्यंत त्याच्या या दास्यविमोचनेच्या घोषणेला जग किंमत देणार नाही अमुक एक व्यक्ति अमुक एका जातीची म्हणून ती गुन्हेगार ठरविणे हे इंग्रज सरकारच्या न्यायीपणाला धरून नाही नुकत्याच जन्मलेल्या अर्भकाला ते विशिष्ट जातींत जन्माला आले म्हणून जातीचे कायद्यानें गुन्हेगार ठरविणें म्हणजे पशुवृत्तीचें नाही काय? सरकारची ही वृत्ति व स्पृश्यांची अस्पृश्यांसंबंधी वृत्ति यांत फरक तो काय राहिला? अस्पृश्य नावाखाली तरी अस्पृश्यांना स्पृश्य दूर ठेवतात पण हे सुधारलेले सरकार कायद्याच्या जोरावर अस्पृश्यांना गुन्हेगार वृत्तीचे ठरविते! सरकारला उघड विरोध करण्याची या चढेल स्पृश्य ब्राह्मण व ब्राह्मणेतर जातीची छाती नाही पण आपल्या देवाच्या लाडक्या मुलाबरोबर अस्पृश्याच्या मुलांनीं एकत्र शिक्षण घेऊ नये म्हणून हे वाटेल ते शस्त्र उपयोगात आणतील शिक्षणखात्यात आधींच ब्राह्मणाचा व इतर स्पृश्याचा भरणा जास्त प्रमाणावर असल्यामुळे शहरापासून तो खेड्यापर्यंत या बाबतीत त्याचेच प्राबल्य आहे यांत अलीकडे ब्राह्मणेतराची म्हणजे मुख्यत. मराठ्याची भर पडली आहे मराठ्यानी ब्राह्मणाना हाकलून देऊन त्याच्या जागा आपण घेतल्या आहेत अस्पृश्यानी आपली मुले शाळेंत पाठवू नयेत म्हणून "घरादाराचा नाश करू" अशा धमकावण्या देण्यास या लोकानी कमी केले नाही त्याच्या इच्छेविरुद्ध जाण्याचा निश्चय आम्ही केल्यास आमच्या झोपड्याना आग लावण्यात येईल अशी धमकी दिली जाते आमची मुले अशा सार्वजनिक शाळातून पाठविण्याची सक्ति आमच्यावर करू नये अशासारखे अर्ज लिहून त्याच्यावर आमच्यांतील अज्ञ लोकाच्या सह्या घेऊन धाडण्याचें काम काही आपमतलबी स्पृश्यांनी केलें आहे सरकारी हुकुमाचा आधार घेऊन जर काही अस्पृश्यांनी आपली मुले अशा शाळातून धाडण्याचे धाडस केले तर स्पृश्य लोक आपली मुले या शाळातून काढून घेऊन आपले म्हणणें खरे करून दाखवितात. शाळातून स्पृश्यांस्पृश्याच्या मुलांना वागविण्यांत भेद केला जातो की काय याचीहि चौकशी करण्यासारखी आहे

---

# हिंदु समाजाची उज्वल बाजू



आमच्या मुलामुलींच्या हातांत प्रक्षोभक व उत्तेजक वाङ्मय पडावयास हवें. पण सध्यां होत आहे तें हें कीं, ज्यानें त्यांच्या मनाला मरगळ येईल किंवा त्यांचीं मनें रगेल बनतील असेंच वाङ्मय त्यांना वाचावयास मिळत आहे. बाबराच्या आधीं हिंदुस्थान देशाला इतिहास होता ना? मोठमोठालीं चतुरंग दळें पदरीं बाळगणारे सार्वभौम राजे या हिंदुस्थान देशांत होते ना? सयामच्या आग्नेय टोकापासून तों पर्शियाच्या उत्तरेपर्यंत आपलीं साम्राज्यें चालविणारे सम्राट् या देशांत होऊन गेले ना? आर्यधर्म प्रसारकांनीं व बुद्ध भिक्षूंनीं जावा सुमात्रापर्यंत आणि पेकिंग पॅलेस्टाईन पर्यंत आपापल्या धर्माच्या ध्वजा फडकवीत नेल्या होत्या हें इतिहास सांगतो ना? उत्तरेकडून रानटी अर्धरानटी किंवा धर्मवेडया लोकांच्या झुंडीच्या झुंडी हिंदुस्थान देशांत घुसत असतां त्यांना झोडपून बाहेर हांकलून देणारे किंवा रगडून टाकून आत्मसात् करणारे हे हिंदू लोक ८०० हजार वर्षेपर्यंत हिंदुस्थानच्या सरहद्दीवर खडा पहारा करीत होते ही गोष्ट खरी आहे ना? व या सर्व गोष्टी मुसलमान व ख्रिस्ती यांचे पाय या हिंदुस्थानाला लागण्याच्या आधींच झाल्या आहेत हे खरें आहे ना? वाङ्मय, व्याकरण, कोशरचना, ज्योतिष, गणित, चित्रकला, रसायन, स्थापत्य, युद्धकला, संगीत, नाट्य इत्यादि शास्त्रकलासंबधींचीं ज्ञानें या ठिकाणीं इतक्या पूर्वींही भरभराटीस आलीं होतीं याची आठवण इतिहासाला अजूनही खचित आहे, समाजरचना, अर्थशास्त्र, टीकाशास्त्र, यावरील प्रबंधही, आम्हांस इतरांनीं कोणी आपलीं ज्ञानें देण्याच्या पूर्वींच आम्हीं तयार केले होते ही गोष्ट इतिहाससिद्ध आहे. आमचा वैश्यवर्ग हिंदुस्थानाच्या बाहेरून आपल्या व्यापाराच्या व कला कौशल्याच्या बळावर हरतऱ्हेचीं धनें स्वदेशांत आणीत होता हें परकीयांना सुद्धां माहीत आहे. आपण 'अटकेची' अटक मानीत नव्हतों व लंकेपासून सुमात्राजावा पर्यंत 'समुद्रयाना'ची भीति न बाळगतां खुशाल येरझारा करीत होतों. म्हणून तर आपल्या संपत्तीवर इतर लोक डोळा ठेवूं लागले व या भूमीस सुवर्णभूमि हें नांव मिळालें. पण या सर्व ऐश्वर्याचा, पराक्रमाचा ज्ञानवर्धनाचा इतिहास आमच्या मुलांच्या हातांत पडावयाच्या ऐवजीं हिंदुसमाजाचें नष्टचर्य ज्या दिवसापासून सुरू झालें त्या दिवसापासूनचा इतिहास मात्र मुलांना वाचावयास सांगतात. पुराणें हीं केवळ पुराणें नाहींत. आणि रामायण महाभारत हे तर धडधडीत इतिहास आहेत. येथपासून सुरुवात करून

रामकृष्णांच्या नंतर जे मोठमोठाले ययुत्सु राजे झाले यांच्या पुढें येतां येतां अंग, वंग, कलिंग, सौराष्ट्र, कुरुप्रदेश मद्रदेश, मगध, कनोज इकडील सर्व राजांच्या हकीकती सुसंबद्धपणें लिहून त्यांचें अध्ययन मुलांच्याकडून करवून घेतलें पाहिजे. वर उल्लेखिलेले आर्य संस्कृतीचे व शास्त्रकलांचे इतिहास त्यांच्या हातीं दिलें पाहिजेत. असें झालें तरच मुलांच्यांत चेतना उत्पन्न होईल. स्त्रियांना चोरटेपणानें किंवा जबरदस्तीनें हरून नेणाराला शिरच्छेदाचें शासन द्यावें हें रामानें आपल्या उंच घोषानें सांगितलेलें आहे. "शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं यत्र धर्मोऽपरुध्यते" आपत्कालामध्यें क्षत्रियांसह इतर सर्व वर्णांच्या लोकांनीं शस्त्र धारण करावें हा शास्त्रप्रणीत न्याय भीष्मानें धर्मराजाला पुनः पुनः आळवून सांगितलेला आहे. हा रामाचा व भीष्माचा उपदेश प्रत्येक हिंदुमात्राच्या चित्तावर जर ढळढळीत कोरला गेला असता व त्याची उजळणी शतकानुशतक होत राहिली असती तर हिंदुसमाजावर आलेल्या आपत्ती खरोखरच आल्या नसत्या. हीं दोनही प्रकरणें पुढें दिलीं आहेत. सुष्टाशीं सुष्टपणानें वागावें व दुष्टाशीं दुष्टपणानें वागावें, कपटी शत्रूशीं कपट करूनच त्याचा कांटा मोडला पाहिजे हें तत्त्व मानवी संसाराला अत्यवश्य आहे. हा महाभारतांतील संदेश जर रजपूत राजे विसरले नसते तर त्यांनीं आपल्या अंगावर भलत्याच आपत्ती ओढवून घेतल्या नसत्या. रजपुतांनीं दांतीं तृण धरून शरण आला म्हणून मुसलमान योध्याला जीवदान द्यावें आणि त्यानें मात्र हिंदू योद्धा हातीं सापडल्याबरोबर प्रथम त्याची मान कापावी हा प्रकारही महाभारतांतील संदेश हिंदू लोक विसरले यामुळेंच घडून आला. ही हिंदू शास्त्रांची घोषणा महाराष्ट्रांत श्रीशिवाजी राजांना आणि समर्थ रामदासांना मात्र उत्तमोत्तम कळली होती. म्हणून शिवाजीला अफजुलखानाशीं युद्ध करतां आलें आणि "धटाशीं आणावा धट" "लवंद्याशी लवंदा लावावा" असा पुकारा रामदासस्वामीनीं केला. अशा प्रकारच्या उत्तेजक मजकुराचीं प्रकरणें पुढें दिलींच आहेत, राज्यकारभार कसे करावे, अनुशासन सूत्रावली कशी रचावी, प्रजांच्या सोयी राजानें कशा पहाव्या याचेंही धर्म व नारद यांच्या मुखानें झालेलें विवेचन दिलेलें आहे. हिंदूंनीं हिंदूंस मदत करावयास हवी म्हणून राजा शिवाजीनें जयसिंगास मोठ्या कळवळ्यानें लिहिलेले पत्र पुढें वाचावयास सांपडेल. सारांश हिंदुसमाज व संस्कृति यांची प्राचीन ओळख करून देणारें वाङ्मय आज आपल्या समाजांतून नष्ट होत चाललें आहे त्याची, पुढील मजकूर वाचून जिज्ञासा वाढेल, आणि समाजाचें लक्ष तिकडे वेधेल अशी अपेक्षा आहे.

## हिंदूंची राज्यकारभाराची उदात्त कल्पना

### कच्चित्प्रश्न

नारद विचारतात —राजा युधिष्ठिरा, भूपतीला म्हटले म्हणजे यज्ञयाग, दानधर्म, कुटुंबभरण इत्यादि कार्यांसाठी धनादिकाचे उत्तम बळ असले पाहिजे, तर ते बळ तुजपाशी आहे ना? तसेच, लोकनायकाचे मन सदोदित धर्माचरणाविषयी तत्पर असले पाहिजे, ह्यास्तव तुझें मन धर्मपर आहे ना? धर्मराजा, राजे लोकांनी सुखोपभोग अनुभवावे, पण त्यात दंग होऊन परब्रह्मचिंतनापासून विमुख होऊ नये, तेव्हा तुझी स्थिति कशी आहे बरे? तुला राजसुखें अनुकूल आहेत ना? बरे पण त्यात तूं अतिशय आसक्त नाहीस ना? हे नरदेवा, उत्तम, अधम व मध्यम असे जे जनाचे त्रिविध वर्ग, त्याशी तदनुकूल त्रिविध वर्तन ठेवणे अवश्य आहे, त्विक्पुरोहितादि गुरुस्थानापन्न जनाविषयी पूज्यबुद्धि धारण करून त्यास वर्षासने वगैरे करून दिली पाहिजेत, दुष्ट व घातुक जनाचे शासन करून त्यास जरबेत ठेवण्याकरिता त्याजपासून दंड घेणे अगत्याचे आहे, आणि प्रजेचे पालन करून तिजपासून उत्पन्नाचा षष्ठांश कररूपाने वसूल घेण्यास प्रत्यवाय नाही, तुझे पूर्वज ह्या तिन्ही विहित गोष्टी मोठ्या काळजीने करीत असत, तेव्हा तूंहि त्या श्रेष्ठ मार्गाचे अवलंबन करीत असतोस ना? हे नरपुंगवा, पृथ्वीपतीच्या ठिकाणी, नीचत्व, विरक्तत्व व कामुकत्व हे महान दोष होत, ह्याच्या योगाने त्याच्या हातून राज्यशकट कधीहि सुयंत्रित चालणार नाही, ह्यास्तव ह्या दोषापासून भूपतीने सदैव अलिप्त असले पाहिजे त्याने अर्थाविषयी लोभ धरून धर्माचा अव्हेर होऊ देऊ नये, धर्माविषयी तत्पर होऊन अर्थाकडे दुर्लक्ष करू नये, आणि तात्कालिक सुखावर आसक्ति ठेवून धर्म व अर्थ ह्या दोहोंविषयी उदासीन बनू नये सारांश, धर्माची प्रीति, अर्थाचा लोभ व सुखाचा अभिलाष, ह्या तिन्ही गोष्टी अगदी मर्यादित असल्या पाहिजेत तेव्हां तुझी स्थिति ह्याप्रमाणें सर्वथा प्रशंसनीय आहे ना? हे विजयी श्रेष्ठा! धर्म, अर्थ व काम ह्या तिहींनी विशिष्ट अशा मर्यादेचे उल्लंघन करू नये ह्यास्तव, प्रत्येक उत्कर्षेच्छु पुरुषाने त्यास विशिष्ट काळ नेमून द्यावा हे फार चांगले, आणि ह्याच तत्त्वावर दृष्टि ठेवून श्रुतीने असा नियम घालून दिला आहे की, पूर्वान्ही नित्य नैमित्तिक धर्मकृत्ये आचरावी, मध्यान्हापासून सायान्त्पापर्यंत द्रव्यार्जनादिक अर्थपर कृत्ये करावी, आणि सायान्ही व नंतर सुखोपभोग घ्यावे धर्मराजा, ही कालानुरूप कर्मयोजना तू जाणतच आहेस, तेव्हा तू तदनुसार वर्तन करीत आहेस ना?

युधिष्ठिर राजा, (१) नास्तिकपणा, (२) असत्य, (३) क्रोध, (४) प्रमाद (गैरसावधपणा), (५) दीर्घसूत्रता (चेंगटपणा), (६) ज्ञानी लोकाची भेट न घेणे, (७) आळस, (८) इंद्रियासक्ति, (९) केवळ धनलोभ, (१०) दुष्टाशी मसलत, (११) सुनिश्चित कर्माविषयी उदासीनता, (१२) रहस्यस्फोट, (१३) देवादिकाचे मंगलोत्सव न करणे, व (१४) दाही दिशाकडील शत्रूंना दाबात ठेवण्याविषयी दक्षता न राखणे, असे हे राजाचे ठायी चौदा दोष होत हे पांडुतनया, राजाच्या ठिकाणी जे अवश्य असले पाहिजेत, असे मुख्य गुण सहा आहेत (१) दुसऱ्याचे चित्त वश करून घेऊन त्यावर आपली छाप ठेवण्याकरिता राजाच्या अंगी उत्तम वक्तृत्व असावे, (२) शत्रूस नित्य भय पडावे व त्यानी वर मान उचलू नये ह्यास्तव राजानी आपला पराक्रम व सामर्थ्य सदा सर्वकाळ शत्रूच्या दृष्टीपुढे ठाम जागृत ठेवावे, (३) राजाची दृष्टि मोठी सूक्ष्म व दूरवर असावी, (४) पूर्वी घडलेल्या गोष्टीचा त्यास कधीहि विसर पडू नये, (५) प्राचीन इतिहासाचे मनन करून, पुढे काय घडेल त्याचे बरोबर अनुमान त्यास करिता यावे, आणि (६) त्यास राजनीतीची सर्व तत्त्वे उत्कृष्ट विदित असावी राजा, तुझ्या ठिकाणी हे सर्व गुण आहेत, तेव्हां ह्या सर्व गुणाचा योग्य उपयोग करून साम, दाम, भेद, दंड, मंत्र, औषध व इंद्रजाल ह्या सात

उपायापैकी कोणता उपाय कोठे श्रेयस्कर होईल ह्याचा विचार तू करीत असतोस ना? हे वीर-पुंगवा, विजयेच्छु पुरुषाने शत्रूच्या बलाबलाचे योग्य परीक्षण करणें अत्यत अगत्याचे आहे, ह्यास्तव तुझा तसा परिपाठ आहे ना? तशीच चौदा प्रकारच्या अधिकाऱ्यावर भूपतीची विशेष दक्षतेची दृष्टि पाहिजे ते अधिकारी म्हटले म्हणजे देशाधिकारी, दुर्गाधिकारी, रथाधिपति, अश्वाधिपति , गजाधिपति, शूर सैनिक, अत पुररक्षक, अन्नाधिपति, शस्त्राधिपति, सेनागणक, आय-व्ययलेखक, धनाधिपति, गुप्त हेर व कामगार लोक हे होत, तर ह्या सर्वांवर तुझी योग्य नजर आहे ना? राजा, शत्रूच्या बलाबलाची परीक्षा केल्यावर आपले बल कमी व शत्रचे बल अधिक असे दिसून आल्यास, त्या प्रसगी स्वसर-क्षणाचा मुख्य उपाय शत्रूशी युक्तीने साम करणे हाच होय ह्याकरिता तसे करून कृषिकर्म, व्यापार, किल्ले, सरहद्दी, हस्तिशाळा, रत्नाच्या सुवर्णांच्या खाणी व करांचा वसूल ह्याची सुव्यवस्था ठेवावी, आणि सपत्ती वाढवून राज्यातील व्यगे दूर करावी हे इष्ट आहे, तेव्हा त्याप्रमाणे तू करीत असतोस ना ?

धर्मराजा, राज्यातील सपत्ति वाढण्यास कृषिकर्मादिक आठ गोष्टी सुधारल्या पाहिजेत हे खरे, परतु ह्यापेक्षाहि एक मोठी गोष्ट अनुकूल असली पाहिजे ती ही की, राष्ट्रामध्ये मुळीच फूट नसावी, राजनियुक्त सर्व अधिकाऱ्यामध्यें राजभक्ति उत्कृष्ट असली पाहिजे दुर्गाध्यक्ष, बलाध्यक्ष, धर्माध्यक्ष, सेनानायक, उपाध्याय, वैद्य व ज्योतिर्विद ह्या सर्वांनी एकमताने स्वामिकार्यासाठी तनमनधन अर्पण करून झटले पाहिजे, लाच वगैरे देऊन फदफितुरी उत्पन्न करण्याचा शत्रनी प्रयत्न केल्यास राजसेवकांनी त्यास लुब्ध होता कामा नये, तसेच राज्याधिकारी पुरुषानी ऐश्वर्यभराने उन्मत्त होऊन स्वकर्तव्यापासून पराङमुख होऊ नये; ते व्यसनादिकात निमग्न होऊन पापकर्मांस उद्युक्त होतील तर त्याचा स्वत चा व परिणामी त्याच्या राज्याचा सर्वस्वी घात होईल, साराश लक्ष्मीची वाढ होण्यास राज्यांत सर्वत्र स्वामीकार्यासाठी प्रेम वसले पाहिजे, तेव्हा तुझ्या राज्यांत तें उत्तम प्रकारें वास करीत आहे ना ? तूं जे अधिकारी नेमले आहेस ते बाहद्यात्कारी मात्र राजनिष्ठा प्रदर्शित करून आतून शत्रूला सामील नाहीत ना ? तुझे प्रीतीतले मत्री किवा दूत तुझ्याशी दगा करून तुझी मसलत तुझ्या वैऱ्यास कळवीत नाहीत ना ?

राजा, आपल्यावर प्रेम कोण करितात, आपले शत्रू कोण आहेत, व आपल्याशी उदासीन वृत्तीने (दोन्ही पक्षाकडील वेतन घेऊन मध्यस्थ वृत्तीने ) कोण वागतात, ह्याचा विचार करून त्याशी तदनुरूप वर्तन ठेवले पाहिजे आपल्यावर प्रेम करणाऱ्या पुरुषाची प्रथम योग्य परीक्षा करावी व नतर त्यास आपल्या मसलतीत घेऊन त्याच्या साहाय्याने बलिष्ठ शत्रशी साम किवा दुर्बल शत्रूशी युद्ध करावे, तसेच जे उदासीन किवा मध्यस्थ वृत्तीने वागत असतील, त्यांशी आपणहि तशीच वागणूक ठेवली पाहिजे. ह्यास्तव ह्या नियमानुसार तुझे योग्य वर्तन चालू आहे ना ? हे प्रतापशाली वीरा, राज्यात जे वृद्ध, कुलीन, स्वामिनिष्ठ, उत्कृष्ट सल्लागार व आचारसपन्न पुरुष असतात, त्याच्या सल्ल्यावर राजाचा जय अवलबून असतो, ह्यास्तव, त्या पुरुषाचा आपल्याप्रमाणे गौरव होईल अशी तजवीज करणे हे राजाचे कर्तव्य होय, तेव्हां तू तशी व्यवस्था ठेवली आहेस ना? बा युधिष्ठिरा, राजकार्यधुरधर अमात्यानी राजाचे रहस्य कोणासहि कळू न देता राजकार्य चालविले म्हणजे राष्ट्र नेहमी सुरक्षित राहून शत्रूपासून त्यास केव्हाहि उपसर्ग होत नाही असा अबाधित नियम आहे तेव्हा तुझ्या राज्यात अमात्यमंडळ तसे वर्तन करीत आहे ना ?

हे पाडुनदना, राजाची वृत्ती मोठी कठीण आहे त्याने अहर्निश आपल्या कार्याचे निदिध्यसन चालविले पाहिजे त्याने योग्य वेळी निजून उठले पाहिजे. त्यास अमर्याद निद्रा उपयोगी नाही राजाने अमात्याशी ज्या मसलती केल्या

असतील, त्याचा त्याने पहाटेस आपल्याशी विचार करावा, राजा धर्मा, हे सर्व नियम तू जाणतच आहेस, तेव्हा तुझें वर्तन योग्य प्रकारें चाललें आहे ना? राजा, कोणतीहि मसलत केली ती एकट्यानेच करूं नये कारण, एकट्यानेच मसलत केली असतां कधी कधी मोठ्या चुका घडतात, तसेंच मसलतीत दुसरे लोक घ्यावयाचे ते अनेक घेणें हेहि अयोग्य होय, कारण त्यायोगे ती मसलत गुप्त रहात नाही म्हणन मसलत करावयाची असता ती दोघानीच करावी हे इष्ट आहे तर तू ज्या मसलती करतोस त्यात ही अशी सावधगिरी ठेवतोस ना? तुझ्या मसलती फुटून राष्ट्रभर होत नाहीत ना?

हे युधिष्ठिरा, ज्या व्यवसायात आरंभी फारसे द्रव्य घालावे लागत नाही पण परिणामी त्यापासून पुष्कळ उत्पन्न होते असे व्यवसाय कोणते, ह्याचा निश्चय करून ते व्यवसाय तत्काल करण्यास प्रयत्न करणे हे इष्ट होय कृषिकर्म, व्यापार इत्यादिक व्यवसाय ह्यापैकीच आहेत तेव्हा हे व्यवसाय करण्यास तू उत्तेजन देतोस ना? तसेच जे कोणी हे व्यवसाय करितात, त्याना विघ्ने करीत नाहीस ना? राजा, कामगार लोक अपरिचित, अविश्वसनीय व पुन्हा पुन्हा कामावर लावलेले असे असल्यास त्यापासून व्हावा तसा लाभ होत नाही कामगार लोकाचे मन राजाच्या ठिकाणी आसक्त असल्याशिवाय ते कसून काम करीत नाहीत यास्तव ते जुने, पूर्ण परिचयाचे, विश्वासू व स्वामीच्या कल्याणाकरितां मनापासून झटणारे असेच असावे म्हणजे ते महान महान कार्ये मोठ्या उल्हासाने घडवून आणितात राजा धर्मा, तुझ्या पदरी जे कामगार लोक आहेत ते असेच आहेत ना? पाडुतनया, सेवकांना स्वामिकार्य हाच स्वार्थ वाटला पाहिजे. वाडवडिलापासून जे सेवक चाकरी करीत आलेले असतात, त्याच्या ठायी धन्याविषयी आत्मीयता उत्पन्न झालेली असते ह्यासाठी, सर्वस्वी विसंबून रहाणें ते अशाच सेवकावर राहिले पाहिजे. तेव्हां तुझा परिपाठ असाच आहे ना? राजा, सेवकांवर जीं कामे सोपविली जातात, त्यापैकी कोणती कामें पुरीं झाली, कोणतीं पुरी होत आली आहेत, व कोणती आरंभावयाची राहिली, इत्यादिक माहिती त्या सेवकास पूर्णपणे माहीत असली पाहिजे जर, ही माहितीं त्यास नसेल, तर ती कामे योग्य वेळी तयार होणार नाहीत तेव्हा तुझ्या सेवकाना ही सर्व आवश्यक माहिती नीटपणे असते ना?

हे राजश्रेष्ठा, राष्ट्राचा उदय हा त्या राष्ट्रातील ज्ञानमत्तेवर अवलबून असतो, आणि ज्ञानमत्ता आचार्यवर्गाच्या पात्रतेवर अवलबून असते. तेव्हा तुझ्या राज्यात जे आचार्य आहेत, ते श्रुतिस्मृत्यादिक धर्मशास्त्रात, धनुर्विद्येत व अन्य विषयात विशारद आहेत ना? तसेच ते शिष्यास धनुर्वेदादिक विद्या शिकवून उत्तम प्रकारे तयार करीत असतात ना? राजा, विद्वान पुरुषाची योग्यता मोठी असते ह्यासाठी, सहस्रावधि मूर्ख पुरुषाना खर्ची घालूनहि एका विद्वानास पदरी बाळगले पाहिजे कारण, महत्संकट प्राप्त झाले असता एक विद्वानच त्यातून आपणांस सोडवील ह्यास्तव तू विद्वान् पुरुषास हरतऱ्हेने सग्रही ठेवण्यास उत्सुक असतोस ना? धर्मा, राष्ट्रातील सर्व किल्ले हे धन, धान्य, उदक, आयुधे, यत्रे, कारागीर व योद्धे यानी सदासर्वकाळ परिपूर्ण असले पाहिजेत, नाही तर ते प्रसगी आपले कल्याण करण्याऐवजी आपले अकल्याणच करतील तेव्हा तुझ्या राज्यातील सर्व किल्ल्याची धनधान्यादिकानी समृद्ध स्थिति आहे ना? राजा, राजकीय व्यवहारात अमात्याची योग्यता फार श्रेष्ठ आहे इद्रियजेता, शूर, बुद्धिवान्, दूरदर्शी, व चतुर असा एक अमात्य राजाला किंवा राजपुत्राला महत्भाग्य प्राप्त करून देतो, हे लक्षात धर

हे अजातशत्रो, शत्रूकडील मत्री, पुरोहित, युवराज, सेनापति, द्वारपाल, अत पुररक्षक, कारागाराधिपति, धन वसूल करणारा कामगार, धन खर्चिणारा अधिकारी, उपदेशक, नगरस्वामी, कामे नेमून देणारा अधिकारी, धर्माध्यक्ष, पहारेकरी, किल्लेदार, सरहद्द संभाळणारे वीर आणि

अरण्यपालक अशा अठरा अधिकाऱ्यांवर आणि स्वत.कडील मत्री, पुरोहित व युवराज हे खेरीज करून बाकीच्या अधिकाऱ्यावर राजाने गुप्त हेराकडून टेहळणी राखावी प्रत्येक अधिकाऱ्याच्या मागे तीन तीन गुप्त हेर ठेवावे त्या हेरास कोणी ओळखू नये म्हणून त्याचा वेष पाखडी वगैरे लोकाप्रमाणे असावा त्या हेरामध्ये आपसातहि एकमेकाची एकमेकास ओळख पटू नये त्यानी बारीक नजर व तिखट कान सर्वत्र ठेवावा, आणि जे काही विशेष समजेल, ते आपल्या प्रभूस बिनचूक निवेदन करून स्वामिसेवा उत्कृष्ट बजावावी बा युधिष्ठिरा, ही सर्व व्यवस्था तू केली आहेस ना? हे शत्रुनाशका, हेराची व्यवस्था असली तरी राजानेहि स्वत दक्षतेने शत्रूवर दृष्टी ठेवली पाहिजे त्याने आपले हृद्गत परपक्षास कळणार नाही अशी सावधगिरी ठेवावी, आणि प्रसग आल्यास शत्रूचा निपात उडविता यावा म्हणून एकसारखे परिश्रम चालवावे, राजा, तुझ्या ठिकाणी ही सर्व तयारी आहे ना?

हे नयननिपुणा, चतुर्विध पुरुषार्थाची इच्छा करणाऱ्या नरपतीने पुरोहित नेमावयाचा तो आचारवान, कुलीन, बहुश्रुत, गुणज्ञ, अनिदक व उत्कृष्ट शिकविणारा असा नेमावा, आणि त्याचा उत्तम प्रकारे आदरसत्कार करावा, हे इष्ट आहे तेव्हा त अशा प्रकारचा सच्छील व सत्पात्र पुरोहित नेमून त्याचा आदरसत्कार करीत आहेस ना? राजा, अग्न्यागारावर, जो याजक ठेवावयाचा, तोहि असाच सर्वथा वदनीय असला पाहिजे त्यास याज्ञिक विधी उत्तम प्रकारे येत असावे तो मोठा प्रबुद्ध व सुस्वभावी असावा, आणि त्याने त्या काळी झालेले व होणारे होमहवन नेहमी यजमानास विदित करावे राजा, अग्निशालेवर जो याजक तूं नेमला आहेस तो त्या क्रियास पात्र असून होमहवनाबद्दलचे वर्तमान तुला यथाकाली विदित करतो ना? हे कुतिपुत्रा, राजगृही जो ज्योतिर्विद नेमावयाचा, तोहि आपल्या कामात कुशल असला पाहिजे सामद्रिक शास्त्रास अनुसरून त्यास अवयवपरीक्षा करिता यावी, धूमकेतू वगैरे दिव्य उत्पातांचें, धरणीकंप वगैरे भौम उत्पाताचे व वामनेत्रस्फुरण वगैरे दहिक उत्पाताचे त्यास यथायोग्य ज्ञान असावे. आणि त्या सर्वांवरून भावी अनर्थांचे बरोबर अनुमान करून त्याने राजास साहाय्य करावे. राजा, तुझ्या पदरी जो ज्योतिर्विद आहे, तो असाच आहे ना?

हे शत्रुदडना, राजाने अधिकाऱ्याची योजना करिताना त्याची पात्रापात्रता नीट मनात आणावी कार्याच्या महत्त्वाप्रमाणे त्यावर अधिकाऱ्याची नेमणूक केली पाहिजे जी कामे महत्त्वाची असतील, त्यावर तसेच मोठे अधिकारी नेमावे, जी कामे मध्यम असतील त्यावर मध्यम प्रकारचे सेवक नेमावे आणि जी कामे अगदी सामान्य असतील, त्यावर तसेच सामान्य पुरुष नेमावे मुख्य प्रधानाचे पद, सैन्यापत्य, रत्नाच्या खाणी, धनागार, कृषिनिरीक्षण इत्यादिक महत्त्वाच्या जागी वशपरपरागत कार्यभार लावणारे, अत्यत प्रामाणिक, अतिशय थोर व सदाचारसपन्न अशाच अधिकाऱ्याची नेमणूक केली पाहिजे, आणि इतर मध्यम व कनिष्ठ स्थानी त्या त्या स्थानाच्या योग्यतेप्रमाणे सेवकवर्गाची योजना करावी हे अत्यत आवश्यक आहे तेव्हा हे युधिष्ठिरा तुझी अशी पद्धति आहे ना?

हे भरतवर्षा, राजाने प्रजाचा प्रतिपाल करिताना त्यास अपत्यवत् मानले पाहिजे अपत्यास जशी वात्सल्याने शिक्षा करावयाची, तशी प्रजास वात्सल्याने शिक्षा केली पाहिजे प्रजास उग्र दड केल्यास त्यास राजशासन सहन होणार नाही आणि त्या अगदी त्रस्त व दीन होऊन जातील, ह्यास्तव तसे करणे उचित नाही तेव्हा तुझ्या राज्यात प्रजास उग्र दड होत नाही ना? राजा, प्रजाचा उत्कर्ष होण्यास मोठमोठ्या मसलती प्रधानादिकांच्या अभिप्रायानेच झाल्या पाहिजेत ह्यास्तव, त तसेच करीत असतोस ना? हे भरतकुलभूषणा, राजाने प्रजापासून कर वगैरे घेणें तो त्याच्या शक्तीप्रमाणे व बेताबेतानेच घेतला पाहिजे. तो प्रजास पिळून धनसचय करील, तर त्याचे ते करणे म्हणजे एक महापातकच होय.

जारकर्मी पुरुषांचा स्त्रिया जसा अनादर करितात, तसा याजकादि परम पूज्य पुरुष त्या प्रजापीडक राजाचा महापातक्याप्रमाणे अनादर करितात ह्यास्तव सुकीर्तिमान नरद्धेवाने ते दुष्कृत्य कधीहि करू नये राजा, तू आपल्या प्रजांपासून अशा प्रकारे निष्ठुरपणाने कधीहि धनसंग्रह करीत नाहीस ना? हे उदारबुद्धे, राज्याचा अभ्युदय होण्यास राज्यातील सेनापति, धनसपन्न, सुकीर्तिमान्, सतुष्ट, शूर, धोरणी, धीट, इमानी, कुलीन, राजनिष्ठ व सदोदित दक्ष असा पाहिजे. तेव्हा तुझा सेनापति तसा आहे ना? राजा, सैन्यावरचे दुसरे अधिकारी सुद्धा सर्व प्रकारच्या युद्धकलेत कुशल, समय जाणणारे, निष्कपटी व पराक्रमी असावे, आणि त्यास राजानें बहुमान द्यावा तेव्हा तुझे सेनाधिकारी तसे कुशल वगैरे असून तू त्याना बहुमान देतोस ना? धर्मा, सैन्याचा रोजचा शिधा, व महिन्यामहिन्याचे वेतन त्यास वेळच्या वेळी मिळाले पाहिजे ते उगीच लाबणीवर टाकू नये शिपायास शिधा व पगार जर वेळच्या वेळी मिळाला नाही तर, त्यांचे फार हाल होऊ लागतात आणि मग ते धन्यावर सतापून त्याजला महान सकटात पाडतात ह्यास्तव हे शत्रुदमना, तू सैन्याचा पगार, शिधा वगैरे वेळेवर देतोस ना ? राजा, प्रधानादिक सर्व राजपुरुष कुलीन व राजनिष्ठ असावे, त्यानी राजकार्याकरिता नेहमी युद्धामध्यें प्राण देण्यास सिद्ध झाले पाहिजे, हे उचित होय तेव्हा तुझे प्रधान वगैरे असे यथायोग्य व राजनिष्ठ आहेत ना? राजा, स्वदेशाचे रक्षण करण्याकरितां व परदेश जिंकून घेण्याकरिता जे सैन्य बाळगावयाचे, त्यावरील सत्ता एकाच्याच हाती उपयोगी नाही त्यावर निरनिराळे शूर अधिकारी असावेत. जर ती सत्ता एकाच पुरुषाच्या हाती असेल, तर कदाचित् तो पुरुष फितूर होऊन भलतेच वर्तन करू लागल्यास महान अनर्थ उद्भवेल राजा धर्मा, तू ह्या कामी योग्य दक्षता ठेवली आहेस ना ?

हे कुंतिपुत्रा, राजसेवकापैकी जे कोणी विलक्षण पराक्रम करून राजकार्य साधितात, त्यास अधिक मान, वेतन वगैरे मिळणे आवश्यक आहे जर ही व्यवस्था नसेल, तर अचाट कृत्य करण्याचा किंवा लोकोत्तर बुद्धि चालविण्याचा ते कधीहि प्रयत्न करणार नाहीत ह्यास्तव, बा धर्मा, तुझ्या राज्यात जे पुरुष असे विशेष कृत्य करितात त्यास तुझ्याकडून विशेष मान वगैरे मिळतो ना? राजा, विद्वान् व ज्ञानसपन्न पुरुषास त्यांच्या गुणानुरूप दानदक्षिणा मिळून त्याची सभावना झाल्याखेरीज राष्ट्राची विद्या व ज्ञान वाढणार नाही, म्हणन तू आपल्या राज्यातील विद्वानाची व ज्ञानवानाची योग्य सभावना करतोस ना? राजश्रेष्ठा, जे वीर राजकार्याकरिता धारातीर्थी शयन करितात, किंवा अन्य प्रकारी संकटात पडतात, त्याच्या अनाथ स्त्रियाचे पालनपोषण करणे हे राजाचे कर्तव्यकर्म होय तेव्हा तू त्याप्रमाणे करीत असतोस ना? हे वीरवरा, जेव्हा शत्रू भयाकुल होऊन, आर्त होऊन किवा पराजित होऊन शरण येतो, तेव्हा त्याचे पुत्रवत् पालन केले पाहिजे हा विहिताचार होय तुझ्या राज्यांत त्याप्रमाणे करण्याची पद्धत आहे ना ? बा पाडुतनया, राजाला 'सर्व प्रजा आपल्या कुटुंबातील मनुष्ये होत' असे वाटले पाहिजे व प्रजानी राजाविषयी आईबापाप्रमाणे भावना धरली पाहिजे राष्ट्रात असे जर अन्योन्य प्रेम वास करील तर त्या राष्ट्राचा उत्कर्ष होईल तेव्हा तुझ्या राज्यात हे अन्योन्य प्रेम आहे ना ? हे युधिष्ठिरा राजाने आपल्या शत्रूवर एकसारखी सूक्ष्म दृष्टि ठेविली पाहिजे कोणत्या वेळी शत्रूवर चालून गेल्यास तो आपल्या हस्तगत होईल, ह्याचे त्याने पूर्ण अवधान राखिले पाहिजे स्त्रिया, द्यूत, मृगया, मद्यपान इत्यादि व्यवसायामध्ये शत्रु दंग झाला असल्यास त्याचा विवेक भ्रष्ट झाला असे समजून त्याजवर चालून जाण्यास हरकत नाही, मात्र तसे करण्यापूर्वी प्रधानादिकाची सल्ला, धनादिकाची सुस्थिति व सैनिकाचा भरपूर पुरवठा ह्या त्रिविध बलाचे नीट मनन करावें, आणि ती सर्व तयारी आहे असे पाहून मोठ्या आवेशाने बेलाशक चाल करावी तेव्हा, धर्मा, तूं ह्याप्रमाणे करतोस ना?

हे अरिंदमा, विजयेच्छु पुरुषाने शत्रूवर चालून जाण्यापूर्वी बहुविध गोष्टीकडे लक्ष पुरविले पाहिजे (१) आपणास ज्याशी युद्ध करावयाचे आहे, त्याचे धैर्य, शौर्य, साहस, दूरदर्शित्व इत्यादि गुणाचे नीट निरीक्षण करावे व (२) त्या गुणाशी आपल्या अगच्या तदनुरूप गुणाची तुलना करून पहावी, नतर शत्रूचे मित्र व त्या मित्राचे मित्र, तसेच आपले मित्र व आपल्या मित्राचे मित्र कोण-कोण व कितपत विश्वसनीय आहेत, ह्याचा बरोबर अदाज करावा पुढे आपल्या मित्र-मडळाच्या समीप आपली पाठ राखण्याकरिता, उत्तेजन देण्याकरिता उभे असणारे वीर कश प्रकारचे आहेत, आणि त्याच्याशी समीप त्यास मदत करण्याकरिता व सावरून धरण्या-करिता कोणकोण सिद्ध आहेत ह्याचे उत्कृष्ट मनन करावे मग आपणाकडे व आपल्या शत्रूकडे तटस्थ वृत्तीने दृष्टि ठेवणाऱ्या पुरुषाचे हृदय ओळखावे, आणि शेवटी सर्वांच्या पृष्ठभागी अगदी उदासीनपणे वर्तन करणाऱ्या अधिकाऱ्याची परिस्थिति न्याहाळून पाहावी राजा, हे अव-लोकन केल्यावर, त्यापैकी कोणाचा अवमान झालेला आहे की काय, कोणाचे वेतन थकले आहे की काय, कोणी स्वार्थपर होऊन धनादिकास लुब्ध झाला आहे काय, इत्यादिक पहावे, आणि नतर ते अधिकारी स्वपक्षाकडील असल्यास त्याचे मनोरथ परिपूर्ण करून असतोषाचे बीज काढून टाकावे; आणि इतके सर्व केल्यावर शत्रुपक्षाच्या ठिकाणी ती विद्यमान नाहीत अशी खातरजमा करून घ्यावी, आणि नतर उदक, अग्नि, व्याधि, दुर्भिक्ष, पटकी इत्यादिकापासून आपत्ति प्राप्त होण्याचा सभव आहे की काय ह्याविषयी दैव-ज्ञाचे अनुमत काढून मग शत्रूवर चाल करावी, हे उचित होय ह्यास्तव, हे सर्व करण्याचा तुझा परिपाठ आहे ना? हे भरतश्रेष्ठा, स्वसेनेचा सतोष व परसेनेची फितुरी ही विजयाची मुख्य साधने आहेत तेव्हा तू युद्धास निघण्यापूर्वी आपल्या सैन्याचा पगार आधी देतोस ना? त्या प्रमाणें शत्रुसैन्यातील अग्रणी पुरुषास वश करून घेण्याकरितां रत्नादिकाच्या गुप्त भेटी पाठ-वितोस ना? हे धर्मा, विजयेच्छु राजाने प्रथम इद्रियाचे दमन करून कार्याकार्यविचार करावा, आणि नतर शत्रुपक्षात अव्यवस्था आहे असें दिसताच त्यावर चाल करून जावे, हा धर्म होय. तेव्हा तू असेच करतोस ना? हे शत्रुतापना, युद्ध करून रक्तस्राव करणे हे होता होईतो टाळले पाहिजे ह्यास्तव, शत्रुनाशास उद्युक्त झाल्यावर प्रथम साम, दाम, दड, भेद हे चार श्रेष्ठ उपाय योजावे, ह्या उपायाची उत्तम प्रकारे योजना केल्यास प्राणहानि न होता आपला उद्देश सिद्धीस जातो तेव्हा, तू हाच क्रम अनुसरतोस ना? हे प्रजापालका कोणत्याही राजाने आणखी देश जिकण्यास उद्यक्त होण्यापूर्वी आधी मिळविलेले देश आपल्या ताब्यात ठाम राहण्याकरिता त्याचा बदोबस्त उत्तम ठेवून मग शत्रूवर चाल करून जावे, नाही तर हातचे सोडून पळत्याच्या पाठीस लागल्याप्रमाणे होईल तेव्हा ज्या ज्या वेळी तू शत्रूवर चाल करतोस, त्या त्या वेळी मागे नीट व्यवस्था ठेवतोस ना? हे वीरपुगवा, शत्रूला जिकणे व जिकल्यावर त्याचे योग्य प्रकारे रक्षण करणे हेच वीराचे खरे शौर्य आहे तेव्हा तू शत्रूस हस्तगत करून त्याचे रक्षण नीटपणे करतोस ना? हे पाडुपुत्रा, सैनिकाच्या अगी मुख्यत्वेकरून चार गुण असले पाहिजेत (१) ते सत्कुलात जन्मलेले असावे, (२) त्याच्या ठिकाणी उत्तम राजप्रीति असावी, (३) त्यास 'राजा हा आपला पालन-पोषण करणारा होय' असे वाटत असावे, (४) त्यानी रानावनात फिरून पडेल ती राजसेवा करण्यास उद्युक्त व्हावे राजा, सैन्याची प्रमुख अगे आठ होत ती रथ, गज, अश्व, वीर, पायदळ, मजूर, हेर व मार्गदर्शक ही आहेत सेनापतीनी अष्टाग परिपूर्ण व चतुर्विध गुणमडित असे सैन्य कवाईत शिकवून तयार करावे, आणि मग शत्रूच्या अगावर चालून जाऊन त्याचा पूर्ण विध्वस उड-वावा असा हा मुख्य क्रम होय राजा युधिष्टिरा, हे सर्व तुझे सेनापति करतात ना?

हे शत्रुमर्दना, शत्रूवर स्वारी करण्यापूर्वी आपल्या व शत्रूच्या सैन्याची वगैरे स्थिति नीट पारखली पाहिजे. तशीच स्वारी करण्याची वेळ

कोणत्या प्रकारची आहे, ह्याचाहि योग्य विचार केला पाहिजे. शत्रूवर हल्ला करावयाचा तो शत्रूस प्रतिकूल अशा वेळी केला पाहिजे शत्रूच्या देशांत धान्यादिकाचा तुटवडा पडण्याचा सभव आहे व प्रजाजन दुष्काळाच्या भीतीने गांगरून जात आहेत अशा समयी शत्रूवर चाल करून जावे, म्हणजे शत्रूकडून शिपायास धान्यादिक मिळत नाहीसे होऊन शत्रुसैन्य बेदिल होऊन, आपणास अनायासे जय मिळेल राजा धर्मा, तूं शत्रूवर चाल करताना ह्या नियमाचे उल्लघन करीत नाहीस ना ? हे नीतिविशारदा, राजाने स्वराष्ट्रात व परराष्ट्रात अनेक अधिकारी नेमावे, व त्यांनी आपापली कामे योग्य प्रकारे करून राजकार्य साधावे, हे योग्य होय तेव्हा तू जे अधिकारी नेमले असशील ते आपापली कामे निष्कपट बुद्धीने करून आपसात एकमेकाना जपत असतात ना ?

हे वीरवरा, राजाच्या चरितार्थास लागणारे, भक्ष्यभोज्य पदार्थ, वस्त्रेपात्रे, कस्तुरी वगैरे सुवासिक वस्तु इत्यादिकाचे सरक्षण राजसेवकांनी उत्तम प्रकारे करावे आणि हे पदार्थ परदेशांतून आणिल्यास त्याचा मध्यतरी अपहार होऊं नये ह्यास्तव राजाने स्वत दक्षता ठेविली पाहिजे. तेव्हा त्याप्रमाणे तू सर्व करतोस ना ? हे पृथानंदना, धनागार, वाहने, द्वारे, आयुधे, जमाबंदीचा वसूल, इत्यादि कामावर राजाचे सदव कल्याण चिंतणारे राजभक्त अधिकारी असणे इष्ट होय ह्यास्तव तुझ्या राज्यात ही सर्व सुव्यवस्था आहे ना? बा धर्मा, राजास कोठून शत्रू उत्पन्न होतील ह्याचा नेम नाही, ह्याकरिता आचारी वगैरे राजवाड्यात राहणाऱ्या लोकांपासून राजाने प्रथम आपले सरक्षण करण्याची सावधगिरी ठेवावी आणि नतर, आपल्या पुत्रादिकांपासून त्या अधिकाऱ्यास सुरक्षित राखावे व शेवटी ते राजसेवक आपसात कलह करणार नाहीत अशी खबरदारी घ्यावी. हे कुंतिपुत्रा, हे जर घडले नाही, तर कोठून व केव्हा अरिष्ट उद्भवेल, ह्याचा भरवसा धरतां येणार नाही राजा, ही सर्व दक्षता तूं ठेवली आहेस ना?

हे धर्मा, राजाची सपत्ति सदा सर्वकाळ थोड्याबहुत प्रमाणाने वाढत असली पाहिजे; आणि हा उद्देश मनात धरून खर्चाची व्यवस्था राखली पाहिजे सुभिक्ष (स्वताई) असताना जमेच्या चौथ्या भागात राजाने खर्च करावा, दरादामाचे मान मध्यम असताना जमेचा द्वितीयाश खर्च करावा, आणि दुर्भिक्ष (दुष्काळ) असताना जमेच्या तीन हिश्यात सर्व खर्च चालवावा राजा, हा नियम पाळून तू सदैव कोशवद्धि करीत असतोस ना? धर्मनदना, आप्त, गुरु, वृद्ध, वाणी, कारागीर व पदरची माणसे ह्याचे दुष्काळात वगैरे हाल होऊ लागले असता, त्यास वारवार पैसा देऊन, हातभार लावणे राजाचे मुख्य कर्तव्य होय ह्यास्तव अशा प्रसगी आप्तादिकास तू हातभार लावतोस ना? हे भरतश्रेष्ठा, जमाखर्चाचे कामावर जे कामगार नेमिलेले असतात, त्यानी दररोज जमा किती आली व खर्च किती झाला हे नेहमी प्रात काळी राजास कळविले पाहिजे त्याप्रमाणे ते तुला रोज कळवितात ना? हे धर्मनदना, जे अधिकारी आपल्या कामात वाकबगार असून राजहिताविषयी नित्य तत्पर असतात आणि त्यायोगे राजाची प्रीति सपादितात, अशा अधिकाऱ्याना विनाकारण कामावरून काढून टाकणे हा केवळ दुराचार होय जर त्याच्यावर काही अपराध लाग होत असेल, तर त्यास काढून टाकणे न्यायाचे होईल; परतु तसे न करिता केवळ लहरीखातर अगर काही अन्य हेतूने त्यास कामावरून दूर केल्याने सर्वत्र अस्वस्थता व बेदिली उत्पन्न होईल, आणि त्यामुळे राजाला शेवटी विपत्ती भोगाव्या लागतील ह्यास्तव, बा धर्मा, अशा प्रकारे अयोग्य वर्तन तुजकडून कधी घडत नाही ना? हे भारता, अधिकारी लोकाची नेमणूक करितानाहि फार दूरवर विचार करावा लागतो कामाचा मगदूर पाहून त्याप्रमाणे त्यावर योग्य सेवकाची योजना करावी उत्तम, मध्यम व अधम असे तीन प्रकारचे सेवक असतात; ह्यास्तव कामाचीहि उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशी तीन प्रकारची वर्गवारी लावून त्यावर त्या त्या कामात उपयुक्त असे लोक

नेमावे, राजा, तू हे सर्व करीत असतोस ना? राजा, कित्येक राजसेवक नेमताना जरी योग्य म्हणून नेमले असले, तरी केव्हा केव्हा त्यामध्ये पुढे कित्येक दुर्गुण दृष्टीस पडतात अशा प्रसगी जे राजसेवक दुर्गुणी आहेत असे आढळून येईल त्यास कामावरून काढून टाकले पाहिजे राजा, तुझ्या पदरी जे सेवक आहेत, त्यात कोणी लोभी, चोर, दावेदार, किंवा मूर्ख असे नाहीत ना? युधिष्ठिरा, प्रजाचा सतोष व कृषिवलाचा उत्साह ही दोन ऐश्वर्यवृद्धीची निश्चित कारणे होत राष्ट्रात चोराचा व ठकाचा सुळसुळाट झाला, नव्या तरण्या लोकाचे अथवा स्त्रियाचे प्राबल्य होऊन प्रौढ व बहुश्रुत लोकाचे वर्चस्व नष्ट झाले, किंवा राजाच मदाध होऊन प्रजास लुटू लागला म्हणजे प्रजाचा व कृषिवलाचा पूर्ण नाश झाला म्हणून समजावे ह्याकरिता, हे सुनीतिमता, अशी अस्वस्थता तुझ्या राज्यात नाही ना? हे नरश्रेष्ठा, राष्ट्रातील कृषि निवळ पर्जन्यवृष्टी-वरच अवलबून राहू नये, कृषिकर्मासाठी मोठ-मोठाले तलाव काही विशिष्ट अतरावर नित्य उदकाने परिपूर्ण राहतील अशी व्यवस्था आहे ना? युधिष्ठिरा, कृषीचा उत्कर्ष व्हावा, ह्याकरिता कृषिवलाची सुस्थिति राखण्याकडे राजाने लक्ष पुरविले पाहिजे त्यापाशी पोटगी व बी भरपूर आहे की नाही, ह्याची राजाने चौकशी करावी, आणि सदयतेने दरमहा दरशेकडा एकाहून अधिक व्याज न घेता त्यास कर्ज द्यावे बा धर्मा, तू हीच पद्धति ठेविली आहेस ना? हे भरतकुलभूषणा, लोकाचे सुख—समाधान वाढविणे हे राजाचे प्रधान कर्तव्य आहे राष्ट्रात सुशील व थोर लोक जे व्यवसाय करीत असतील, ते त्याचे व्यवसाय अव्याहत व उत्तम प्रकारे चालले तर लोकास उत्साह येऊन त्याचे सुखसमाधान वाढते ह्यास्तव, तुझ्या राज्यात कृषि, वाणिज्य, पशुपालन, व्याजबट्टा हे लोकाचे धदे नीटपणे चालत आहेत ना ?

हे युधिष्ठिरा, प्रत्येक ग्रामात राजाने नेमलेले पाच पाच अधिकारी कायमचे असावे ते प्रशास्ता (जमाबदीचा ठराव करणारा कामगार), समाहर्ता (वसुली कामगार), सविधाता (कुळाची समजूत घालणारा कामगार), लेखक व साक्षीदार हे होत हे पाचही अधिकारी शूर, शहाणे, व एकमताने काम करणारे असावे, राजा धर्मा, तुझ्या देशातील ग्रामात ही सर्व व्यवस्था नीटपणे चालली आहे ना? राजा, राष्ट्रामध्ये प्रात, ग्राम, नगरे, व पुरे ह्या चतुर्विध लोकवस्तीच्या जागा, त्या सर्व पूर्णपणे राजाच्या स्वाधीन असल्या पाहिजेत प्रातातून राजनियुक्त कराचा जो वसूल येईल, तो प्राताधिपतीच्या हवाली करावा, ग्रामातून जो कर वसूल होईल तो ग्रामाधिपतीने नगराधिपतीकडे पोचवावा अशा तऱ्हेने देशाधिपतीने सर्व वसूल राजास अर्पण करावा, हे राजा, तुझ्या ग्रामादिकाची व्यवस्था नीट आहे ना ?

हे कुतीतनया, राष्ट्रामध्ये बदोबस्ताच्या नगरास व सामान्य नगरास चोरटे लोक उपद्रव देत असल्यास त्याचा शोध लावून नाश करण्यास सैन्याच्या टोळ्या फिरत्या ठेवल्या पाहिजेत तुझ्या राज्यात ती व्यवस्था आहे ना ? आबालजनाचे सरक्षण करून त्यावर दुःखप्रसग आल्यास त्याचे सात्वन करणे हे राजाचे कर्तव्य आहे तेव्हा, ही गोष्ट तू करीत असतोस ना ? बा धर्मा, स्त्रियाच्या ठिकाणी शरीरबलाप्रमाणे मानसिक बलही कमीच असते ह्यास्तव त्याच्यावर भरवसा ठेवणे किंवा त्यास एकादी गुप्त मसलत सागणे हे सर्वथा भयप्रद आहे तेव्हा हे सर्व मनात आणून तू स्त्रियावर विश्वास वगैरे ठेवून त्यास गुह्य गोष्ट सागत नाहीस ना ?

हे शत्रुनाशका, काही अहितकारक, प्रसग ओढवणार असे कळल्याबरोबर राजाने त्याच्या प्रतिकाराचा विचार एकदम आरंभिला पाहिजे. अशा समयी अतःपुरात विलास भोगीत पडून राहून जर तो त्या प्रसगाकडे दुर्लक्ष करील तर त्याचा व त्याच्या देशाचा नाश झाला म्हणून समजावे तू त्याप्रमाणे वागत नाहीस ना? हे विशालकीर्ते, रात्रीस दुसऱ्या व तिसऱ्या प्रहरास निद्रा घेऊन नतर चौथ्या प्रहरी उठून धर्म व अर्थ

ह्याचे चिंतन करावे योग्य वेळी उठून व वस्त्र-भूषणे धारण करून समयज्ञ मंत्र्यांशी सल्ला-मसलत करावी व त्याजबरोबर कोणी भेटीसाठी वगैरे आले असतील, त्याचे म्हणणे ऐकून घेऊन त्याचा विचार करावा तुझी पद्धत अशीच आहे ना ? हे अरिंदमा, राजाने स्वसंरक्षणार्थ आसमताद्-भागी सशस्त्र सेवक ठेवावे त्यांचा पोशाख लाल रंगाचा असावा, व त्यांनी अलंकार धारण करून प्रभुसेवेत तत्पर रहावे तुझे सेवक अशा प्रकारे तुझ्या सेवेला दक्ष असतात ना ?

हे पांडुनंदना, दुर्जनास उग्र दंड करणे आणि सज्जनास अतिशय मान देणे, हे उचित आहे तू ते करतोस ना? हे पृथापुत्रा, राजाने आपल्या शरीरास किंवा मनास विकृति झाली असता तिचे निवारण करण्याचा नेहमी यत्न करावा त्याने शारीरपीडा औषधोपचारांनी व पथ्यसेवनाने दूर करावी, आणि मानसिक पीडा वृद्धजनांच्या बोधामृताने घालवावी वैद्य हे अष्टांगचिकित्से-मध्ये निपुण असले पाहिजेत राजा तुझ्या पदरी जे वैद्य आहेत ते सर्व तसे आहेत ना? ते तुझ्या आरोग्यास जपतात ना?

हे समदृष्टे, आपल्यापुढे जे वादीप्रतिवादी येतात त्यांचे म्हणणे शांत चित्ताने ऐकून घेऊन यथायोग्य निर्णय करणे हे राजाचे प्रधान कर्तव्य होय लोभ, मोह, अभिमान, इत्यादिकांस वश होऊन राजा जर त्या कर्तव्याकडे दुर्लक्ष करू लागेल तर ते त्याचे दुर्वर्तनच समजावे राजा स्वकर्तव्यापासून भ्रष्ट झाल्यास घोर अनर्थ घडतात 'माझी सत्ता अनियंत्रित आहे' असे जर राजाला वाटले तर त्याचे सर्व वैभव हरपलेच म्हणून समजावे म्हणून प्रत्येक लहान मोठे कार्य करिताना त्याने आपली विवेकबुद्धि चालविली पाहिजे तू नेहमी विचार करून कार्यारंभ करतोस ना?

हे शत्रुमर्दना राष्ट्रातील लोक सदैव राजनिष्ठ राहतील अशी व्यवस्था राजाने करावी शत्रू-पासून लांच वगैरे घेऊन राजाशी द्रोह करण्यास उद्युक्त असलेल्या लोकांचे समुदाय म्हणजे राजाच्या अभ्युदय मार्गातील दुःसह कंटकच होत तेव्हां असे कृतघ्न पुरुष तुझ्या राज्यात तुझा द्रोह करीत नाहीत ना ? एकदा दुर्बल केलेला शत्रु पुन्हा डोके वर उचलण्याचा प्रयत्न करतो त्याच्यावर तुझी नीट नजर असते ना? त्याला पुन्हा प्रबल होऊ देत नाहीस ना? दान व मान ह्याच्या योगे वश केलेले मांडलिक राजे तुझ्या ठिकाणी अनुरक्त असून तुजसाठी प्राण देण्यास तयार आहेत ना ?

हे निष्पापा, दुर्बलांना शोक व सज्जनांना संताप येईल असे वर्तन कधीही असू नये तू तसा वागत नाहीस ना ?

सत्कुलात जन्मलेल्या, स्वभावाने उत्तम व निर्मल आचरणाच्या अशा एकाद्या साधु पुरुषावर चोरी वगैरे निंद्य कृत्याचा विनाकारण आरोप आला असता, त्यास व्यर्थ शासन होणे हे अनुचित होय हा अनाचार तुझ्या राज्यात घडत नाही ना ? तसेच, एकादा दुष्ट पुरुष चोरी वगैरे निंद्य कृत्य करीत असताना पाळत वगैरे राखून मुद्देमालासुद्धा पकडला असताना अमात्यादिकांनी पैशाच्या लोभाने त्यास सोडून देणे योग्य नाही तुझ्या राज्यात असे प्रकार घडत नाहीत ना ?

हे युधिष्ठिरा, अग्निहोत्र हे वेदाचे फळ होय, दान करणे, व उपभोग घेणे धनाचे फळ होय, रतिसुख व पुत्रप्राप्ति हे पत्नीचे फळ होय, आणि सौजन्य हे श्रवणाचे फळ होय तेव्हा ही सर्व फळे तुला प्राप्त झाली आहेत ना ?

राजा युधिष्ठिरा, तुझ्या राज्यात आयात व निर्यात मालावर वाजवीपेक्षा जास्त जकात आकारली जात नाही ना ? कारण, त्यायोगे राज्या-तील व्यापारास धोका येण्याचा संभव असतो धर्मा, कारागीर लोकांना तू मदत करतोस ना?

राजा धर्मा, मी सांगितलेल्या ह्या नियमा-प्रमाणे जो राजा चातुर्वर्ण्याचे रक्षण करितो, तो ह्या लोकी सर्व सुखोपभोग मिळवून शेवटी इंद्र लोकास गमन करितो लोकप्रिय होण्यास ह्या सर्व मार्गांचा तू अवलंब कर

* * *

## राज्यरक्षण व सैन्यभरती कशी करावी ?

युधिष्ठिर विचारतो —(शातिपर्व अ ८७, ८८, ८९) हे भरतकुलश्रेष्ठा राजा, राष्ट्राचे सरक्षण कसे करावे व राष्ट्र स्वाधीन कसे ठेवावे हे मला उत्कृष्ट प्रकारे जाणण्याची इच्छा आहे म्हणून ते सागा

भीष्म सागतात —ठीक आहे मी तुला राष्ट्राचे सरक्षण करण्याचा आणि राष्ट्र स्वाधीन ठेवण्याचा सर्व प्रकार उत्कृष्ट प्रकारे सागतो, तो तू एकाग्र अत करणाने ऐक राजाने प्रत्येक गावाचा एक प्रतिनिधी करावा तसेच दहा गावाचा, वीस गावाचा, शभर गावाचा व हजार गावाचा असे अधिपती करावे अधिकाऱ्यास गावकऱ्याचे जे दोष कळून येतील ते त्याने वरील अधिकाऱ्यास कळवावे उपभोगण्यास योग्य अशा ज्या वस्तू गावात असतील, त्याचा उपयोग अधिकाऱ्याने करावा व त्याने दशग्रामपतीचेहि पोषण करावे आणि त्यानेहि आपल्याहून श्रेष्ठ अशा विशतिग्रामाधिपतीचे पोषण करावे हे राजा, शभर गावाच्या व्यवस्थेवर ज्याची योजना झाली असेल, त्याच्या उपभोगार्थ विशाल, धनधान्यादिकाची अत्यत वृद्धि असलेला व लोकानी व्याप्त असा एक गाव बहुमानपूर्वक देणे योग्य आहे हे भारता, त्याला उपभोगावयास दिलेल्या गावावर अनेक गावाचे पालन करणाऱ्या दुसऱ्याच एका अधिकाऱ्याचा अधिकार असावा सहस्राधिपतीने राष्ट्रावरील इतर अधिकाऱ्यासह हिरण्य आणि राजधानीसमीपच्या भागातील कर वगैरे वेतनरूपाने ग्रहण करावे त्याच्याकडे सग्राम करण्याचे काम असावे अधिकाऱ्याच्या कार्यावर धर्मज्ञ व तत्पर अशा एका सचिवाची दृष्टि असावी नक्षत्रामध्ये जसा ग्रह असतो तसा प्रत्येक नगरामध्ये मूर्तिमत भीतिच असा एक सर्व कार्ये पाहणारा मत्रि मोठ्या अधिकारावर नेमावा त्याने आपल्या त्या ग्रामाधिपति वगैरे सर्व सभासदाकडे जाणेयेणें ठेवावे, आणि देशासबधी त्याचे वर्तन कसे आहे हे त्याच्या दूराने येऊन कळवावे

युधिष्ठिरा, प्रजेचे सरक्षण करण्यासाठी नेमलेले अधिकारी प्रजेचा वध करण्याची इच्छा असलेले, पापवासनायुक्त, परद्रव्याचा अपहार करणारे आणि शठ असतात. त्याच्यापासून या प्रजेचे रक्षण केले पाहिजे वैश्य लोकाचा क्रय, विक्रय, भोजनखर्च, त्यानी आक्रमण केलेला मार्ग त्याचा परिवार आणि त्याचे योगक्षेम या सर्वांचा विचार करून त्याप्रमाणे राजाने त्याजवर कर बसवावे युधिष्ठिरा, राजाने प्रजेकडून लहानमोठे कर न्यायाने घ्यावे पण ज्या योगाने प्रजेचा नाश होणार नाही अशीच त्याने कराची योजना करावी प्राप्तीचा आणि प्रयत्नाचा विचार करून मगच कर बसवावे कारण राजाने प्राप्तीहून अधिक कर बसविल्यास प्रयत्न व प्राप्ति याचा काहीच उद्देश सिद्ध होणार नाही कोणतेही कार्य करणारा पुरुष आणि राजा या दोघानाहि त्या कार्याच्या योगाने होणाऱ्या लाभाची प्राप्ति होईल, अशाच रीतीने विचार करून राजाने कर बसवावे उगीच लोभाने आपली आणि परक्याचा मूलोच्छेद करू नये लोभाची सर्व दारे निरुद्ध करून राजाने सर्वांवर प्रेमदृष्टि ठेवावी

राजा फार खादाड (कर लुबाडणारा) आहे असे प्रसिद्ध झाल्यास प्रजा त्याचा द्वेष करू लागतात, आणि त्या द्वेष करू लागल्या म्हणजे कल्याण कोठून होणार? ज्याच्यावर प्रजेचे प्रेम नाही, अशा राजाला काहीही फलप्राप्ति होत नाही हे भरत कुलोत्पन्ना युधिष्ठिरा, राजाने विचारशक्ति क्षीण होऊ न देता जरूर तेवढाच कर घ्यावा जो राजा स्वत राष्ट्राचे सरक्षण करून त्याजवर अनुग्रह करतो, व त्याजपासून उत्पन्न होणाऱ्या करप्राप्तीवर उपजीविका करतो, तोच लोकप्रिय होतो सकटप्रसगी उपयोगी पडावे म्हणून राजाने राष्ट्रामध्ये द्रव्य व्याजाने देऊन त्याची अभिवृद्धि करावी तसेच राष्ट्र हा एक खजिनाच असावा व त्याच्या मदिरामध्येहि खजिना असावा त्याने आपल्या देशातील जवळच्या व दूरच्या आश्रितावर व ज्याच्यापाशी कमी द्रव्य असेल अशावरहि आपल्या शक्तीच्या अनुरोधाने दया करावी बाहेरच्या अर्थात्

अरण्यवासी चौरादिक लोकाना "तुम्ही जवळ येऊन रहा" असे सागून मध्यम स्थितीतील लोकांकडून अनायासे द्रव्यादि वस्तू सपादन कराव्या असे केले असतां सुखी आणि दु खी प्रजाहि त्याच्यावर कोप करीत नाही

"चोराचा निग्रह करण्यासाठी तट वगैरे बाधले पाहिजेत" अशी प्रथम सूचना देऊन नतर आपल्या देशात ठिकठिकाणी फिरून देशावर ओढवणारे सकट लोकाच्या दृष्टोत्पत्तीस आणून द्यावें "हे सकट उत्पन्न झाले आहे, परचक्राची मोठी भीति आहे, कळकाला आलेली फळे जशी त्याच्या नाशाला कारणीभूत होतात, तशी आम्हाला होणारी द्रव्यप्राप्तिहि आमच्या नाशालाच कारणीभूत होत आहे माझे शत्रू अनेक चोराचे सहाय्य घेऊन मजवर उठलेले आहेत या विपत्तीतून तुमचे सरक्षण करण्यासाठी मी तुमच्याकडे द्रव्य मागत आहे ही भीति नाहीशी झाली म्हणजे मी ते सर्व द्रव्य तुम्हाला परत देईन आता जर तुम्ही असे केले नाही, तर शत्रु बलात्काराने या राष्ट्रातील द्रव्य घेऊन जातील व परतहि देणार नाहीत स्त्रीपुत्रादिकासाठी जरी द्रव्यसग्रह करणे तुम्हाला जरूर वाटत असले तरी ते व्यर्थ आहे कारण शत्रु तुमच्या बायकामुलाना ठार करील तुमच्या प्रभावाने मला भारी आनद होत आहे. मी तुम्हाला त्रास न होईल अशा रीतीने सामर्थ्यानुरूप तुम्हाकडून द्रव्य घेईन आपण वृषभाप्रमाणे आपत्काली कार्यभार ग्रहण केला पाहिजे कोणत्याहि सकटप्रसगी द्रव्यावर अतिशय प्रीति करीत बसू नये" असे सौम्य मधुर आणि औपचारिक शब्द बोलून कालवेत्त्या राजाने द्रव्य संपादन करून नतर आपला पराक्रम गाजवावा

युधिष्ठिरा, तटबदी, पोष्यपोषण, व्यय, युद्धभीति आणि योगक्षेम याचा विचार करून राजाने व्यापार करणाऱ्या लोकावर कर बसवावा अरण्यवासी वैश्याची राजाने उपेक्षा केल्यास ते नाश पावतील, म्हणून त्याच्याविषयी विशेषत सौम्यपणाचे आचरण ठेवावे. हे कुंतिपुत्रा, राजाने वैश्याचे वारंवार सांत्वन करावे, रक्षण करावे, त्याना द्रव्य अर्पण करावे, त्याच्या वास्तव्याची व्यवस्था करावी, व त्याना आपल्या सपत्तीचे भागीदार समजून त्याचे प्रिय करावे वैश्य लोक देशाचा अभ्युदय करतात, व्यापार वाढवितात व शेतीहि करतात म्हणून दयाशील आणि सुज्ञ राजाने न चुकता व सौम्य कर बसवून वैश्यावर प्रयत्नपूर्वक प्रेम करावे सर्वत्र प्रेम करावे हा गुण वैश्याच्याच ठिकाणी दिसून येतो, म्हणूनच हे युधिष्ठिरा, त्याच्यासारखे उत्तम प्रजाजन दुसरे कोणी नव्हत

राजा, मद्यपान करण्याची गृहे, वेश्या, दूत, द्यूत खेळणारे, व अशाच प्रकारचे इतर लोक असतील त्याचे नियमन करावे कारण हे देशात राहिले तर कल्याणसपन्न अशा प्रजेस त्रास देतात आपन्नावस्थेवाचन कोणी कोणाकडे काहीहि मागू नये, अशी पूर्वी मनूने व्यवस्था केली होती म्हणून अशाच रीतीने वागून सर्वांनी आपली उपजीविका चालविली पाहिजे जर कोणीहि मनुष्ये कामेच करीतनाशी झाली आणि याचनेवर उपजीविका करू लागली, तर हे सर्व लोक नि सशय नामशेष होऊन जातील अशा प्रकारच्या लोकाचे नियमन करण्याचे सामर्थ्य असताही जो राजा त्याचे नियमन करीत नाही, त्याला त्याजकडून होणाऱ्या पातकाचा चतुर्थांश भोगावा लागतो, असे वेदवचन आहे ज्याप्रमाणे राजा हा प्रजेच्या पुण्याचा भोक्ता आहे त्याप्रमाणेच तिजकडून होणाऱ्या पातकाचाहि तो भोक्ता आहे म्हणूनच हे प्रजाधिपते, राष्ट्रामध्ये जे दुष्ट लोक असतील, त्याचा राजाने सदैव निग्रह केला पाहिजे मद्यादिकाच्या स्थानाचा सर्वथैव विरोध करावा

परिवार मुळीच नसून जे लोक सकटात सापडल्यामुळे याचना करतात त्याना केवळ धर्मबुद्धीने कृपापूर्वक दान करावे, त्याची भीति बाळगून करू नये तुझ्या राष्ट्रामधे याचना करणारे आणि चोर याचे अस्तित्व मुळीच न राहो. या याचना करणाऱ्याना दान करणारे हे केवळ दातेच होत ते प्राण्याचे हितचितक नव्हत जे लोक प्राण्यावर उपकार करतात व प्रजेचा उत्कर्ष

करतात, तेच तुझ्या राष्ट्रामध्ये राहोत प्राण्यांचें हितचिंतन न करणाऱ्या लोकाचे अस्तित्व तुझ्या राज्यात नसावे

हे महाराजा, जे कोणी अधिकारी प्रजेकडून योग्य असलेल्या द्रव्यापेक्षा अधिक द्रव्य ग्रहण करतील त्याना तू शिक्षा केली पाहिजे ते योग्य रीतीने प्रजेकडून कर घेतील अशी व्यवस्था दुसऱ्या अधिकाऱ्याकरवी करविली पाहिजे कृषि, गो-रक्षण, व्यापार, आणि अशाच प्रकारचे जे दुसरे काम असेल ते अनेक लोकाकडून करवावे नाही तर ती कर्मे अगदी नष्ट होऊन जातील. कृषि, पशुपालन, आणि व्यापार करू लागलेल्या, मनुष्याला जर चोर अथवा अधिकारी याच्या त्रासामुळे सशयित स्थिति प्राप्त झाली तर त्यामुळे राजाची निदा होते राजाने अन्नदान आणि वस्त्रे याच्या योगाने सदैव द्रव्यसपन्न अशा लोकाचा बहुमान करावा आणि " माझ्यावर व प्रजेवर अनुग्रह करा " असे त्यास सागत असावे

हे भरतकुलोत्पन्ना, द्रव्यसपन्न पुरुष हे एक राज्याचे मोठे अग आहे, इतकेच नव्हे तर तो सर्व प्राण्यास केवळ वशिडच आहे यात सशय नाही ज्ञानसपन्न, शूर, द्रव्य आणि ऐश्वर्ययुक्त, धर्मनिष्ठ, तपस्वी, सत्यवादी, आणि बुद्धिमान असणारा मनुष्य रक्षण करू शकतो म्हणून हे पृथ्वीपते तू सर्वांवर प्रेम ठेव आणि सत्य, सरलता, शाति व घातुकत्वाचा अभाव याचे पालन कर अशा रीतीने वागल्यास दडशक्ति, द्रव्यसग्रह, मित्र आणि भूमि याचा तुला लाभ होईल साराश, हे राजा, तू मित्रबल आणि कोशबल यानी युक्त होऊन सदैव सत्य आणि सरलता यावर निष्ठा ठेवून राहा

**राष्ट्रसंरक्षण**—तुझ्या राज्यामध्ये ज्याची फळे भक्षण करण्यास योग्य आहेत अशी झाडे कोणीहि छिन्न करू नयेत कारण फळे आणि मुळे यावर ब्राह्मणाचा अधिकार असतो असा धर्म ज्ञानसपन्न लोकानी सागितला आहे ब्राह्मणानी पालन केले नाही म्हणून कोणीहि दुसऱ्याने ज्यावर त्याचा हक्क असेल त्या द्रव्यादिकाचे अपहरण करू नये

हे प्रजाधिपते, ब्राह्मण जर आपल्या उपजीविके-साठी देशत्याग करूं लागला तर राजानें त्याला परावृत्त करण्याचा प्रयत्न करावा जर तो "आतां मी देशत्याग करण्याच्या वेळी तू माझ्या उप-जीविकेची व्यवस्था करीत आहेस काय ? " असे म्हणाला तर हे कुतिपुत्रा, पूर्वीची स्थिति आपणाला माहीत नाही असे दाखविणे हाच उपाय आहे " हे ब्रह्मन् लोक असे म्हणत होते पण मी त्यावर विश्वास ठेवला नाही " असे सागन त्याला हव्या असतील त्या वस्तू देऊन आणि त्याच्या उपजीविकेची व्यवस्था करून त्याला ठेवून घ्यावे

राजा, कृषि, गोरक्षण, आणि व्यापार हे इहलोकीचे उपजीविकेचे साधन असून वेदांत सागितलेली कर्मे ही पारलौकिक जीवनाची साधने होत वेदाच्या अभ्यासाने मनुष्याचा अभ्युदय होतो वेदाचे सरक्षण करण्यासाठीच ब्रह्मदेवाने क्षत्रिय निर्माण केले हे प्रजापालका, तूं शत्रूचा पराभव कर, प्रजेचे सरक्षण कर, अनेक प्रका-रचे यज्ञ कर आणि शौर्याचे अवलबन करून रणागणात युद्ध कर जो राजा सरक्षण करण्यास योग्य अशा पुरुषाचे पालन करतो तोच सर्व राजात अत्यत श्रेष्ठ होय जे राजे अशा लोकांचे सरक्षण करीत नाहीत त्याचा काही देखील उप-योग नाही युधिष्ठिरा, राजाने सर्व लोकांच्या हितासाठी सदैव युद्ध केले पाहिजे स्वकीय लोकापासून परकीयांचे व परकीयापासून स्वकी-याचे रक्षण केले पाहिजे, आणि परकीयापासून परकीयाचे व स्वकीयापासून स्वकीयांचे संरक्षणहि केले पाहिजे साराश हे युधिष्ठिरा, तूं सदैव सर्वांचे पालन कर तू स्वत चे सरक्षण करून पृथ्वीचे पालन कर कारण जे कांही सर्व राष्ट्रा-दिक आहे त्या सर्वांस मुख्य आधार आत्मा हाच आहे

युधिष्ठिरा, आपले छिद्र कोणते आहे, आपण कोणत्या व्यसनामध्ये आसक्त आहो, कोणाचे निर्मूलन करावयाचे अवशिष्ट राहिले आहे व कोणते कर्म केले असतां आपण दोषी होऊं याचा

राजाने नेहमी विचार केला पाहिजे तसेच आपल्या हातून झालेल्या कार्याची लोक प्रशसा करीत आहेत की नाहीत हेंहि पाहिले पाहिजे यासाठी गुप्त हेराचा सर्व पृथ्वीवर प्रसार करावा लोकाना आपले आचरण आवडते का व राष्ट्रात आपली कीर्ति झाली आहे काय याचाहि विचार राजाने करावा धर्मवेत्ते, धैर्यसपन्न व सग्रामातून पलायन न करणारे अशापैकी जे लोक राष्ट्रामध्ये उपजीविका करीत राहिले असतील, अथवा जे राजलब्ध द्रव्यावर निर्वाह करीत असतील, ते सर्व अमात्य, आणि इतर लोक यापैकी जे कोणी तुझी स्तुति अथवा निंदा करीत असतील त्या सर्वांचा तू उत्कृष्ट प्रकारे सत्कारच कर कारण, कोणतीहि गोष्ट सर्वांना सारख्याच रीतीने अत्यत आवडणे शक्य नाही हे भारता, मित्र, शत्रु आणि मध्यस्थ हे सर्वांना आहेतच

युधिष्ठिर विचारतो —ज्याचे बाहुबल व गुण ही सारखीच आहेत, त्यापैकी एकादाच मनुष्य अधिक श्रेष्ठ कसा होतो ? व तो मनुष्याचा कसा उपयोग करून घेतो ?

भीष्म सागतात — बलवान लोक नेहमीच दुर्बलावर आपली उपजीविका चालवितात युधिष्ठिरा, अशा प्रकारचे लोक राजाचे शत्रु असल्यामुळे त्याच्याविषयी नेहमी सावध असले पाहिजे कारण दुर्लक्ष आहे असे दिसून येताच, गृध्राप्रमाणे असलेले हे लोक एकदम झडप घालतात

युधिष्ठिरा, तुझ्या राज्यात व्यापारी लोक करपीडित व म्हणूनच उद्विग्न झालेले नाहीत ना ? स्वल्प अधिक मूल्याच्या योगाने वस्तु विकत घेणाऱ्या त्या लोकाना विश्रातीसाठी अरण्यातहि मुक्काम करता येतो ना ? जे राजाचा करभार धारण करून इतराचेहि पोषण करतात ते कृषि करणारे लोक अत्यत त्रास होऊन राष्ट्रत्याग करीत नाहीत ना ? युधिष्ठिरा, इहलोकी केलेल्या दानाच्याच योगाने देव, पितृगण, मनुष्य, नाग, आणि पशुपक्षी याचा सर्वांचा निर्वाह होतो. हे भारता, याप्रमाणे मी तुला ही राष्ट्राची उपजीविका व राजाचे सरक्षण याविषयीची माहिती सागितली आहे

* * *

**सैन्याविषयीं** (शातिपर्व अ १००)

युधिष्ठिर विचारतो — हे भरतकुलश्रेष्ठा पितामहा, विजयेच्छु पुरुष प्रसग पडल्यास धर्माला किंचित् बाधित करूनही सेवेमध्ये उत्साह कसा उत्पन्न करतात ते मला सागा

भीष्म सागतात —कित्येकाच्या मते सत्याच्याच योगाने धर्माला स्थैर्य येते, इतराच्या मते क्षत्रियाने सग्रामामध्येच मरण्याचा निश्चय बाळगल्यास त्याला स्थिरता येते, काहीच्या मते शिष्टाचार पालन केल्यानेच त्याला दृढता येते, आणि काहीच्या मते राजशासनाची भीति दाखवून त्या उपायाने झालेली प्रवृत्तिच धर्माच्या स्थैर्याला कारणीभूत हाते आता मी धर्म आणि अर्थ याचे सद्य फलदायक असे उपाय सागतो निर्मर्याद असे जे लोभ ते धर्म आणि अर्थ अशा दोहोचे विघातक असतात सर्व कार्यांची सिद्धि होण्यासाठी मी सागतो ते उपाय ऐक

हे भारता, सरळ आणि वक्र अशा दोन्ही प्रकारच्या मार्गांचे ज्ञान सपादन करावे वक्र मार्गाचे ज्ञान असले तरीहि त्याचे अवलबन करू नये पण तशा प्रकारच्या मार्गाचे वर्तन प्रतिपक्षाकडन झाल्यास त्याच्याविरुद्ध उपाय योजावे भेदबुद्धि धारण करून राजाची सेवा करणारे लोक हे शत्रुच असतात म्हणूनच त्याची ती प्रतारणा कळून येताच शत्रप्रमाणे त्याना पीडा द्यावी हे कुतिपुत्रा, गजसमुदाय, लोह, सहाणेवर घासलेली व पाणी दिलेली शस्त्रे, तोमर आणि खड्ग ही आयुधे, घाट असलेले परशु, बाणाची फळे आणि ढाली याची अनेक प्रकारे योजना करावी कवाइतीत उपयोग करून पाहिलेली शस्त्रे असावी व कृतनिश्चय असणारे योद्धे असावे चैत्री किवा मार्गशीर्षी पौर्णिमेस शत्रूवर सैन्य पाठविणे चागले कारण त्यावेळी धान्याचे पीक आलेले असते, भूमिही जलसपन्न असते, आणि अतिशय शीतहि नव्हे आणि उष्णहि नव्हे असा

काल असतो, म्हणूनच त्यावेळी शत्रूवर स्वारी करावी, अथवा शत्रु सकटात असेल त्यावेळी करावी शत्रूना त्रास देण्यास हे योग फार चागले असतात जल आणि तृण यानी युक्त असलेल्या, सपाटीच्या आणि नेहमी वनात राहणाऱ्या निपुण अशा हेराना ज्या आसपासच्या प्रदेशाची माहिती आहे अशा मार्गाने जाणे प्रशस्त होय आघाडीला कुलीन आणि शक्तिमान पुरुषाचे सैन्य असावे, व जलसपन्न असून ज्याच्या सभोवती मैदान आहे असा दुर्ग हे वसतिस्थान असावे कारण त्यामुळे शत्रूच्या स्वारीला प्रतिबध होतो मैदानापेक्षा अरण्याचे सान्निध्य बरे कारण त्यामध्ये अनेक गुण आहेत असे युद्धप्रवीणाचे मत आहे दुर्गाच्या जवळच सैन्याचा तळ असावा सैन्याची छावणी देणे, पायदळाचे गोपन करणे आणि शत्रू येताच त्याजवर उलट मारा करणे हेच सकट हटविण्याचे मुख्य साधन आहे आपल्या पाठीमागे सप्तर्षी येतील अशा रीतीने म्हणजे दक्षिणाभिमुख होऊन व पर्वताप्रमाणे स्थिर होऊन युद्ध करावे चिखल, पाणी व ढेकळे नसतील अशा ठिकाणीच अश्वाचे राहण्याचे ठिकाण असावे, असे युद्धप्रवीण लोक म्हणतात खळगे नसलेली भूमि रथाला योग्य होय लहान लहान झुडुपे, मोठे गवत आणि उदक असलेली भूमि गजारूढ होऊन युद्ध करण्यास योग्य होय दिवस चागल्या प्रकारचे असतील तरच सैन्यामध्ये रथ आणि अश्व विपुल असणे योग्य आहे व वर्षाकाल असेल तर पायदळ आणि हत्ती याचीच सख्या जास्त असावी अशा प्रकारे सैन्याचे गुण व देश आणि काल याचा विचार करून सैन्याची योजना करावी

सैन्यामध्ये दहा लोकाचे व शभर लोकाचे निरनिराळे अधिपति करावे आणि शूर व आलस्यशून्य अशा पुरुषाला हजार लोकाचे आधिपत्य द्यावे युद्धास जाण्याच्या वेळी सैन्यातील सर्व प्रमुख लोकाना एकत्र करून त्याना सागावे की, विजयाविषयी आम्हाला सशय आहे म्हणूनच युद्धात आपण एकमेकाना सोडून चालणार नाही ज्याला भीति वाटत असेल त्यानें येथूनच परत जावे जे लोक लढत असता आपल्यांतील मुख्य पुरुषाचा शत्रूकडून वध होऊ देतील, ते शत्रचा हल्ला परतवन त्याचा पराभव करणार नाहीत सग्रामातून पळणारा स्वत चा व स्वपक्षाचा नाश करतो पळून गेल्याने अपकीर्ति तर होतेच पण द्रव्यनाश होऊन मरणप्राय दु खहि होते पळणाऱ्याविषयी कर्णकठोर व म्हणूनच दु खदायक असे शब्द लोक उच्चारीत असतात दात आणि ओठ याचा विध्वस झालेला, सर्व प्रकारच्या आयुधाचा त्याग केलेला आणि शत्रूंनी चोहोकडून घेरलेला असा जो योद्धा त्याची दशा आमच्या शत्रूनाच प्राप्त व्हावी युद्धातून पळून येणारे लोक केवळ नराधम असून नुसते लोकसख्या वाढविणारे मात्र आहेत त्याचा इहलोकी अथवा परलोकी काही उपयोग नाही

युधिष्ठिरा, विजय मिळाल्यामुळे आनदित झालेले शत्रु चदन आणि अलकार धारण करून सग्रामातून पलायन करणाऱ्या पुरुषाचा पाठलाग करीत असतात रणागणावर असलेले शत्रु ज्याच्या कीर्तीचा समूल नाश करून टाकतात त्याला होणारे ते अत्यत असह्य दु ख माझ्या मते मरणाहूनहि अधिक आहे "वीरहो, जय हाच धर्माचे आणि सर्व प्रकारच्या सुखाचे मूलकारण आहे, भित्र्या लोकाना ज्यामुळे अत्यत ग्लानि येते त्या सग्रामकर्माचा शूर पुरुष स्वीकार करतो आम्ही शत्रूचा पराजय करीत असतां जरी आम्ही मरण पावलो तरीहि आम्हाला सद्‌गति मिळेल " असे सागितल्यानतर शपथ वाहून जीविताची पर्वा न करणारे व भीतीचा लेशही न बाळगणारे शूर पुरुष शत्रुसैन्यामध्ये प्रवेश करतात आघाडीस ढाली आणि तरवारी असलेल्याचे सैन्य आणि पिछाडीस सामान वगैरे राखून मध्ये कुटुबातील मनुष्ये ठेवावी शत्रूवर उलट मारा करण्यासाठी, त्या ठिकाणी जे मुख्य मुख्य वृद्ध असतील, त्यानी त्यानी प्रोत्साहन द्यावे जे बलाढ्य, सन्माननीय आणि बुद्धिमान् योद्धे असतील त्यानी प्रथम व त्याच्या अनुरोधाने इतर लोकानी चाल करावी

या वेळी भीरु लोकांना देखील प्रयत्नपूर्वक प्रोत्साहन द्यावें कारण, आपल्या सैन्याचा समुदाय मोठा आहे एवढें दिसण्यासाठी तरी त्यानी सान्निध्यास असले पाहिजे. शत्रु येऊन भिडले म्हणजे सेनापतीने त्याच्याशी प्रथम थोडयाच लोकाकडून युद्ध करवावे व नतर आपल्या अंदाजाप्रमाणे पुष्कळ सैन्याची योजना करून विस्तार करावा शत्रूवर चाल करून गेल्यानतर आपला उत्कर्ष असो अथवा अपकर्ष असो आणि सत्य असो अथवा असत्य असो, हात वर करून "शत्रूचा पराजय झाला, मला साहाय्यकर्त्या सैन्याचे पाठबळ येऊन पोहोचले ! आता आपण निर्भयपणे प्रहार करा !" असे ओरडून बोलावे, म्हणजे प्रोत्साहन मिळाल्यामुळे अधिक बळ चढून भयकर शब्द करीत वीर लोक शत्रूचा सहार करतात या वेळी सिहनाद व कलकलाट चाललेले असावे आघाडीच्या लोकाकडून रणवाद्याचा ध्वनि करवावा

* * *

केवळ बाजारी व एका विचाराने न भरलेले असे लोक धूर्त कार्यकर्त्यानि कसे युक्तीने हस्तगत करावे याविषयी रामदास म्हणतात—

उदंड बाजारी मिळाले । परी ते धूर्तेचि आळिले।
धूर्तांपासी काही न चाले । बाजाऱ्याचे ॥ २५॥
या कारणे मुख्य मुख्य । तयासी करावे सख्य ।
येणेंकरिता असख्य । बाजारी मिळती ॥ २६ ॥
धूर्तासि धूर्तचि आवडे । धूर्त धूर्तीच पवाडे ।
उगेचि हिडती वेडे । कायवीण ॥ २७ ॥ धूर्तासि धूर्तपण कळले । तेणे मनास मन मिळाले । परी हे गुप्तरूपे केले । पाहिजे सर्वे ॥ २८ ॥ समर्थांचे राखतां मन । तेथें येती उदड जन । जन आणि सज्जन । आर्जव करिती ॥ २९ ॥ वोळखीने वोळखी साधावी । बुद्धीने बुद्धि बोधावी । नीतिन्यायें वाट रोधावी । पाखाडाची ॥ ३० ॥वेष धरावा बावळा । अतरी असाव्या नाना कळा । सगट लोकाचा जिव्हाळा । मोडू नये ॥ ३१ ॥

दासबोध दशक १५ समास १—ओव्या २५-३१

* * *

## गनिमी काव्याची लढाई कशी करावी?

### मनुस्मृति अध्याय ७ (९९-११०)

न जिकलेले जिंकण्याची इच्छा करावी, जिंकलेले प्रयत्नाने रक्षण करावे, रक्षिलेलें अधिकाधिक वाढवावें, आणि त्याचा सत्पात्री व्यय करावा हे चार प्रकारचे आचरण पुरुषार्थाचे साधन आहे यास्तव राजाने आळस सोडून या चारी उपायांचे अनुष्ठान करावे जे जिकलेले नाही ते पराक्रमाने जिकण्याची इच्छा करावी, जिंकिलेल्यावर सतत दृष्टि ठेवून त्याचे रक्षण करावे रक्षिताची व्यापारादिक करून वृद्धि करावी, आणि असे वाढलेले जे धन त्याचा दानात व्यय व्हावा शासनदड सतत सज्ज ठेवावा, अस्त्रविद्येच्या द्वारा आपले सामर्थ्य नित्य प्रगट करीत असावे, सर्व गोष्टी गुप्त ठेवाव्या, शत्रूच्या न्यूनतेकडे एकसारखे लक्ष ठेवावे ज्या राजाचा शासनदड नेहमीच सज्ज असतो, त्याला सर्व जग भिते यास्तव सर्व प्राण्यास दडानेच आपल्या आधीन करून घ्यावे अमात्यादिकाशी कपटाने वागू नये, त्याच्याशी निष्कपट बुद्धीनेच वागावे शत्रूनी केलेले कपट दूताच्या द्वारा जाणावे स्वत ची न्यूनता शत्रूला कळणार नाही अशी खबरदारी घ्यावी, पण शत्रूचे छिद्र मात्र हुडकून काढावे कासव ज्याप्रमाणे आपले अवयव शरिरात लपवून टाकते, त्याप्रमाणे राजाने आपले न्यून कधीही दिसू देऊ नये बकाप्रमाणे एकाग्रतेने आपल्या ध्येयाबद्दल विचार करावा, पराक्रम सिहासारखा करावा, झडप लाडग्याप्रमाणे घालावी, आणि सशाप्रमाणे हुलकावणी दाखवून एकदम निसटून जावें याप्रमाणे विजय मिळविण्यास प्रवृत्त झालेल्या राजास जे प्रतिबधक होतील त्या सर्वांस त्याने सामादिक उपायानी वश करून घ्यावे पहिल्या तीन उपायानी जर ते वश न झाले, तर बलात्काराने युद्ध करून त्यास आपल्या स्वाधीन करून घ्यावे सामादिक चार उपायापैकी ज्ञानी लोक राष्ट्राच्या अभिवृद्धीसाठी, साम व दंड याचीच विशेष प्रशसा करितात ज्याप्रमाणे शेतकरी शेतातून रान उपटून टाकून धान्याचे रक्षण

करितो, त्याप्रमाणे शत्रूचा उच्छेद करून राजाने राष्ट्राचे रक्षण करावे.

* * *

## स्त्रियांचें सामाजिक महत्त्व

मनुस्मृति अध्याय ३ (५५–६२)

उत्तम कल्याणाची इच्छा करणाऱ्या बाप, भाऊ नवरा व दीर यानी स्त्रियाचा सत्कार करावा व वस्त्रालकारानी त्याना भूषित करावे ज्या ज्या ठिकाणी स्त्रियाची पूजा केली जाते, तेथील देवता प्रसन्न होतात, व ज्या ठिकाणी याचे पूजन होत नाही तेथे केलेली सर्व कर्मे निष्फळ होतात ज्या कुलामध्ये स्त्रियाना दुःख व कष्ट सोसावे लागतात त्या कुलाचा लवकरच नाश होतो, पण ज्या कुलात त्याना दुःख होत नाही त्या कुलाची भरभराटच होते आपल्याला कष्ट दिल्याबद्दल स्त्रिया ज्या घराना शाप देतात त्या घराचा, अभिचार कर्मांनी नष्ट झाल्याप्रमाणे सर्व बाजूनी नाश होतो म्हणून समृद्धीची इच्छा करणाऱ्या पुरुषानी सत्कार समारभात व उत्सवाच्या वेळी भूषणे, वस्त्रे व खाद्य पदार्थ यानी स्त्रियाची पूजा करावी ज्या कुलामध्ये नवराबायको एकमेकावर सतुष्ट असतात त्या कुलाचे निश्चयाने अक्षय कल्याण होते स्त्री जर सतुष्ट व आनदी राहिली नाही तर ती नवऱ्याला आनदित करू शकणार नाही, व नवरा जर आनदित झाला नाही तर गर्भधारणा होणार नाही सुखी स्त्री आपल्या सर्व कुलाला सुखी करते पण तीच जर सुखी नसेल तर कोणालाच सुख लाभत नाही

मनुस्मृति अध्याय ९ (७४–७५)

काही कार्य उद्‌भवले असता पुरुषाने पत्नीच्या अन्नवस्त्राची तजवीज करून देशातरी जावे, कारण अन्न व वस्त्र नसल्यामुळें पीडित झालेली स्त्री जरी शीलसपन्न असली तरी नाइलाजास्तव परपुरुषसपर्क करते अन्नवस्त्राची व्यवस्था करून पति देशातरी गेला असता, स्त्रीने नियमयुक्त राहावे, व तशी व्यवस्था न करतां तो गेला असेल, तर अनिद्य शिल्पकाम करून त्यावर तिनें आपला निर्वाह करावा

* * *

**रावणवधः—**

(युद्धकाड सर्ग १०३ श्लोक १०–१९)

“हे राक्षसाधमा, मला समजू न देता ज्याअर्थी निरुपाय होऊन गेलेली माझी भार्या तू हरण करून नेलीस त्याअर्थी त वीर्यवान् नाहीस. अरे, माझ्या विरहित महावनामध्ये असलेली दीन सीता दाडगाईने हरण करून तू स्वतःला शूर समजत आहेस अनाथ स्त्रियाचे ठिकाणी शौर्य गाजविणाऱ्या रावणा, परस्त्रीला स्पर्श करण्याचे नीच कर्म करून तू स्वतःला शूर मानीत आहेस मर्यादा सोडून वागणाऱ्या निर्लज्जा, अनन्वित कृत्ये करणाऱ्या राक्षसा, गर्वाने मृत्यूचे अवलबन करूनही तू ‘मी शूर आहे’ असे स्वतःला मानीत आहेस! खरोखर सैन्ययुक्त असलेला तू कुबेराचा भ्राता मोठाच शूर आहेस! आणि लोकानी प्रशसा करण्यासारिखे हे मोठे कीर्ति वाढविणारे कर्म तू केले आहेस! गर्वामुळे जे निंद्य व अनिष्ट कर्म ते तू केले आहेस! त्याचे भयकर फल आज भोग हे दुर्बुद्धि रावणा, ‘मी शूर आहे’ असे तू स्वतःला समजत आहेस, परतु चोराप्रमाणे सीता हरण करणाऱ्या तुला लाजच नाही मी सनिध असताना तू जर तिच्याशी मर्यादा सोडून दाडगाईने वागला असतास तर त्याच वेळी माझ्या बाणाच्या योगाने वध पावून भ्रात्या खराच्या भेटीला तुला जावे लागले असते, परतु हे मूढा, आज सुदवाने तू माझ्या दृष्टी पडला आहेस. मी आता तीक्ष्ण बाणाच्या योगाने तुला यमसदनी पोचवितो ”

* * *

## रामानें सांगितलेलीं रावणवधाचीं कारणें

(युद्धकाड—सर्ग ११५—श्लो १–१७)

बाजूला नम्रपणे उभी राहिलेली ती सीता-

अवलोकन करून रामाने आपले हृद्‌गत प्रगट केले "हे कल्याणी, सग्रामामध्ये शत्रूचा पराजय करून या तुला मी जिकून आणिले आहे साराश, पुरुष-प्रयत्नाने जे काही करिता येण्यासारखे आहे ते मी केले आहे आज क्रोधाची समाप्ति झाली असून शत्रूने केलेल्या स्त्रीहरणरूप अपमानाचीहि मी फेड केली आहे, आणि अवमान व शत्रु या दोहोचेही पारिपत्य मी एकदमच केले आहे आज माझा पराक्रम लोकाच्या दृष्टीस पडला, आज माझ्या श्रमाचे सार्थक झाले, आज मी माझी प्रतिज्ञा शेवटास नेली, आणि आज मी स्वतत्र झालो चचल चित्ताने युक्त असलेल्या राक्षसाने तुला एकटी असताना नेले हा अनर्थ दैवामुळे घडला व तो मी मनुष्यसाध्य पराक्रमाने नाहीसा केला अवमान झाला असता जो तेजाच्या योगाने त्याचे परिमार्जन करीत नाही त्या मदमति पुरुषाचा पराक्रम जरी मोठा असला तरी त्याचा काय उपयोग ? अपमानाचे परिमार्जन करणाऱ्या मनुष्याच्या हातून जे होण्यासारखे आहे ते मी लौकिकाची चाड बाळगणाऱ्या रामाने रावणाचा वध करून केले आहे साराश, सपूर्ण प्राण्यापैकी कोणालाही जिच्यावर हल्ला करता येणार नाही, अशा तुला तपश्चर्येने अतकरण शुद्ध असलेल्या अगस्त्य मुनीनी प्राप्त करून घेतलेल्या दक्षिणदिशेप्रमाणे मी प्राप्त करून घेतले आहे तुझें कल्याण असो

* * *

## मंदोदरी विलाप

युद्धकाड सर्ग १११–श्लो ६४–७८

मदोदरी म्हणाली —" दीन व भाग्यहीन झालेली मी विलाप करीत असताना माझ्याशी का बरे आपण भाषण करीत नाही ? हे राजा, ज्या अनेक कुलस्त्रिया तू विधवा करून सोडिल्यास त्या पतिव्रता–धर्माविषयी तत्पर व गुरुसेवेविषयी नेहमी उद्युक्त होत्या, आणि त्याच शोकसतप्त झालेल्या स्त्रियानी शाप दिल्यामुळे तू शत्रूचे तावडीत सांपडलास तू अपकार केलेल्या त्या पतिव्रता स्त्रियानी त्यावेळी जो तुला शाप दिला होता त्याचे हे फळ साप्रत प्राप्त झाले आहे. हे राजा, पतिव्रता स्त्रियाचे अश्रू विनाकारण कधीहि भूमीवर पडत नाहीत, म्हणजे ते भयकर अनर्थावह ठरतात हे म्हणणें तुझ्यासबधाने सत्यच ठरले आहे

* * *

## सर्वांनीं शस्त्र उचलावें (महाभारत)

### क्षत्रियांशिवाय इतरांनीं शस्त्रग्रहण करण्याचा प्रसंग

युधिष्ठिर विचारतो —हे तात, क्षत्रियाचे सामर्थ्य जेव्हा क्षीण झालेले असते, तेव्हा राजा लोकाचे सरक्षण कसे करू शकतो व तो लोकाना आधारभूत कसा होतो, याचा मला सशय आहे तरी आपण मला त्याविषयी सागावे

भीष्म सागतात—दान तप, यज्ञ, द्वेषशून्यता, आणि इद्रियदमन ह्याच्या योगाने ब्राह्मण-प्रभृति वर्ण आपले कल्याण व्हावे अशी इच्छा करितात आणि त्यापैकी जे मत्रबलसपन्न असतात ते इद्राचे सामर्थ्य वृद्धिगत करणाऱ्या देवताप्रमाणे सर्व बाजूनी उद्योग करून राजाचे सामर्थ्य वृद्धिगत करतात हीन दशेस पोहोचू लागलेल्या राजाला ब्राह्मण हाच मुख्य आधार होय म्हणूनच ब्राह्मणाच्या सामर्थ्याचे सहाय्य घेऊनच सूज्ञ राजाने उद्योग करावा जेव्हा या भूतलावर विजयी झालेला राजा आपले राष्ट्र क्षेमसपन्न करतो, तेव्हा सर्व वर्ण अपापल्या धर्माप्रमाणे कसेतरी वागू लागतात पण, युधिष्ठिरा, जर लोकाच्या प्रवृत्तीची मर्यादा सुटून गेली व चोर अथवा म्लेच्छादि दस्यु यानी सकर करण्याचे आरभिले, तर सर्व वर्णांनी शस्त्रग्रहण करणे दोषावह नाही देश आणि काल या कारणाच्या अनुरोधाने धर्मालाहि अधर्माचे स्वरूप येते व अधर्मही धर्मस्वरूपी बनतो कारण देश आणि काल याचा तसाच प्रभाव आहे सर्व प्राण्याशी मित्रत्वाने वागणारे लोक क्रूर कर्मे करूनही उत्कृष्ट अशा स्वर्गाची प्राप्ति करून घेतात कारण विशेषामुळे पातक केले तरीही

धर्मनिष्ठ लोकाना उत्कृष्ट प्रकारची गति मळते. आणि म्हणूनच ब्राह्मणाने तीनहि कालामध्ये आत्मसंरक्षणासाठी वर्णसकर होऊ लागला असता अथवा उद्दाम लोकाचे नियमन करण्यासाठी शस्त्रग्रहण केल्यास दोष नाही

युधिष्ठिर विचारतो---शत्रूचे सैन्य युद्धाविषयी उद्युक्त झाले असता, व इतर लोकाना क्षत्रियाचे प्रजापालनरूपी कर्म करण्याचे ज्ञान नसल्यास, क्षत्रियावाचून अन्य अर्थात् ब्राह्मण, वैश्य अथवा शूद्र ह्यापैकी कोणी सामर्थ्यसपन्न असून त्याने शत्रूपासून प्रजेचे सरक्षण केले, तर त्याने पुढे राज्य करावे की नाही? शस्त्रग्रहण तर अशा प्रसगी क्षत्रियावाचून इतरानी करणे आवश्यक आहे

भीष्म सागतात---अपार आणि नौकाशून्य अशा सकटरूपी समुद्रामध्ये जो मूर्तिमत परतीर अथवा नौकाच झालेला असतो तो जरी शूद्र असला अथवा दुसरा कोणी असला, तरी त्याचा सर्वथैव सन्मान करणेच योग्य आहे राजा, शत्रूनी पीडित झाल्यामुळे अनाथ होऊन मार्गप्रतीक्षा करीत असलेले लोक ज्याच्या आश्रयामुळेच सुखाने नादतात, त्याचाच त्यानी प्रेमाने आपल्या बाधवाप्रमाणे बहुमान करावा कारण, हे कुरुकुलोत्पन्ना, भीतीचा नाश करणाऱ्या मनुष्याचा पुनपुन सन्मान करणे योग्य आहे जे जुपण्याच्या उपयोगी नाहीत ते बैल, दूध न देणारी गाय, वध्या स्त्री, आणि सरक्षण न करणारा राजा याचा काय उपयोग आहे? ज्याप्रमाणे काष्ठाचा हत्ती, चर्माचा केलेला हरीण, षढ पुरुष आणि पीक न होणारे शेत, त्याप्रमाणेच अध्ययन न करणारा ब्राह्मण, प्रजापालन न करणारा राजा, आणि जो वृष्टि करीत नाही तो मेघ हे सर्वथैव निरर्थक होत जो सदैव सज्जनाचे सरक्षण करून दुष्टाना हाकून देतो, तोच राजा केला पाहिजे, त्याच्याच आधारावर हे सर्व विश्व चालत असते

* * *

## शत्रूशीं कपटाचें वर्तन

(शातिपर्व अ १०५)

(राजा--क्षेमदर्शी, मुनि--कालक वृक्षीय)

मुनि म्हणाले---हे क्षत्रिया, आतां जर तुला आपल्या ठिकाणी काही पौरुष आहे असे वाटत असेल, तर राज्यप्राप्तीसाठी मी तुला नीति सागतो त्या नीतीची योजना करण्याचे जर तुला सामर्थ्य असेल, आणि जर तू तिच्या अनुरोधाने कार्य करणार असशील, तर मी तुला जे तत्त्व सागत आहे ते सर्व तू पूर्णपणे ऐकून घे हे ऐकून जर तू उद्योग केलास, तर तुला विपुल द्रव्य, राज्य, राज्यप्राप्तीची मसलत, किवा मोठी सपत्ति पुनरपि प्राप्त होईल तेव्हा जर हे तुला आवडत असेल तर पुन साग, म्हणजे मी तुला ती नीति सागतो

राजा म्हणाला---हे प्रभो, माझ्या अगी पौरुष आहे तेव्हा भगवतानी मला नीति सागावी.

मुनि म्हणाले---दभ, काम, क्रोध, हर्ष, आणि भीति याचा त्याग करून, प्रणाम करून व हात जोडून तू शत्रूचीहि सेवा कर आणि अत्यत उत्कृष्ट प्रकारे शुचिर्भूत राहून व चागली कर्मे करून तू त्याची मर्जी सपादन कर राजा तुला वेतनाच्या रूपाने द्रव्य देईल तू आपल्या आचरणाच्या योगाने सर्व लोकाना प्रमाणभूत व सर्वांचाहि नियता होशील पुढे निर्व्यसनी, शुचिर्भूत आणि उत्साहसपन्न असे साहाय्यकर्ते तुला मिळतील अत-करणाचा निग्रह आणि इद्रियाचा जय करून स्वधर्माने वागणारा स्वत ला सकटातून वर काढतो. नतर तुला मित्राचे पाठबळ मिळाले म्हणजे उत्कृष्ट प्रकारे मसलत करणाऱ्या मत्र्याच्या साहाय्याने गुप्त विचार करून आपल्या विश्वासू लोकाकडून शत्रूमध्ये फाटाफूट कर, आणि ज्याप्रमाणे बेलफळाने बेलफळ फोडतात त्याप्रमाणे तू शत्रूकडूनच शत्रूचा नाश कर अथवा दुसऱ्याशी सधि करून या शत्रूच्या सैन्याचाहि वध कर सुदर आणि दुर्लभ असे पदार्थ, स्त्रिया, वस्त्रें, शय्या, आसने, महामूल्य वाहने, गृहे, पक्षी, पशुसमुदाय, रस, सुगधि पदार्थ, आणि फळे यांज-

वर तू शत्रूची आसक्ति उत्पन्न कर त्या योगाने त्याचा नाश होईल अशा स्थितीत एकाद्या वेळी त्याचा निषेधही करावा व त्याची उपेक्षाहि करावी पण उत्कृष्ट प्रकारच्या नीतीची इच्छा करणाऱ्या पुरुषाने शत्रु केव्हाही उघड दशेस आणू नये शत्रूच्याही देशामध्ये तू आनदाने रहा कारण, अशा स्थितीत तसे वागणें सूज्ञ लोकाना ममत आहे पाळल्या कावळ्यासारखे व म्हणूनच अनर्थकारक अशा लोकाशीहि तूं मैत्री ठेव दु साध्य अशी प्रचंड कार्ये करण्याकडे तू त्या शत्रूची प्रवृत्ति कर; व त्याच्याशी विरोध करणाऱ्या पुरुषापैकी जे बलाढ्य असतील त्याच्याशी महानदीप्रमाणे दुस्तर असे विरोध उत्पन्न कर मोठमोठी मूल्यवान उपवने, शय्या, आसने इत्यादिकाच्या उपभोगसुखाच्या योगानेच त्याच्या खजिन्यातील द्रव्य नाहीसे करून सोड तसेच, यज्ञ, दान ह्यासाठी प्रसिद्ध प्रसिद्ध ब्राह्मणाचे वर्णन करून त्याना निमत्रण करण्याविषयी तू त्याला साग, म्हणजे ते ब्राह्मण तुझ्या उपकाराची फेड करतील व त्याला लाडग्यासारखे खाऊन सोडतील तू त्या शत्रूला मनुष्य लोकासबधी काही कार्ये न सागता दैविक कर्माचे त्याच्यापुढे वर्णन कर

> कारण केवळ दैविक कार्याविषयी तत्पर होऊन राहिलेला मनुष्य नि सशय नाश पावतो

दाने केल्याने थोर पुरुषाची पीडा दूर होण्याचा सभव आहे असे सागून त्याजकडून दाने करविण्याचे मनात आणावे, व त्या योगानेहि त्याचा द्रव्यव्यय करावा, आणि सर्व शत्रुनाशक अशा खात्रीच्या औषधाचा प्रयोग करून कपटाने त्याचे गज, अश्व आणि लोक नष्ट करून सोडावे

या आणि दुसऱ्याहि अनेक प्रकारच्या दाभिक प्रयोगाचा शास्त्रात उत्कृष्ट प्रकारचा विचार केलेला आहे, पण अत करण स्वाधीन ठेवणाऱ्या सहनशील पुरुषालाच ते करिता येणे शक्य आहे

* * *

## मुसलमानांपूर्वीच्या स्वाऱ्या व त्यांचा प्रतिकार

शिकदरच्या वेळेपासून ग्रीक, सिथियन, शक, हूण व पुढें अरब, तुर्क, मोगल आणि सरते शेवटी पाश्चात्य ख्रिस्ती इत्यादि अनेक परकीय लोकाचे हल्ले आज दोन अडीच हजार वर्षे हिंदुस्थानावर येत आहेत, आणि त्या सर्वांचा थोड्याबहुत अशाने येथे रिघाव झाला आहे, तथापि त्याचा प्रतिकारहि वेळोवेळी येथील लोकाकडून झालेला आहे हे सहसा कोणाच्या लक्षात येत नाही 'शिकदर बादशहाच्या स्वारीनतर शहाबुद्दीन घोरीच्या स्वारीपर्यंत जी पधराशे वर्षे गेली, तेवढ्या काळात ह्या देशावर परकीयाच्या स्वाऱ्या एकामागून एक येत होत्या, आणि तितक्यास येथचे लोक मागेच हटवून स्वत ची सत्ता स्थापन करीत होते जगाच्या इतिहासात इतके प्रचड झगडे सापडणे कठीण शिकदर बादशहाचे वास्तव्य येथे झालेच नाही त्याचे काही लोक मागे राहिले त्यास चद्रगुप्ताने घालवून दिले पुढे शभर वर्षांनी वायव्येकडील बॅक्ट्रिया या देशातून ग्रीक लोकानी पुन हिदुस्थानावर स्वारी केली त्या वेळी मगध देशाचा राजा पुष्यमित्र व त्याचे सेनापति ह्यानी इ स पूर्वी १७५ च्या सुमारास त्या यवनास बाहेर घालवून दिले यवनानतर शक आले त्यानी तक्षशिला व मथुरा येथे सुमारे शभर वर्षे राज्य केले त्याचा पाडाव इ स पूर्वी ५७ च्या सुमारास उज्जयिनीच्या विक्रमादित्याने केला नतर पश्चिमेकडून शकाची दुसरी एक टोळी आली त्याचा राजा महपान याचा गौतमीपुत्र पुलुयामी शतकर्णी याने इ स १२६ त पराभव केला त्यानतर युएची नावाचे लोक हिदुस्थानावर आले त्याचे राजे कनिष्क व वासुदेव यानी शभर वर्षे पावेतो पजाब व सभोवारच्या प्रदेशावर राज्य केले त्याचा पाडाव गुप्तवशी प्रबल राजा समुद्रगुप्त याने चवथ्या शतकात केला. पाचव्या शतकात श्वेत हूण लोक हिदुस्थानवर चालून आले. त्याचा दुष्ट राजा महिरगुल यास सहाव्या शतकात यशोधर्म या राजाने जिंकिले. तरी सातव्या शत-

कात पुनरपि हूण लोक हिदुस्थानात आले त्यास कनोजच्या श्रीहर्षाने कायमचे हाकून लाविले. त्यानतर सुमारे तीनशे वर्षे पावेतो हिदुस्थानवर परचक्र आले नाही

—ज्ञानकोश प्रस्तावना खड

* * *

## हिंदूंनीं स्वातंत्र्य कधींच गमाविलें नाहीं

मुसलमानानी इराण पादाक्रात केल्यावर ते हिदुस्थानकडे वळले या नव्या धर्माच्या लोकाच्या जोराच्या हल्ल्याना तोड देण्यास शात स्वभावी हिदू लोक फारसे तयार नव्हते तरीहि विशेष ध्यानात ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे की, कुराणी धर्माचे भक्त हिदुस्थानात जरी फार मोठ्या प्रमाणात पसरले तरी जित हिदू व जेते मुसलमान याचे समिश्रण कधीहि झाले नाही जुना हिदुधर्म व नवा मुसलमानी सप्रदाय याचे सयोगीकरण होऊ शकले नाही मुसलमानानी जे जे देश जिकले त्यातील बहुतेक प्रत्येक इसम त्यानी आपल्या सप्रदायात ओढून घेतला पण उलट पक्षी हिदुस्थानात अनेक ठिकाणी त्याची राज्ये होती व अनेक वर्षे राजसत्ता त्याच्या हाती होती, तरी सर्व हिदू लोकसख्येच्या एक पचमाशाहून अधिक मुसलमानाची सख्या पूर्वी कधी नव्हती व आताहि नाही मुसलमानी सप्रदायाचा सस्थापक महमद पैगबर हा सन ६३२ मध्ये मदिना येथे मरण पावला, व त्यानतर बत्तीस वर्षांनीच म्हणजे इ. स ६६४ मध्ये मुसलमानाची हिदुस्थानावर पहिली स्वारी झाली या स्वारीत पजाबमध्ये काही नासधूस व लुटालूट करून मुसलमान परत गेले त्यानतर इ स ७११ त दमास्कसच्या खलिफाचा सेनापति महमद कासीम याने अरब सैन्यानिशी हिदुस्थानवर स्वारी करून सिध प्रात जिकून घेतला मुसलमानाच्या भक्ष्यस्थानी पडलेला हा पहिला प्रात होय याच वर्षी तिकडे स्पेनमध्ये गॉथ लोकाचा शेवटचा राजा रॉडरिक पराभव पावून तो सर्व देश सॅरॅसीन लोकानी (तुर्की मसलमानानी) जिकला पण इकडे हिदुस्थानात रजपूत लोकाच्या शौर्यामुळे व ब्राह्मण जातीच्या धर्मनिष्ठेमुळे मुसलमानांना भयकर अडथळा आला तशा प्रकारचा अडथळा करणारे लोक पश्चिम युरोपमधील देशात नव्हते; यामुळे युरोप पादाक्रात करण्याचे काम मुसलमानाना बरेच सोपे गेले उलट हिदुस्थानात इ स ७५० मध्ये हिदूनी जुलमी मुसलमानी सत्तेविरुद्ध बड करून मुसलमानांना स्वदेशातून पार हाकून लाविले, व त्यानतर अडीचशे वर्षे हिदुस्थानाला मुसलमानापासून बिलकूल त्रास झाला नाही येवढेच नव्हे परतु पुढे यापेक्षाहि मोठाले हल्ले परदेशातील मुसलमानानी हिदुस्थानवर केले असता न डगमगता धर्माच्या व स्वातत्र्याच्या रक्षणार्थ हिदूनी प्राण खर्ची घातले असून, आजमितीसहि नेपाळच्या भूमीत त्याचा धर्म स्वातत्र्यछत्राखाली नादत आहे

हिदू लोक सबध हिदुस्थान आपल्या ताब्यात का ठेवू शकले नाहीत याची कारणे अनेक आहेत. कोणत्या कारणामुळे या देशात परकी सत्ता चालू झाली व ती येथे नादू शकली, यात खरोखर हिदूचा कमीपणा आहे किवा काय याचा विचार येथे करावयाचा नसून हिदूनी स्वातत्र्य रक्षणासाठी कसकसे प्रयत्न केले व आज पृथ्वीचे पाठीवर इतर धर्माप्रमाणेच हिदु धर्माचेहि राज्य आहे किवा नाही येवढेच पाहावयाचे आहे

* * *

### हिंदु संस्कृतीची पाठिराखी राज्यें—

मुसलमानाच्या हिदुस्थानावर स्वाऱ्या जरी कितीहि पूर्वीपासून होत असल्या तरी स्थूल मानाने त्याचा अम्मल इ स १००० पासून १८०० पर्यंतच गाजला. येवढ्या मोठ्या अवधीतसुद्धा त्याना एकदर लोकसख्येच्या पचमाशाहून अधिक लोक आपल्या सस्कृतीत आणता आले नाहीत याचे मुख्य कारण म्हणजे सस्कृति प्रसाराच्या कामी अव्वलपासून अखेरपर्यंत मुसलमानास विरोध होत राहिला हे होय हिंदु सस्कृतीच्या रक्षणाचे व त्यावरून ओघानेच हिंदूच्या स्वातत्र्यरक्षणाचे सर्व श्रेय, ज्यानी हा तीव्र

विरोध केला त्यानाच मिळते अर्थात् पश्चिमेकडून आलेल्या या इस्लामी सस्कृतीच्या लाटेविरुद्ध ज्या हिंदूनी प्रचड प्रयत्न केले त्याच्या म्हणजे— प्रथम उत्तरेतील रजपूत, नतर विजयनगरचे राजे व त्याचेहि नतर मराठे याच्या इतिहासाचे पृथक्श पर्यालोचन करणे जरूर आहे

* * *

## रजपुतांचा विरोध

रजपुतामध्ये इस्लामी सस्कृतीविरुद्ध एकसारखे झगडत राहण्याचे कार्य प्रामुख्याने मेवाडच्या गेहलोट अथवा घेलोट घराण्याने पतकरिले होते तेव्हा रजपुताच्या विरोधाचा इतिहास देणे म्हणजे घेलोट घराण्यातील पुरुषाचे मुसलमानाशी केव्हा व कसकसे सामने झाले ते दिले असता पुरे होईल सिध प्रातातील महमद कासीमची स्वारी (मुसलमानाची पहिली स्वारी) घेलोट घराण्याचा मूळ पुरुष चितोडचा बाप्पा रावळ याचे कारकीर्दीतच झाली होती इसवी सनाच्या बाराव्या शतकाच्या उत्तरार्धापासून बाप्पाच्या वशजाचे अफगाणाशी सामने सुरू झाले पुढे बाप्पाचा समरसिह नामक एक शूर वशज इ स ११४० त चितोडच्या गादीवर आला ११९३ च्या स्थानेश्वरच्या सग्रामात तो पृथ्वीराजास मदत करण्यास गेला असता धारातीर्थी पडला. परतु त्याच्या मृत्यूनतर त्याची राणी करुणदेवी हिने अबर नजीक घोरीच्या एका सरदाराचा पराभव करून आपल्या राज्यास बळकटी आणिली समरपुत्र कर्ण याच्यानतर समरसिहाच्या भावाचा नातु रहूल यानेहि मुसलमानांचा पराजय करून शहाणपणाने राज्य केले पुढे लक्ष्मणसिह याच्या कारकीर्दीत अल्लाउद्दिन खिलजी याने १३०३ मध्ये चितोडवर स्वारी केली. त्या वेळी राणा लक्ष्मणसिह व त्याचे अकरा मुलगे लढून मेले. लढाईंत अल्लाउद्दिनाने राज्य जिकले, पण याच घराण्यातील हमीर नावाच्या एका पराक्रमी पुरुषानें युक्तीने ते परत घेतले अल्लाउद्दिनाच्या मुलाचा त्याने पराभव केला व त्याच्या मुलास कैद करून आणिले हमिराने मेवाडचे राज्य उर्जित दशेस आणिले व सर्व रजपुताची एकी करून मुसलमानाचा मोड केला हमीरच्या मागून तीन पिढ्यानी भीमसिह याने आसपासच्या मुसलमान राजाचा पराजय करून माळव्याच्या सुलतानास पकडून आणले १४७४ त भीमसिहाचा पुत्र रायमल्ल हा गादीवर आला. तोहि पराक्रमी निघाला त्याने दिल्ली व माळवा येथील सुलतानाचा पराभव केला व त्याचा पुत्र पथ्वीसिह याने गुजराथचा सुलतान मुजफरशहा यास कैद करून आणिले

रायमल्लाचा पुत्र सग्रामसिह हाच प्रसिद्ध राणा सग होय याच्या कारकीर्दीत मेवाडचे वैभव कळसास पोहोचले त्याने दिल्लीकर मुसलमानाचा अठरा वेळा पराभव केला व अनेक वर्षे सार्वभौमाप्रमाणे राज्य केले परतु शेवटी फत्तेपूर शिक्रीच्या लढाईत बाबराने त्याचा पराभव केला अशा रीतीने जरी रजपुताचे वर्चस्व या वेळी कमी झाले तरी सग राण्याचा पुत्र रत्नसिह याने मुसलमानाचा निपात करीपर्यंत विश्राति घ्यावयाची नाही असे ठरविल्याने शिक्रीच्या लढाईचा बाबरास फायदा घेता आला नाही हिदूच्या स्वातत्र्याच्या लढ्यात चितोडइतके आघात कोणीच सोशिले नाहीत १५३६ मध्ये बहादूर शहाने चितोड घेतले, त्या समयी रत्नसिहाचा भाऊ विक्रमाजित व त्याचे साहाय्यकर्ते रजपूत राजे यानी आपल्या स्त्रियास दारूच्या भडक्यात उडवून देऊन शत्रूवर चाल केली व धारातीर्थी आपले प्राण साडिले १५६७ त अकबराने चितोडवर स्वारी केली तेव्हा उदयसिहास पळून जाणे प्राप्त झाले इतर रजपुतानी चितोड लढविला व शेवटी नाइलाज म्हणून जोहार करून त्यानी रणागणी जीव दिले इकडे उदयसिहाने पळून गेल्यावर अज्ञातवासातच जे एक खेडे वसविले त्याचे पुढे उदेपूर शहर बनले व तीच मेवाडची राजधानी झाली

उदयसिहाचा पुत्र प्रतापसिंह हा १५७२ मध्ये गादीवर आला. स्वातत्र्य टिकविण्याचे याने

केलेले प्रयत्न सर्वांस माहीत आहेत प्रतापसिंहाच्या वेळेपर्यंत मुसलमानाच्या स्वाऱ्या सुरू झाल्यास पाचशेवर वर्षे लोटली होती दर एक वेळी मुसलमानात पश्चिमेकडील ताज्या दमाच्या कडव्या लोकाची भर पडतच होती अशा परिस्थितीत सालोसाल येणाऱ्या परचक्रास कटाळून काही रजपूत मुसलमानाशी सलोखा करण्यास प्रवृत्त झाले असल्यास नवल नाही परतु असे असूनसुद्धा प्रतापसिहाने ज्या रजपुतानी मुसलमानाशी सोयरीक पतकरिली व ज्या रजपूत ठाकरानी मुसलमानी धर्म स्वीकारला त्याचा निषेध करून निष्कलक राहिलेल्या लोकाचाच पाठिबा घेऊन मोगलाशी टक्कर दिली, व अखेरपर्यंत तो त्यास हार गेला नाही हे विशेष होय प्रतापसिहानतर अमरसिह यानेहि पूर्वीचा लढा पुढे सुरू ठेवून कित्येक वेळा मोगल फौजाचा पराभव केला जहागीर व शहाजहान याच्या कारकीर्दीत उदेपूरच्या राण्याचे मोगलाशी तात्पुरते सख्य झाले होते तथापि औरगजेब बादशहाच्या मृत्यूपर्यंत मेवाडच्या राण्यानी स्वातंत्र्याचा लढा कायम टिकविला रूपनगरच्या ठाकुराच्या कन्येला औरगजेबाच्या तडाख्यातून सोडविणारा मेवाडचा राजसिग याने औरगजेबास पुरतेच जेरीस आणिले औरगजेबाने मेवाडवर आपल्या सर्व सैन्यानिशी स्वारी केली त्यावेळी झालेल्या तीनहि प्रचड लढायात त्याचा पराभव होऊन अत्यत मानहानि व निरुपाय होऊन त्यास राजपुतान्यातून कसाबसा तह करून पाय काढावा लागला (१६८१) राजसिहानतर त्याच्या तोडीचा रजपूत झालेला आढळत नाही परतु त्यानतर मुसलमानाचेहि सर्व तेज लुप्त झाल्याने पुढचा इतिहास पहाण्याची गरज नाही

उत्तरेतील मुसलमानाचे हे प्रयत्न चालू असता दक्षिणेतहि हिदु–मुसलमानाचे झगडे एक सारखे चालू होते दक्षिणेतील मुसलमानात अफगाणासारख्या कडव्या लढवय्या मुसलमानाचा सारखा भरणा होत नव्हता तथापि दक्षिणेतील मुसलमान हे हिदूतून बाटून झालेले मुसलमान असल्यानेच हिंदूस विशेष जाचक झाले कारण एकदा परधर्मांत गेल्यावर पूर्वधर्मांतील लोकाचा पाडाव करण्यास अशा बाटलेल्या लोकांस विशेष स्फुरण चढत असते

* * *

## विजयनगरच्या राज्याचा उदय व उत्कर्ष.

इ स १३२७ त मुसलमानानी म्हैसूरची राजधानी द्वारसमुद्र लुटून फस्त केली, तेव्हा वरगूळच्या राजाच्या पदरी असलेल्या सगम नामक पुरुषाच्या हरिहर, बुक्क, आदिकरून पाच पुत्रानी दक्षिणेत एक मोठे हिदु राज्य स्थापून मुसलमानास तोड देण्याचा निश्चय केला त्या प्रमाणे त्यानी इ स १३३६ त तुगभद्रेच्या दक्षिण तीरावर विजयनगर नावाच्या एका मोठ्या तटबदी शहराची स्थापना करून सुमारे पधरा वर्षांच्या अवधीतच पूर्व किनाऱ्यापासून पश्चिम किनाऱ्यापर्यतचा तुगभद्रेच्या दक्षिणेकडील बहुतेक सर्व मुलूख आपल्या अमलाखाली आणिला

**संगम घराणें**—इ स १३३६ पासून १४५६ पर्यंत दक्षिणेत सगम घराण्याने राज्य केले या राजाचा बहुतेक काळ इ स १३४७ त तुगभद्रेच्या उत्तरेस स्थापन झालेल्या बहामनी राज्याच्या सुलतानाशी युद्धे करण्यात गेला यापैकी दुसऱ्या देवरायाच्या कारकीर्दीत (१४२४–१४४७) सगम घराणे वैभवाच्या शिखरास पोचले हाते सगम घराण्याच्या सस्थापक बधूपैकी बुक्क याने इ स १३७४ च्या सुमारास चीनच्या राजाकडे वकील पाठविले होते

**सालुव घराणें**—दुसऱ्या देवरायाचा पुत्र मल्लिकार्जुन याचा नरसिह नामक कोणी एक कारभारी होता, तोच पुढे सत्ताधीश होऊन त्याने १४५६ त सगमाच्या वशजास पदच्युत करून स्वत च गादी बळकाविली हा नरसिह सालुव मोठा शूर पुरुष होता. त्याने दक्षिणेकडील तामील मुलुखात आपल्या राज्याचा विस्तार करून जिकडे तिकडे आपल्या नावाचा दरारा बसविला याच्या कारकीर्दीतच बहामनी राज्याची छकले झाली. नरसिहाच्या मागून त्याचे दोन मुलगे एकामागून एक गादीवर बसले पण त्या दोघाचाहि खून होऊन

सेनापति नरस नायक यानेच राज्य बळकाविले.

**तुलुव घराणें** — नरस नायक हा तुलुव घराण्याचा सस्थापक हाता तो १५०५ पासून चार वर्षें राज्य करून मरण पावला व नतर त्याचा मुलगा कृष्णदेवराय (१५०९–१५२९) हा गादीवर बसला. कृष्णदेवराय हा मोठा वैभवशाली व कीर्तिमान राजा होऊन गेला याने वीसच वर्षे राज्य केले, पण तेवढ्या अवधीत त्याने विजापूरच्या इस्माईल आदिलशहाचा पराभव करून त्याजपासून प्रसिद्ध रायपूरचा किल्ला काबीज केला खुद्द विजापूरहि काबीज करून तेथे कित्येक दिवस त्याने आपल्या फौजचा तळ दिला होता हा जसा शूर तसाच उदारहि होता पाएजसारख्या परस्थानेही त्याची फार स्तुति केलेली आहे. त्याच्या दरबारचे वैभव पाहून युरोपियन लोकाचे तर डोळेच दिपून जात कृष्ण देवरायाच्या मागून त्याचा चुलत भाऊ अच्युतराय गादीवर आला तो दुर्बल व जुलमी निघाला, १५४२त अच्युतराय मेल्यावर त्याचा पुतण्या सदाशिवराय गादीवर आला. पण याच्या कारकीर्दीत खरी सत्ता त्याचा कारभारी रामराय सालुब याच्या हाती होती या शूर पुरुषाने कृष्णदेवरायाप्रमाणे मुसलमानासबधी चढाईचे धोरण स्वीकारून तुगभद्रा ओलाडून पलीकडील मुलखात स्वाऱ्या केल्या व तेथील सुलतानास 'त्राहि भगवान्' म्हणण्याची पाळी आणली १५४३ त रामरायाने अहमदनगर व गोवळकोडे येथील राजाशी सख्य करून विजापुरावर स्वारी केली, व पुढे पधरा वर्षांनी विजापूरच्या राजाशी सख्य करून अहमदनगरवर स्वारी केली आणि तो सर्व मुलूख उध्वस्त करून टाकला

**आरवीडु घराणें**.–तिरुमल आरबीडु, विजयनगरच्या चौथ्या राजधराण्याचा मूळ पुरुष, याच्या वशात पहिला वेकट हा नाव घेण्यासारखा राजा झाला त्याने आपली राजधानी चद्रगिरीस नेलेली दिसते. तो तेलगू कवीचा व वैष्णव ग्रथकाराचा आश्रयदाता म्हणून प्रसिद्ध आहे

**विजयनगरच्या साम्राज्याची कामगिरी:** मुसलमानांची लाट तगभद्रेपलीकडे थोपवून धरून विजयनगरच्या साम्राज्याने हिंदु सस्कृतीच्या संरक्षणाची फार मोठी कामगिरी बजाविली. हे साम्राज्य उदयास आले नसते तर मुसलमानास तुगभद्रेपलीकडे पसरण्यास फारसा काळ लागला नसता या कामगिरीची थोडीशी कल्पना येण्यास तुगभद्रेच्या दक्षिणेकडील लोकसख्येची तिच्या उत्तरेकडील मुसलमानी मुलखातील लोकसख्येशी तुलना केली तरी पुरे होईल सबध हिंदुस्थानात मुसलमानाची लोकसख्या एकदर लोकसख्येच्या एकपचमाश असता तुगभद्रेच्या दक्षिणेकडील प्रदेशात तिचे एकदर लोकसख्येशी शेकडा प्रमाण कधी पाच तर कधी एकही पडते !

* * *

## मराठी साम्राज्य

तुगभद्रेच्या दक्षिणेस मुसलमानी सत्तेला विरोध करण्याचे कार्य विजयनगरच्या राजानी खाली ठेविले, ते त्याच्या नतर तुगभद्रेच्या उत्तरेस मराठ्यानी आपल्या हाती घेतले. मराठ्यानी तेजस्वी वीराची व मुत्सद्याची केवढी प्रचड परपरा निर्माण केली ! मुसलमानी सत्तेला प्रत्येक ठिकाणी पायबद घालून खुद्द दिल्लीचे बादशाही सिहासनहि त्यानी कसे गदगदा हालविले व दीडशे वर्षे भगवा झेंडा सर्व हिदुस्थानभर कसा फडकत ठेविला, हा स्फूर्तिदायक इतिहास अगदी ताजा असल्यामुळे त्याच्या पुनरुक्तीची जरूरी नाही

हिदूच्या स्वातत्र्य–रक्षणाचा हा छोटासा इतिहास देताना स्वातत्र्य कोणासाठी मिळवावयाचे हे दर्शविण्यासाठी श्री शिवाजी महाराजानी जयसिगास लिहिलेले पत्र येथे दिले आहे त्यात नुसते राज्य स्थापन करण्याचा त्याचा उद्योग नव्हता, राज्यस्थापनेच्या बुडाशी धर्मरक्षण.ची केवढी मोठी आच महाराजाना लागून राहिली होती हे दिसून येते. जयसिंगाला लिहिलेल्या पत्रात शत्रूशी लढताना त्याच्या सेनेत असलेले हिदू शिपाई मारावे लागतील म्हणन वाटणारी हळहळ शिवाजी राजानी प्रकट केली आहे; एरवी शत्रु कितीहि प्रबल असला तरी त्यानीं

त्याची काय वाट लाविली असती याची कल्पना पुढच्याच पत्रावरून होईल

## शिवाजी महाराजांचें जयसिंगास पत्र

('नागरी प्रचारिणी पत्रिका' नावाच्या हिंदी त्रैमासिकांत बाबू जगन्नाथदास यानी शिवाजी महाराजांचे, जयसिंगाच्या नावे, फारशी भाषेत लिहिलेले कविताबद्ध असे एक पत्र प्रसिद्ध केले आहे ते कदाचित् बनावट असले तरी त्याचा लेखक औरंगजेबाच्या समकालीन व इतिहासाचा मर्मज्ञ असला पाहिजे अशी फारशी भाषाभिज्ञाची खात्री झाली आहे ते येथे साराश रूपाने दिले आहे )

हे श्रेष्ठ सरदारा, तुझ्यामुळे रजपुताची मान उन्नत आहे तुझ्यामुळे बाबरवशाची राज्यलक्ष्मी अधिक प्रबळ झाली असून तुझे साहाय्य तिला मिळत आहे हे प्रबळ व प्रौढ जयशाहा ! सेवाचा (शिवाजीचा) प्रणाम व आशीर्वाद स्वीकार परमेश्वराने तुझे रक्षण करून तुला धर्माचा व न्यायाचा मार्ग दाखवावा मी असे ऐकले आहे की मजवर हल्ला करण्यासाठी व दख्खन जिकण्यासाठी तू आला आहेस हिंदूचे हृदय व नेत्र याच्या रक्ताने तू जगात यशस्वी होऊ पहात आहेस पण तुझ्या हे लक्षात आले नाही की याने तुझ्या तोडास काळोखी फासली जात आहे, कारण या कृत्याने देशावर व धर्मावर आपत्ति ओढवली आहे जर तू क्षणमात्र अतर्मुख होऊन आपल्या हाताकडे व झग्याकडे विवेक दृष्टीने पाहशील तर हा रग कोणाच्या रक्ताचा आहे व या रगाचा रग इहपर लोकी काय होणार हे तुला समजेल. जर तू आपण होऊन दक्षिणदेश जिकण्यास आला असतास तर माझे शिर व डोळे तुझ्या रस्त्यावर बिछान्याप्रमाणें पसरले असते. मी तुझ्या घोड्याबरोबर मोठी सेना घेऊन आलो असतो आणि देशाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंतची भूमि तुला जिकून दिली असती. पण तूं सज्जनाना फसविणाऱ्या औरंगजेबाच्या थापांस भुलून इकडे आला आहेस. तेव्हां यावेळी तुझ्याशी कोणता डाव खेळावा हें मला समजेनासे झाले आहे. जर तुला सामील व्हावे तर त्यांत मर्दपणा नाही; कारण मर्दलोक प्रसगाची सेवा करीत नाहीत. सिंह कधी भित्रेपणा दाखवीत नाही. बरे; जर मी तरवार व कुऱ्हाड याचा उपयोग केला तर दोनही बाजूनी हिंदूचीच हानी होणार. मोठ्या दुःखाची गोष्ट ही आहे की, मुसलमानाचे रक्त पिण्याखेरीज इतर कामासाठी माझी तरवार म्यानातून बाहेर पडावी लागेल! जर या लढाईसाठी स्वत तुर्क आला असता तर आम्हा वीर पुरुषाना घरबसल्या शिकार लाभल्याप्रमाणे झाले असते पण जेव्हा अफजलखान व शाइस्तेखान याच्या हातून काम झेपत नाही असे दिसले, तेव्हां तुला आम्हाशी युद्ध करण्याकरिता नेमले आहे. कारण स्वत औरगजेब आमचा मारा सोसण्यास समर्थ नाही हिंदु लोकात कोणी बलशाली राहू नये, आणि सिहानी आपसात लढून घायाळ व शात व्हावे, आणि गिधाडाना जगलाचे स्वामित्व प्राप्त व्हावे अशी औरगजेबाची इच्छा आहे. ही गूढ नीति तुझ्या ध्यानात येत नाही. यावरून त्याच्या जादूने तुला भूल पाडली आहे असे प्रत्यास येते तूं जगात बरेवाईट पुष्कळ प्रसग पाहिले असशील, बागेतून तू फुले व कटक या दोहोचाही सचय केला असशील, पण आम्हा लोकाशी युद्ध करून हिंदूचे शीर धुळीस मिळविण्याचे काम मात्र तू करू नये प्रौढ वयात अल्लडपणा न करिता सादीच्या या वचनाचे स्मरण कर "सर्वच ठिकाणी घोडा फेकता येत नाही कधी कधी ढाल फेकून पळून जाणे योग्य असते " व्याघ्र, मगादि प्राण्यावर व्याघ्रता करतो, पण सिंहाबरोबर गृहयुद्ध करण्यास प्रवृत्त होत नाही. जर तुझ्या तीक्ष्ण तरवारीत पाणी असेल व घोड्यात दम असेल तर हिंदु धर्माच्या शत्रूवर हल्ला करून इसलामाचे जड मूळ खोदून टाक जर या देशाचे राज्य दार शिकोह यास मिळाले असतें तर आम्हा लोकावर त्यानी कृपा, अनुग्रह केला असता. पण तू जसवतसिंहास दगा दिलास व उच्च नीच ह्याची तुला पारख करता आली नाही. आजवर किरकोळ शत्रूंशी गांठ पडल्यामुळे तुझा दम कायम राहिला आहे परंतु तूं आता सिंहाशी युद्ध करण्याची

धिटाई करून आला आहेस एवढ्या धावपळीने तुला काय मिळत आहे ? तू मृगजळाच्या मार्गे धावत आहेस एखाद्याने फार परिश्रम करून एकादी सुदरी हस्तगत करावी आणी ती आपल्या शत्रूच्या स्वाधीन करावी अशा तुच्छ व्यक्तीसारखा त आहेस तू या नीचाच्या कृपेचा काय अभिमान धरतोस ? जुझारसिहाच्या कामाचा परिणाम काय तुझ्या लक्षात नाही ?

कुमार छत्रसाल याजवर तो कशाप्रकारची आपत्ति आणू पहात होता हे तू जाणतोस या खेरीज इतर हिदुलोकावर या दुष्टाच्या हाताने काय काय अनर्थ आले आहेत हेहि तुला माहीत आहे इष्ट हेतु साधण्यासाठी तो बापाचा व भावाचा खन पाडण्यास भीत नाही राजभक्तीची सबब सागत असशील तर तू शहाजहानशी कसे वर्तन केलेस त्याचे स्मरण कर जर विधात्याने तुला अकलेचा अश दिला असेल व मर्दपणाची तुला चाड असेल तर तू आपल्या जन्मभूमीच्या सतापात आपली तरवार तापीव व अत्याचाराच्या दु खाने पडण।न्या आसवानी तिला पाणी दे हा प्रसग आम्ही लोकानी आपसात लढण्याचा नाही कारण हिदु लोकावर यावेळी मोठे कठीण कार्य येऊन पडले आहे. आमची पोरेबाळे, देश, धन, देव व पवित्र देवपूजक या सर्वांवर त्याच्यामुळे पराकाष्टेचे दु ख कोसळले आहे आणि हाच क्रम आणखी काही दिवस चालेल तर आम्हा हिदु लोकांचे चिन्ह देखील पृथ्वीवर राहणार नाही मूठभर मुसलमानांनी आमच्या येवढ्या देशावर प्रभुत्व गाजवावे ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे. पण हे प्रभुत्व त्याच्या पराक्रमाचे फळ नव्हे जर तुला अकलेचे डोहाळे सुचत असतील तर पहा. आम्हाबरोबर तो कशा गोड गोष्टी बोलतो व चेहऱ्यावर कसकसे रग आणतो, आमच्या पायात आमचीच बेडी अडकवितो व आमच्याच तरवारीने आमची शिरे कशी कापतो ते लक्षात घे आम्ही लोकानी या वेळी हिदु, हिदुस्थान व हिदुधर्म याच्या सरक्षणार्थ फार जोराचे प्रयत्न केले पाहिजेत तरवारीस पाणी देऊन (जशास तसे या न्यायाने) तुर्कांचा जबाब तुर्कांसच दिला पाहिजे जर तू मारवाडचा राजा जसवतसिग व मेवाडचा राजा राजसिंह याच्याशी ऐक्य करशील तर फार मोठे काम होईल अशी आशा आहे चोहीकड्न उठावणी करून तुम्ही या सर्पाचे डोके दगडानी ठेचून टाका, म्हणजे काही काळपर्यंत तरी त्याला दक्षिण प्रातात आपले जाळे पसरता येणार नाही तेवढ्यात मी व माझे भालेबहाद्दर वीर विजापूर व गोवळकोडा येथील दोनहि बादशहाना जिकतो मेघासारखी गर्जना करणाऱ्या सैन्यानिशी मुसलमानावर तरवारीचा पाऊस पाडीन, आणि सर्व दक्षिण देशाच्या पटावरून इस्लामाचे नाव किवा चिन्ह धुवून टाकीन त्यानतर कार्यदक्ष वीर व भाला चालविणारे घोडेस्वार याना बरोबर घेऊन प्रचड लाटा व कोलाहल माजवणाऱ्या नदीप्रमाणे दक्षिण देशातील पहाडातून बाहेर पडून मैदानात येईन, आणि अत्यत जलदीने तुम्हा लोकाच्या सेवेस हजर होईन, व तुम्हास हिशेब विचारीन चोहोकडून भयकर युद्ध उपस्थित करून रणागणात दगल माजवून आम्ही लोक आमच्या सेवेच्या लाटा दिल्ली येथील त्याच्या जर्जर झालेल्या घरात पोहोचवू म्हणजे त्याच्या नावाचे औरग (राजसिहासन) राहणार नाही, व जेब (शोभा) हि रहाणार नाही तसेच त्याची अत्याचाराची तरवार रहाणार नाही व कपटाचे जाळेही राहणार नाही शुद्ध रक्ताने नदी वाहवून आम्ही आमच्या पितराच्या आत्म्याचे तर्पण करू हे काम काही फार कठीण नाही फक्त हृदय व डोळे आणि हात याची आवश्यकता आहे दोन अत. करणे एक होतील तर पहाड तोडता येईल व मोठ्या सैन्याच्या समूहाच्या ठिकऱ्या उडविता येतील या विषयासबधी मला तुझ्याशी फार बोलणे चालणे करावयाचे आहे ते पत्रात लिहिणे सयुक्तिक नव्हे तू म्हणशील तर मी समक्ष तुझ्या भेटीस येईन, व माझा बेत तुला कळवीन तरवारीची शपथ, घोड्याची शपथ व धर्माची शपथ घेऊन मी सागतो की, असे करण्याने तुझ्यावर आपत्ति येणार नाही. अफजलखानाचा शेवट कसा झाला हे लक्षात आणन तू शकित होऊ नको

त्याने बाराशे लढवय्ये हबशी माझा घात करण्यासाठी ठेविले होते त्याच्यावर मी प्रथमच हात चालविला नसता तर या वेळी हे पत्र तुला कोणी लिहिले असते? मला तुझ्यापासून अशी भीति नाही कारण तुझ्या माझ्यात काही शत्रुत्व नाही जर मला तुझे उत्तर अनुकूल आले तर रात्री मी एकटा तुझ्या भेटीस येईन शाइस्तेखानाच्या खिशातून मी जे पत्र काढून घेतले आहे ते गुप्त पत्र मी तुला दाखवीन तुझ्या डोळ्यावर सशयाचे पाणी शिपडून तुझी सुखनिद्रा नाहीशी करीन तुझ्या स्वप्नाचा खरा खरा फलादेश करून नतर तुझा जबाब घेईन जर या पत्राचे उत्तर माझ्या मनाजोगे न येईल तर मी आणि माझी तीक्ष्ण तरवार आहे व तुझी सेना आहे उद्या सूर्य आपले मुख सध्याकालात लपवील तेव्हा माझा अर्धचद्र (तरवार) म्यानातून बाहेर पडेल बस्स कल्याण असो

* * *

शाइस्तेखानाचा पराभव केल्यानतर नीलप्रभूच्या हस्ते शिवाजी महाराजानी दक्षिणेत मोगल अधिकाऱ्यास लिहिलेले पत्र मॉडर्न रिव्ह्यूत प्रो. जदुनाथ सरकार यानी इग्रजीत भाषातररूपाने छापले आहे त्याचा साराश असा आहे —

आज तीन वर्षे बादशहाचे मोठेमोठे सल्लागार व योद्धे आमचा प्रदेश काबीज करण्यासाठी चालून येत आहेत, हे तुम्हा सर्वांस माहित आहेच बादशहा हुकूम फर्मावितात 'शिवाजीचे किल्ले व मुलूख काबीज करा' तुम्ही जबाब पाठविता 'आम्ही लौकरच काबीज करतो' आमच्या ह्या कठिण प्रदेशात नुसता कल्पनेचा घोडा सुद्धा नाचविणे कठिण आहे मग तो प्रदेश काबीज करण्याची गोष्ट कशाला! भलत्याच खोट्या बातम्या बादशहाकडे लिहून पाठविण्यास तुम्हास लाज कशी वाटत नाही! कल्याणी बेदरचे किल्ले उघड्या मैदानात होते ते तुम्ही काबीज केले आमचा प्रदेश अवघड व डोगराळ आहे नदीनाले उतरून जाण्यास वाट नाही अत्यत मजबूत असे साठ किल्ले आज माझे तयार आहेत पैकी काही समद्रकिनाऱ्यावर आहेत बिचारा अफजलखान जावळीवर फौज घेऊन आला आणि नाहक मृत्यमुखी पडला हा सर्व प्रकार आपल्या बादशहास का कळवीत नाही? अमीरूल उमराव शाइस्तेखान आमच्या या गगनचुबित डोगरात व पाताळास पोचणाऱ्या खोऱ्यात तीन वर्षे सारखा खपत होता 'शिवाजीला पादाव करून लौकरच त्याचा प्रदेश काबीज करतो' असे बादशहाकडे लिहून लिहून थकला ह्या खोडसाळ वर्तनाचा परिणाम त्याला भोवला तो परिणाम सूर्यास्तासारखा स्वच्छ सर्वांच्या समोर आहे आपल्या भूमीचे सरक्षण करणे माझे कर्तव्य आहे आणि तुम्ही कितीही बादशहाकडे खोट्या बातम्या लिहून पाठविल्या तरी मी आपले कर्तव्य बजावण्यास कधी चुकणार नाही (आधार—ज्ञानकोश, इतिहास मजरि)

* * *

## हिंदूंचें प्राचीन वैभव, विद्या, व कलाकौशल्य.

### वैद्यक

आमच्याकडील आयुर्वेदातील ज्ञान हे अतिशय खोल व सूक्ष्म कोटीपर्यंत गेलेले आहे आयुर्वेद हा कोणच्याही लोकाच्या एतद्विषयक ज्ञानापेक्षा जुना आहे हे सिद्ध झालेले आहे हिदुस्थानवर इग्रजाचे राज्य असल्यामुळे जित लोकाचा महिमा गावयास इग्रज ग्रथकार सहसा तयार नसतात परतु इकडे ज्यावेळी राज्याची बसाबस चालू होती, तेव्हा काही महानुभावबुद्धीचे व शोधक असे मुत्सद्दी व अधिकारी इकडे होऊन गेले. युरोपातील इतर देशातून सुद्धां अशा बुद्धीचे कित्येक प्रवासी येऊन गेले यानी आपणा हिंदु लोकाच्या जीविताचे व आपल्या प्राचीन सस्कृतीचे चागले अवलोकन केले होते त्यानी लिहून ठेवलेल्या अभिप्रायावरून इग्रज लोकानी व स्वत-विषयी हीनबुद्ध झालेल्या आमच्या लोकानी आम्हाविषयीचे मत बनवावे हे योग्य आहे युरोपियन लोकानी आमची प्राचीन ज्ञाने त्याच्या स्वत:च्या अद्यावत् ज्ञानाशी तोलून पाहिली ती पाहिल्यावर त्यानी जे अभिप्राय नमद करून

ठेवले ते अत्यंत बोधप्रद आहेत. त्याचें त्यांनीच हें सांगितलेलें असल्यामुळें आपण आपल्या प्राचीन ज्ञानवैभवाचा वृथा अभिमान बाळगतों, हाही आरोप परस्परच नाहीसा होतो औषधि, रसायन ज्योतिष, शिल्प इत्यादि शास्त्रात आमची जी प्रगति पूर्वी झालेली होती ती सर्वथा अभिमानास्पद होय. व म्हणूनच असे आग्रहाने म्हणावेसे वाटते की, आपल्या पूर्वजाना शुद्ध भौतिक ज्ञानाचा ओढा जबरदस्त होता, तसाच आपणासही असावा या अनेक ज्ञानापैकी वैद्यकाविषयी लिहितो :–

धन्वतरि हा आपल्या वैद्यकाचा आदिपुरुष होय त्याने आपलें ज्ञान सुश्रुताला सागितले. व ते त्याने ग्रथरूपाने कायम केले या ग्रथालाच सुश्रुत असे म्हणतात. तसेच आत्रेय मुनीनी हे वैद्यक अग्निवेशाला सागितले त्याने ते चरकाला सागितले त्याने ते ग्रथरूपाने कायम केले त्यालाच चरक असे म्हणतात. धन्वतरीचे नाव आपल्या भाषेंत रूढ झाले आहे. व एकाद्याला फार मोठा वैद्य असे म्हणावयाचे असले तर आपण त्यास धन्वंतरी असे म्हणतो रजपूतात तर अजन अशी चाल आहे की, औषध घेताना धन्वतरीचे नाव घेऊन मग ते घेतात वर जी आत्रेय, अग्निवेश, चरक, धन्वतरी, सुश्रत, ही नावे आली आहेत, त्याशिवाय मोठमोठाली आणखीही नावे वैद्यकात प्रसिद्ध आहेत. भारद्वाज, कपिश्थल, भेल, जातुकर्ण, पराशर, हरित, काश्रप, कृश, साकृत्यायन, कृष्णात्रेय, औद्दलकी, पाचाळ, गोनर्दीय, गोणिकापुत्र, सुबंधु, कांकायन हे मोठमोठाले वैद्य पूर्वी होऊन गेले. हे संस्कृतातील वैद्यकाचे ज्ञान हिंदुस्थानांतून बगदादला, बगदादमधून अरबस्तानांत व थोडें ग्रीस देशांत व तेथून पश्चिम यूरोपांत, या पद्धतीने पसरत गेले आहे. ग्रीस देश व अरबस्तान यांचा सबध बगदादशी फारच मोठा होता; आणि बगदादच्या राजांनी व खलिपांनी हिंदुस्थानाशी राबता ठेविला होता. हरुन-अल्-रशिद् हा तर हिंदु वैद्याना व इतर पडिताना मुद्दाम निमंत्रून नेत असे व आपल्या दरबारी राहण्याविषयी त्यांना आग्रह करी. तो एकदां आजारी असतांना त्याला एका हिंदु वैद्यानेंच बरे केलें बगदादच्या खलिपानें (९५०-९६०) हिंदु वैद्यक ग्रंथांची भाषांतरें करविली पण याच्याही पूर्वी म्हणजे ५३१ ते ५७२ या कालात सासून घराण्यांतील नोशेरवान राजा राज्य करीत असतां त्याचा समकालीन जो बार्झूहेब तो हिंदुस्थानांत हे ज्ञान मिळविण्यासाठीच आलेला होता. या पर्शियन भाषातरातून अरबी पडित जो अबूसिना (Abicenna) त्याने हरएक प्रकारचे वैद्यकाचे ज्ञान अरबी भाषेत नेले त्याच्या त्या भाषातरात चरक हे नाव स्पष्टपणे येते दुसरा अरबी पडित जो अबूराझी त्याने रसायनावर जे अनेक ग्रथ लिहिले आहेत त्यात त्याने चरकाच्या औषधीची फार स्तुति केली आहे खुद्द अबूसिनाने जळवाची माहिती सुश्रुतातून घेतली आहे ग्रीक वैद्य जो ॲक्युॲरिस तो तर आपल्या त्रिफळयाची फारच शिफारस करतो व हिदु वैद्यकातील हत्तिरोगावरचे जे औषध ते त्याला फारच समत होते. अलेक्झाडरच्या दरबारी तर सर्पदश बरे करणारे म्हणून आपल्या वैद्याची मोठीच प्रसिद्धि होती हे ज्ञान आता दुसऱ्या कोणच्याही वैद्यकात उपलब्ध नाही. पण वरील पडितानी शिकदरच्या दरबारात 'आम्ही वाटेल त्याचा सर्पदश बरा करू' असे जाहीरच केले होते. यावरून दिसून येईल की, वैद्यकाचा मूळ उगम आपल्या इकडे आहे अर्थात् इतर देशातून त्याचा स्वतत्र उद्भव झालेला असणे हे अगदी सभाव्य आहे पण आपले वैद्यक सर्वांच्या पूर्वीचे आहे व आपल्याकडून पश्चिम आशिया व यूरोप इकडील लोकांनी पुष्कळच उसनवारी केलेली आहे पशुवैद्यकातही आपली प्रगति फारच झालेली होती. या विषयावरील एका सस्कृत पुस्तकाचे भाषातर गिझनीच्या महंमुदाने करविले हे भाषातर लखनौच्या लायब्ररीत अजन आहे व त्याचे नाव कुरत-अलमल्क असे आहे भाषातर करण्याचा हेतु मात्र इतकाच आहे की, "या काफराच्या भाषेशी पुन्हां संबंध यावयास नको !" ज्या मूळ पुस्तकाचे हे भाषांतर आहे ते सुश्रुताचा अध्यापक शालिहोत्र याने लिहिलेलें आहे असो

* * *

## शस्त्रक्रिया

शस्त्रविद्येंत आमची प्रगति केवळ लोकोत्तर होती. पाट्यावर मेण सारवून त्यावर किंवा वनस्पति व मत प्राणी यावर हे शिक्षण घेत अवयव कापणे, रक्त बद करणे, ओटीपोट व गर्भाशय यावर शस्त्रक्रिया करणे, गर्भाशयातून गर्भ बाहेर काढणें, मज्जाततू बिघडले असताना भवईवरची पाचवी शीर कापणे, निखळलेली हाडे जेथल्या तेथे बसविणे, मोडलेली हाडे साधणे, शरिरात शिरलेले बाहेरचे पदार्थ काढून टाकणे, शवच्छेदन करून अतर्भाग पाहणे, मूतखडा काढणे, नेत्रबिंदु काढणे, ही कामे आमचे आर्यवैद्य करीत असत शस्त्रे तर इतकी सूक्ष्म असत की, केस उभा कापावयाचा म्हटले तर तेहि त्यायोगाने होत असे अशा या १२७ शस्त्राची नावे आपल्या वैद्यकात दिलेली आहेत शरिराची रचना, निरनिराळे अवयव व इद्रिये, अस्थिबध, शिरा, नाड्या धमन्या, इत्यादिकाची सविस्तर माहिती आर्यवैद्यकाने दिली आहे, पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे ही की, कापलेले नाक पुन जुळवून देण्याची कला जी युरोपियन लोकाना गेल्या शतकात माहीत झाली ती त्यानी आर्यवैद्यकातून उचललेली आहे अन्तर्गळ, भगदर, मूळव्याध ही बरी करीत असत धन्वतरीत गोस्तन देवीच्या लसीचे स्पष्ट वर्णन आहे रुधिराभिसरणाचा हावचा शोध हार्वेच्या पूर्वी एक हजार वर्षांखाली जन्मलेल्या सुश्रुताने आपल्या ग्रथात दिलेला आहे रोगप्रतिबधन व्हावे म्हणून विटाळाच्या चालीहि घातलेल्या आहेत वर उल्लेखिलेल्या सर्व गोष्टी युरोपियन लेखकाच्या व शास्त्रविशारदाच्या तोडून आलेल्या आहेत आपलाच बडेजाव माजविणाऱ्या स्वकीयानी त्या लिहिल्या आहेत असे कोणी समजू नये सर विल्यम् हटर, वेबर, मॅक्डोनेल, डॉ. सील, मिसेस् मॅनिंग, कर्नल किंग डॉ. ॲनिबेझट, लॉर्ड ॲम्पथील, प्रो. विल्सन अशासारख्या मोठमोठाल्या विद्वानानी व माहितगारानी वरील उल्लेख केलेले आहेत. हिंदुस्थानातील इस्पितळांची वाहवा, चिनी प्रवाशानीही केलेली आहे धातूचा उपयोग औषधाला करावा, हाहि शोध आर्यांचाच आहे. रोगपरिहारासाठीं सुवर्ण, लोह, व पारद यांचा उपयोग ते करीत. सोमलाचा उपयोगहि औषधासाठी करीत. तोंडास लाळ सुटावयास हवी असेल तर हिंगुळाची धुरी देत वरील माहितीवरून दिसून येईल की, आर्यवैद्यकात वैद्यशास्त्राची प्रगति खूपच झालेली होती त्यातील शेकडों वनस्पति युरोपांत व अमेरिकेत गेल्या आहेत. तेथे त्याच्या बागा झाल्या आहेत व त्यांचीच चूर्णे, गुटिका इत्यादि बनून आमच्या डॉक्टराच्या हाती येत आहेत. आपल्या शोधकानाहि पूर्वीच्या ग्रंथाचे महत्त्व कळू लागले आहे, व आधुनिक पद्धतीनी ते आर्यवैद्यकातील औषधीच्या गुणधर्मांचे परीक्षण करीत आहेत. आणि त्या कामात जो अनुभव येत आहे, त्यावरून सर्वांची खात्री होऊन चुकली आहे की, आर्यवैद्यक म्हणजे केवळ आजीबाईंचा झोळणा किंवा वैद्यबुवाचा बटवा नव्हे, तर अनुभव व सशोधन यावर रचलेले शास्त्र होय

* * *

## चित्रकला

चित्रकलेचीहि प्रगति अशीच झालेली होती तिचा उत्कर्ष हिंदुस्थानात तर झालाच, पण बुद्धभिक्षुकाबरोबर तिने चीन देशांतहि प्रवेश केला अब्दुल फजल हा मुसलमानच ना ? पण त्याने स्वच्छ सागितले आहे की, हिंदु लोकांच्या चित्रकलेची कल्पना सुद्धा मनांत मावत नाही, इतकी थोर ती आहे वेरूळ इत्यादि ठिकाणच्या लेण्यातील चित्राचे अवशेष पाहिले म्हणजे कल्पनाहि चालत नाही. खाली बसून वरच्या दगडी छतावर अर्धवर्तुळाकार किंवा निरनिराळ्या कोनाच्या आकृति यानी कशा काढल्या असतील याचे तज्ज्ञाना मोठें नवल वाटते ज्या मुसलमानाकडून आम्ही कला शिकलो अशी थाप इतिहासकार मारीत आले आहेत, त्यानी आमचे शिल्प व आमचे चित्रकार या बाबतीत इतकेच केले आहे की, उत्कृष्ट मूर्ति छिन्नविच्छिन्न केल्या आहेत. आणि ज्या छतावर सर्वोत्कृष्ट चित्रें हिंदु चितार्‍यांनी काढली होती, त्याच्या खाली कढ-

ब्याच्या राशि पेटवून देऊन ती नष्ट मात्र केली आहेत. व्यक्तीची चित्रें व समूहाची चित्रे ही मुद्धा या चिताऱ्यानी तितकीच चागली काढली आहेत हीच चित्राची कला धातुकामावर किवा मातकामावरसुद्धा इतकी उत्तम दिसून येते की, त्याचे नमुने कोठल्याहि पदार्थसग्रहालयात शोभून दिसतील

* * *

## धातुकाम

धातुकामाचेहि असेच आहे लोखड रस करून गाळणे, लोखडी तुकड्याचा एकजीव करणे, ते शुद्ध करून पोलाद बनविणे, ही आमची कला किती प्राचीन आहे हे सागता येत नाही भूमध्य-समुद्राच्या काठचे जे फिनीशिअन लोक ते पोलाद हिंदुस्थानातून नेत दमास्कस येथे होणारी उत्कृष्ट तरवारीची पाती ही मळ पश्चिम हिंदुस्थानातील कारखान्यातील कसबाची केवळ अनुकरणे होत तेच कसब कच्छ प्रातात थोड्याशा वर्षापर्यंत कायम होते, व तेथे होणारे पोलाद ग्लासगो किंवा शेफील्ड यथील पोलादाइतकेच उत्तम असते, असा तज्ज्ञानी तेव्हा अभिप्राय दिला होता प्रो भाडारकर यानी पुराणवस्तुसशोधनाच्या प्रसगात एके ठिकाणी सापडलेला एक लोखडाचा तुकडा आधुनिक खनिजशास्त्र्याकडे परीक्षणासाठी पाठविला, व तो सद्य कालीन लोखडाशी कितपत तोलता यतो हे विचारले. त्यानी कळवले की, हे लोह तेव्हा कसे तयार झाले असेल हे सागवत नाही; परतु अगदी आताच्या लोखडाच्या बरोबरीचे हे आहे आश्चर्य हे की, हा लोखडाचा तुकडा ख्रिस्तपूर्व १४० च्या सुमाराचा आहे इतक्या पूर्वी धातु तयार करण्याचे काम इतके चागले होत होते हे स्पष्ट आहे कुतुबमिनाराचा १० टनी लोहस्तभ पधराशे वर्षाहून जास्त जुना आहे. ही लोखडाची लाट करावयास त्यानी काय हिकमती योजिल्या हे ध्यानात येत नाही आणि लोखंड तर असे ओतले आहे की, त्याच्यावर गज म्हणून चढत नाही ! याच्याच जोडीला विणकाम करणे, रग तयार करणें, चिटे म्हणजे चित्रित कापडे तयार करणे, अलकार करणें, तावदाने करणे हे सर्व प्रकार हिंदुस्थानात फार उत्तम होत आले आहेत हिंदुस्थानात होणारे जरीकाठ रोमन सम्राज्ञी आपल्या काचोळयाला लावीत असत असे म्हटले आहे

* * *

## गणित

गणिताविषयी पाहता आपली अशीच मोठी प्रगति झाली होती असे दिसून येते रोजच्या व्यवहारात आपण वापरीत असल्यामुळे ज्याचे महत्त्वही आपल्या लक्षात येत नाही ते जे मूळ अक हे येथेच उत्पन्न झाले प्रो वॅलेस याच्या मताने दशमान-पद्धत हिंदुस्थानातीलच आहे मि एल्फिन्स्टन याच्या मते ख्रिस्तपूर्व दोन हजार वर्षे भूमितीचा उगम येथे झाला आहे व्यास व परिघ याचे नाते १२५० स ३९२७ इतके असते हे जे पूर्वीच्या गणितज्ञानी सागितले ते आताच्या गणिताप्रमाणे बिनचूक येते ग्रीक व अरब हे मोठे गणिती म्हणून प्रसिद्ध व त्याना हे वरचे प्रमाण काढता आले नव्हते काटकोन त्रिकोणातील काटकोनाच्या समोरील बाजूवरील चौरस हा उरलेल्या दोन बाजूवरील चौरसाच्या बेरजेइतका असतो, व त्रिकोणाच्या तीन भुजाची लाबी माहीत असली तर त्याचे क्षेत्रफळ काढता येते या गोष्टी ग्रीक लोकाना माहीत नव्हत्या, पण हिंदी पडिताना माहीत होत्या डिफरेन्शिअल कॅल्क्युलस भास्कराचार्याला माहीत होते बीजगणितापैकी Surd roots, general resolutions of the equations of the second degree हे भागही आर्याना माहीत होते पण बीजगणिताचा उपयोग ज्योतिषाचे प्रश्न सोडविताना प्राचीन ज्योतिष्यानी केला आहे हे पाहून यरोपियनानी मत दिले आहे की, ज्योतिष व बीजगणित या दोहोचाही इतक्या जुन्या काळी पुष्कळच अभ्यास झाला असला पाहिजे

* * *

## ज्योतिष

बेलि, कॅसिनी, जेटिन, फ्लेफेअर, जॉन्स जेरना इत्यादि मोठमोठाल्या लोकानी आमच्या ज्योतिषाविषयी फार शोधपूर्वक अभिप्राय दिले आहेत बेलीचे म्हणणे तर असे आहे की, हिदु लोकाच्या ज्योतिषविषयक कल्पना ज्या विद्यमान आहेत, त्या त्याच्या एतद्विषयक शास्त्राच्या प्राथमिक ज्ञानाच्या निदर्शक नसून त्याचे तद्विषयक ज्ञान जे पूर्णावस्थेस गेले होते त्याचे केवळ अवशेष होत ख्रिस्ती शकाच्या पूर्वी तीन हजार वर्षेसुद्धा अतिशय खोल असे ज्योतिषविषयक ज्ञान आर्य लोकाना होते हे त्या सर्वांना मान्य आहे आपण 'सप्तग्रही' हा शब्द अनेकदा ऐकतो व पाडवाच्या वेळी ती आली होती असेहि आपण पुराणातरी वाचतो ही माहिती शास्त्रसिद्ध आहे आधुनिक ज्योतिषाप्रमाणे हा सप्तग्रहीचा हिशेब अगदी बरोबर जमतो पूर्वी इकडे फरेचाचा अमल चालू झाला तेव्हा, आमची पूर्वीची सूर्यग्रहणकालाची नोद, तसेच सयामकडे व कर्नाटकात रूढ असलेली ब्राह्मणानी घालून दिलेली एतद्विषयक कोष्टके त्यानी मुद्दाम मागवून अगदी आधुनिक चिकित्सेने तपासून पाहिली तेव्हा त्यात असे दिसून आले की, या कोष्टकात कसलीहि चूक नाही कलियुग सुरू होऊन ५ हजार वर्षे झाली, हा हिशेब तंतोतत बरोबर ठरला आर्यभट्टाला पृथ्वीची दैनदिन गति, सूर्यचद्राच्या ग्रहणाची उपपत्ति, व सूर्याची अयने या तीनहि गोष्टी बरोबर आजच्या कल्पनेप्रमाणे माहीत होत्या चद्राला मूळचा उजेड नाही असेहि त्यानी सागितले आहे हे आर्यभट्टाचे ज्ञान ख्रिस्तपूर्व पाचव्या शतकातले आहे, हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे आर्यभट्टाचे ज्ञान अरबानी मोठ्या स्तवनपूर्व घेतले आहे अरब म्हटला म्हणजे आपल्या डोळ्यापुढे मुसलमान अरब येतो पण हे अरब ते नव्हत म्हणजे महमदी तत्त्वज्ञानाने प्रेरित झालेले असे नव्हत आर्यभट्ट याची रूपातरे त्यानी अर्जबहाट, अर्दबेरिअस् अशी केली आहेत जसे आर्यवैद्यकाचे तसेच आर्यज्योतिषाचेहि ज्ञान त्यानी बगदादद्वारा मिळविले बाराव्या शतकात झालेल्या भास्कराचार्याला पुढें कित्येक शतकानी न्यूटननें शोधून काढलेला गुरुत्वाकर्षणाचा नियमहि माहीत होता. पृथ्वीची दैनंदिन गति, ग्रहणाची उपपत्ति व गुरुत्वाकर्षणाचा नियम हे त्यांना माहीत झाले होते त्याचे ज्योतिष व गणित या विषयाचे ज्ञान फार मोठे असले पाहिजे, हे उघड आहे अशा प्रकारची मोठमोठाली तत्त्वे माहीत असलेल्या लोकात या ज्ञानाचा प्रसार का झाला नाही व शास्त्रविशारदातहि याच्या पुढची पुढची ज्ञाने का उत्पन्न झाली नाहीत याचा विचार अन्यत्र आलेला आहे पण वरील सर्व लिहिण्यावरून हे ध्यानात येईल की, आर्य लोकानी निरनिराळ्या शास्त्रात मोठीच प्रगति केलेली होती.

* * *

## शिल्पशास्त्र

शिल्प हा शब्द मनाला समाधान देणारा जिन्नस अशा अर्थाचा आहे भृगूनी आपल्या सहितेत शिल्पाची व्याख्या –नानाविधाना वस्तूना यत्राणा कल्पसपदाम् । धातूना साधनाना च वास्तूना शिल्पसज्ञितम् ॥–अशी केली आहे शिल्पग्रथ हिदुस्थानात ख्रिस्तपूर्व पाच सहा हजार वर्षे तरी झाले असावे भृगु, अत्रि, वसिष्ठ, विश्वकर्मा, मय, नारद, अग्नजित्, विशालाक्ष, पुरदर, ब्रह्मा, कुमार, नदीश, शौनक, गर्ग, वासुदेव, अनिरुद्ध, शुक्र व बृहस्पति असे अठरा शिल्पसहिताकार अगर Schools of Engineering असल्याचे मत्स्यपुराण सागते यापैकी कश्यप, भृगु, मय व विश्वकर्मा अशा चार सहिता पाहण्यात आहेत पेशवाई–अखेरपर्यंत या सहिताचा अभ्यास करणारे व उपयोग करणारे कारागीर होते नारो शकरानी नाशकास बाधलेले महादेवाचे देऊळ कश्यप सहितेप्रमाणे आहे. चद्रचूड यानी बाधलेले, सुदरनारायणाचे देऊळ भृगु सहितेप्रमाणे आहे, व ओढेकर यानी बाधलेले काळ्या रामाचे देऊळ मयसहितेप्रमाणे आहे शिल्पसहितेत येणाऱ्या विद्या अनत आहेत व कलाहि अनत आहेत पण मुख्य विद्या बत्तीस असून कला चौसष्ट आहेत. कृषिशास्त्रात वृक्षविद्या, पशुविद्या, व मनुष्यविद्या, जलशास्त्रात ससेचनविद्या, सहर्णविद्या व स्तभनविद्या, खनिशास्त्रात दृतिविद्या, भस्मी-

करणविद्या, सकरविद्या व पृथक्करणविद्या; नौकाशास्त्रात तरीविद्या नौविद्या व नवकाविद्या; रथशास्त्रात अश्वविद्या, पथविद्या, घटापथ-विद्या व सेतुविद्या, अग्नियानशास्त्रात शकुंतविद्या, विमानविद्या; वेश्मशास्त्रात वासोविद्या, कुट्टी-विद्या, व प्रासादविद्या, प्राकारशास्त्रात दुर्गविद्या, कूटविद्या, आकरविद्या, व युद्धविद्या, नगर-रचनाशास्त्रात आपणविद्या, राजगृहविद्या, सर्व-जनवासविद्या, वनोपवनविद्या, देवालयविद्या, या निरनिराळ्या विषयावर हरतऱ्हेचे ग्रंथ पूर्वी झाले होते उदाहरणार्थ विमानशास्त्रावर अग्नि-यान, विमान चद्रिका, व्योमयानतत्र, यत्रकल्प, यानबिंदु, खेटयानप्रदीपिकम्, व्योमयानार्कप्रकाश, वैमानिकप्रकरण हे ग्रथ झालेले आहेत यत्र-शास्त्रावर यत्रार्णव, यत्र चितामणी, यत्रसर्वस्व, यत्राधिकार, सूर्यसिद्धात, सिद्धातशिरोमणि हे ग्रंथ झाले आहेत खनिशास्त्रावर रत्नपरीक्षा, लोहार्णव, धातुकल्प, लोहप्रदीप, महावज्र, भैरवतत्र, पाषाणविचार हे ग्रथ झाले आहेत कामशास्त्रावर नदीश, कामन्दकी, वात्स्यायन, औद्दालिकी हे ग्रथ झाले आहेत असे अनेक शास्त्रावर ग्रथ असून पुष्कळ फाटके तुटके ग्रथ पिढीजाद कारागिराकडे सापडतात बडोदे येथील सस्कृत ग्रथालय, म्हैसूर येथील सस्कृत लायब्ररी, पुणें येथील भाडारकर सशोधन मदिर, तजावर येथील सरस्वती–मदिर–लायब्ररी, पुणे येथील विश्व–ब्रम्हवृत्त-पुस्तक सग्रह, त्रिवेद्रम् येथील प्राच्य सस्कृत लायब्ररी, पडित विजयराघव, रावसाहेब वझे याच्यासारखे शोधक याचेकडील पुस्तकसग्रह हे सर्व जर लक्षात घेतले तर सुमारे २०० ग्रंथ, शिल्पात मोडणाऱ्या निरनिराळ्या विद्यावर लिहिलेले आहेत असे दिसते वास्तविक पाहतां याच पुस्तकातील सर्व मजकुराचे सशो-धन व्हावयास हवे रावसाहेब वझे यानी लिहि-लेल्या हिंदी शिल्पशास्त्र या ग्रथातील वरील माहिती पाहून या शिल्पविद्येच्या सशास्त्रते-विषयी अगदीच शंका उरत नाही; यांत दिलेल्या विद्येचा उपयोग कसबी लोक परपरेने करीत राहिलेले असले पाहिजेत असे दिसतें. अशा सारखें काही मोठें शास्त्र मागें असल्याशिवाय हिंदु लोकानी जी प्रचंड बांधकामें केलेली आहेत ती करता आली असती असे वाटत नाही. शिष्यानें शिष्य बनवीत जाणें असे होत गेले असेल, पण त्यातल्या त्यांत जे कोणी खोलांत पाहाणारे अस-तील त्याना दिसून येत असेल की, आपली ज्ञाने केवळ आडाख्याची नसून काही शास्त्रीय विचारां-वर ती आधारलेली असावी, असो.

### हें शास्त्रच असलें पाहिजे

शिल्पशास्त्राविषयी पाहता हिंदु लोकाच्या प्रगतीने मन केवळ थक्क होऊन जाते. मोठ-मोठाली गोपुरे, देवळे, डोगरातील भयारे, कैलासासारखी अवाढव्य लेणी ही पाहिली म्हणजे शिल्पशास्त्रासबधाने या लोकानी काही नियम खास बसविले असावे असे वाटते केवळ अनमान-धबक्याने हे सर्व करता आले असेल असे वाटत नाही काही एक प्रकारची योजना मनाशी करणे व ठरलेल्या नकाशाबरहुकूम ती वठविणे या कामाला काही पद्धत असली पाहिजे एकाद्या माणसाला आडाख्याने साधले होते हे म्हणणे शोभून दिसेल पण हजारो शिल्पी लोकाना निरनिराळ्या काळी व निरनिराळ्या स्थळी असे आडाखे सहज सुचले असतील असे मानणे हे चूक आहे ही कामे निरनिराळ्या शतकात झाली आहेत त्यात शिल्पाचे निरनिराळे नमने आहेत, व ज्या पाषाणाचे हे सर्व प्रकार करावयाचे ते सर्व निरनिराळ्या जातीचे आहेत बाहेरचा एकही दगड आत न आणताना आपले चार चार, पाच पाच मजले भरतील एवढ्या खोलीपर्यंत खाली काळ्या भिन्न पाषाणात दगडफोड करीत जाव-याचे व त्यात मुख्य मदिर, त्यातील गाभारे, सभामडप, नदी, पिडी, खाब त्यावरील चित्रें, तीनही दिशाचे दरवाजे, वरचे उच छत, देवळा-च्या बाहेरील प्राकार, त्यात उभे असलेले भर आकाराचे हत्ती, गणपती, भोवताली ओवऱ्या, धर्मशाळेसारखे मोठमोठाले सोपे, पाणी वाहून नेण्यासाठी केलेले नाले, देवळापुढील विस्तृत अगण हे सर्व प्रकार एका विस्तृत पाषाणांतून

केवळ खोदून काढलेले पाहून मनुष्य खरोखर स्तंभित होऊन जातो. त्याला आश्चर्य वाटावयाचे सुद्धां बंद होते. विशेष हे की, देवळाच्या खांबांवर किंवा ओवऱ्यांत परस्परांना जाब देणारे असे खाब, व अशी चित्रे किती तरी आहेत यांत कसलीही चक होऊ न देतां त्या कुशल पाथरवटानी हे काम केले आहे ज्या मूळ कल्पकाने हे भव्य काम प्रथम मनात आणिले असेल व त्याचे चित्र मनापुढे उभें केले असेल त्याच्या मनाचा समावेश फारच मोठा असला पाहिजे ही कल्पना त्याने नकाशाच्या रूपाने कागदावर उतरली असली तर तेव्हा चित्रकला ही फारच उच्च कोटीला गेली होती असे म्हणावयास हरकत नाही त्याने नकाशा न काढताना आपले हे सर्व मनोगत दुसऱ्या कारागिरास शब्दानीच कळविले असेल तर तेव्हाची भाषा हरतऱ्हेच्या शिल्पशास्त्रीय शब्दानी व वाक्याच्या मोडणीनी फारच समृद्ध असली पाहिजे. मऊ दगडावर मनोगत उठविणे हे कदाचित् सोपे असेल पण निरनिराळे विकार फत्तराच्या काळ्या मूर्तींच्या तोंडावर उमटविणे हे फार कठीण काम आहे पण आमच्या शिल्प्यानी हे साध्य केलेले आहे ज्या हत्यारानी त्यानी ही बारीकसारीक कामे केली ती किती नाजूक असली पाहिजेत ? आणि अशा तऱ्हेची कामे दीड दीड दोन दोन हजार वर्षांपूर्वी सर्व हिंदुस्थानभर झालेली आहेत कोठे कोठे अशा या इमारतीतून लोखडी तुळया घातलेल्या आहेत, व मोठाले लोखडी दरवाजे बसविलेले आहेत ते पाहिले म्हणजे लोखडी कामाचे त्यांचे कसबही उत्तम ध्यानात भरते गझनीच्या महमदाने देवळे फोडण्याचा सपाटा चालू केला, तेव्हा देवळें सहज फुटत नाहीत हे पाहून तो म्हणाला 'अरे शिपाई लोकहो, आपला धर्म मोठा कणखर असेल; पण या हिंदु लोकांची देवळेही काही कमी कणखर नाहीत ' वेरूळची लेणी, बल्लारीची देवळें, रामेश्वराचे देऊळ, मावलीपुरमूची मंदिरे, कांबोज व जावा इकडील इमारती, जावा बेटांतील प्रज्ञापरमिता महिषासुरमर्दिनी दुर्गेची मूर्ति, ओरिसांतील कनारक देवळापुढे असलेला दगडी घोडेस्वार, राजपुतान्यांतील वरळीचें देऊळ, पन्नास पन्नास टन वजनाचे दगडी खांब हे प्रकार पाहून युरोपातील मोठमोठाल्या शिल्पज्ञांना विस्मय वाटू लागतो की, हे सर्व कसे झालें? थॉर्टन, हॅवेल, ग्रिफिथस् हीरेन, डाल्बर्क, मॅनिंग्ज्, स्मिथ, वॉलहाऊस, टॉड, कोलमन्, अशासारख्या विद्वानांनीं, अमलदारानी, आणि कसबी लोकानी आपल्या शिल्पाची मनापासून स्तुति केली आहे. व कलेचा जो काही परमोच्च उत्कर्ष होणे शक्य आहे तो येथें झाला होता, असे त्याचे मत आहे आपण पुष्कळदा असे म्हणतो की, मुसलमानानी हिंदुस्थानात शिल्पकला आणिली. आपण असे म्हणतो याचे कारण असे आहे की, आपणास तसे म्हणावयास शिकविले आहे. मुसलमानानी आम्हांस शिल्प शिकविले ही केवळ थाप आहे. मुसलमानाचा पायही या देशास लागला नव्हता, फार काय सागावे, महमदाचा जन्मही ज्या वेळी झाला नव्हता, त्यावेळी झालेले हजारो शिल्पाचे नमुने आज हिंदुस्थानात उभे आहेत मुसलमानानी आम्हाला शिल्प शिकविले हे खरे नाही. उलट आम्हीच त्यांना शिकविले हे मात्र खरे आहे तैमूरलगाने येथील शिल्पाचे वैभव पाहून स्वारीवरून परत जाताना बरोबर शेकडो कसबी शिल्पी समरकद येथें नेले; आणि इतिहासावरून असे दिसते की, जेव्हां शहाजहान याने ताजमहाल बाधावयाचे काम काढले, तेव्हा परागदा झालेल्या या कसबी लोकाच्या समरकद येथील वंशजाना त्याने हिंदुस्थानात परत आणिले. पण हा इतिहास आमच्या शालोपयोगी इतिहासात येत नाही !

* * *

## स्फुट वेंचे

अनुयायी मिळविण्यासाठी लोकांचे मनोधारण कसे करावे व त्यांची चित्तें कशी हस्तगत करावी हे लोकसेवेसाठी भ्रमती करणाऱ्याला रामदास समजावून सागतात —

उदडाचे उदड ऐकावें । परी ते प्रत्ययें पहावें । खरेंखोटें निवडावें अंतर्यामी ॥ ११ ॥ कोणासी

नव्हे म्हणो नये । समजावे अपायें उपायें । प्रत्ययें घ्यावा बहुतकार्यं । बोलोनियां ॥ १२ ॥ माणुस हेकाड आणि कच्चे । मान्य करावे तयाचे । येणे प्रकारें बहुताचे । अतर राखावे ॥ १३ ॥ अतरी पीळ पेच वळसा । तोचि वाढवी बहुवसा । तरी मग शहाणा कैसा । निवऊ नेणे ॥ १४ ॥ वेडें करावे शहाणें । तरीच जिणें श्लाघ्यवाणे। उगाच वादाग वाढवणें । हे मूर्खपण ॥ १५ ॥ मिळोन जाऊन मेळवावे । पडी घेऊन उलथावे । काहीच कळो नेदावे । विवेक बळे ॥१६ ॥ दुसऱ्याचे चालणी चालावे । दुसऱ्याचे बोलणी बोलावे । दुसऱ्याचे मनोगते जावे । मिळोनिया ॥ १७ ॥ जो दुसऱ्याच्या हितावरी । तो विपट काहीच नोकरी। मानत मानत विवरी । अतर तयाचे॥ १८॥ आधी अतर हाती घ्यावे । मग हळुहळु उकलावे । नाना उपायें न्यावे । परलोकासी ॥ १९ ॥ हेकाडास हेकाड मिळला । तेथे गलबलाचि जाला । कळहो उठता चातुर्याला । ठाव कैचा ॥ २० ॥ उगीच करिती बडबड । परी करून दाखविणे हे अवघड । परस्थळ साधणे जड । कठिण आहे ॥२१॥ धके चपेटे सोसावे । नीच शब्द साहात जावे । प्रस्तावोन परावे । आपले होती ॥ २२ ॥ प्रसग जाणोनि बोलावे । जाणपण काहीच न घ्यावे लीनता धरून जावे । जेथे तेथे ॥ २३ ॥ कुग्रामे अथवा नगरे । पाहावी घराचि घरे । भिक्षा मिसे लहान थोरे । परीक्षून सोडावी ॥ २४ ॥ बहुती काहीतरी सापडे । विचक्षण लोकी मित्री घडे । उगेच बैसता कांहीच न घडे । फिर्णे विवरणे ॥२५॥

—दासबोध दशक १५ समास ६ ओव्या ११–२५

* * *

सभेचा फड ज्याना जिकावयाचा आहे व गूढ पुढारीपण करावयाचे आहे त्यानी रामदासाचे पुढील शब्द ध्यानात ठेवावे —

चौथा अत्यत साक्षप । फेडावे नाना आक्षप । अन्यायें थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे ॥५॥ जाणावे पराचे अतर । उदासीनता निरतर । नीतिन्यायासि अंतर । पडोच नेदावे ॥६॥ सकेते लोक वेधावा । येकून येक बोधावा । प्रपचहि सावरावा । येथान शक्त्या ॥ ७ ॥ प्रपंचसमयो वोळखावा । धीर बहुत असावा । संमध पडो नेदावा । अति परी तयाचा ॥ ८॥ उपाधीसी विस्तारावे । उपाधीत न सपडावे । नीचत्व पहिलेच घ्यावे । आणि मर्खपण ॥ ९॥ दोष देखोन झाकावे । अवगुण अखड न बोलावे । दुर्जन सापडोन सोडावे । परोपकार करुनी ॥ १० ॥ तऱ्हे भरोच नये । सुचावे नाना उपायें । नव्हे तेचि करावे कार्ये । दीर्घ प्रेत्ने ॥ ११ ॥ फड नासोचि नेदावा । पडिला प्रसग मावरावा । अतिवाद न करावा । कोणी येकासी ॥ १२ ॥ दुसऱ्याचे अभिष्ट जाणावे । बहुताचे बहुत सोसावे । न सोसे तरी जावे । दिगतराप्रती ॥ १३ ॥ दुख दुसऱ्याचे जाणावे । ऐकोन जरी वाटून घ्यावे । बरे वाईट सोसावे । समुदायाचे ॥ १४ ॥ अपार असावे पाठातर । सन्निधचि असावा विचार । सदा सर्वदा तत्पर । परोपकारासी ॥ १५ ॥ शाती करून करवावी । तऱ्हे साडून साडवावी । क्रिया करून करवावी । बहुताकरवी ॥ १६ ॥ करणे असेल अपायें । तरी बोलोन दाखवू नयें । परस्परेचि प्रत्ययें । प्रचितीस आणावा ॥ १७ ॥ जो बहुताचे सोसीना । त्यास बहुत लोक मिळेना । बहुत सोसिता उरेना । महत्त्व आपुले ॥ १८ ॥ राजकारण बहुत करावे । परन्तु कळोच नेदावे । परपीडेवरी नसावे । अन्त करण ॥ १९ ॥ लोक पारखून साडावे । राजकारणे अभिमान झाडावे । पुन्हा मेळवून घ्यावे । दुरील दोरे ॥ २० ॥ हिरवटासी दुरी धरावे । कचरटासी न बोलावे। समध पडता सोडून द्यावे । येकीकडे ॥ २१ ॥

——दासबोध दशक ११, समास ५ ओ ५–२१

* * *

प्रतिपादकाने दुसरे प्रतिपादक कसे बनवावे, उपाधीत न सापडता उपाधीस कसे कटाळू नये व कीर्तीच्या लालसा न धरता कसे काम करावे हे रामदासस्वामी समजवून देतात —

जितुके काही आपणासि ठावे । तितुके हळुहळू सिकवावे । शहाणे करून सोडासे :बहुत जन ।६४। परोपरी शिकविणे । आडणुका सांगत जाणें ।

विरळ करून सोडणें । निस्पृहासी ॥ १५ ॥ होईल ते आपण करावे । न होता जनाकरवी करवावे । भगवदभजन राहावे । हा धर्म नव्हे ॥ १६ ॥ आपण करावे करवावे । आपण विवरावे विवरवावे आपण धरावे धरवावे । भजन मार्गासी ॥ १७ ॥ जुन्या लोकाचा कटाळा आला । तरी नूतन प्रात पाहिजे धरला । जितुके होईल तितुकयाला । आळस करू नये ॥ १८ ॥ देहयाचा अभ्यास बुडाला । म्हणिजे महत बुडाला । लागवगे नूतन लोकाला । शाहाणे करावे ॥ १५ ॥ उपाधीत सापडो नये । उपाधीस कटाळो नये । निसुगपण कामा नये । कोणी येकविषयी ॥ २० ॥ काय नासणार नासते । आपण वेडे उगेच पाहाते । आळसी हृदयसून्य ते । काये करू जाणे ॥ २१ ॥ धकाधकीचा मामला । कैसा घडे अशक्ताला । नाना बुद्धि शक्ताला । म्हणोनि सिकवाव्या ॥२२॥ व्याप होईल तो राहावे । व्याप राहता उठोन जावे। आनदरूप फिरावे । कोठेतऱ्ही ॥ २३ ॥ उपाधीपासून सुटला । तो निस्पृहपणे बळावला । जिकडे अनुकूल तिकडे चालिला । सावकास ॥२४॥ कीर्ति पाहता सुख नाही । सुख पाहता कीर्ति नाही। केल्याविण काहीच नाही । कोठे तऱ्ही ॥ २५ ॥ येरवी काय राहाते । होणार तितुके होऊन जाते। प्राणी मात्र अशक्त ते । पुढे आहे ॥ २६ ॥ आधीच तकवा सोडिला । मधेचि धीवसा साडिला । तरी ससार हा सेवटाला । कैसा पावे ॥ २७ ॥ ससार मुळीच नासका । विवेक करावा नेटका । नेटका करिता फिका । होत जातो ॥ २८ ॥

—दासबोध दशक १९, समास १०–१४ ते २८

* * *

ग्रामण्याच्या चळवळी करणाऱ्या ब्राह्मणानी कसे नुकमान केले हे रामदास अत्यन्त दुखाने सागतात —

ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले। गुरुत्व साडून जाले । शिष्य शिष्याचे ॥३१ कित्येक दावलमलकास जाती । कित्येक पीरास भजती। कित्येक तुरुक होती। आपले इच्छेने ॥३२॥ ऐसा कलियुगीचा आचार। कोठे राहिला विचार। पुढे पुढे वर्णसकर । होणार आहे ॥ ३३ ॥ गुरुत्व आलें नीच याती । कांहीं येक वाढली महंती । शूद्र आचार बुडविती । ब्राह्मणाचा ॥ ३४ ॥ हे ब्राह्मणास कळेना । त्याची वृत्तीच वळेना । मिथ्या अभिमान गळेना। मूर्खपणाचा ॥ ३५ ॥ राज्य नेले म्लेच्छ क्षेत्री। गुरुत्व नेले कुपात्री । आपण आरत्री ना परत्री । काहीच नाही ॥ ३६ ॥ ब्राह्मणास ग्रामणीने बुडविले । विष्णूने श्रीवत्स मिरविले । त्याच विष्णूने श्रापिले । फरशरामे ॥ ३७ ॥ आम्हीहि तेचि ब्राह्मण । दुखे बोलिले हे वचन । वडिल गेले ग्रामणी करुन । आम्हा भोवते ॥ ३८ ॥ आताचे ब्राह्मणी काय केले । अन्न मिळेना ऐसे जाले । तुम्हा बहुताचे प्रचितीस आले । किवा नाही ॥ ३९ ॥ बरे वडिलास काय म्हणावे । ब्राह्मणाचे अदृष्ट जाणावे। प्रसगे बोलिले स्वभावे । क्षमा केले पाहिजे ॥ ४० ॥

—दासबोध दशक १४, समास ७ ओ ३१–४०

* * *

मताचा व कल्पनाचा गलबला कसा माजतो हे रामदास सागतात —

नाना मत्ते निर्माण जाली । नाना पाषाडे वाढली। नाना प्रकारची उठली। नाना बडे ॥१६॥ जैसा प्रवाह पडिला । तैसाच लोक चालिला । कोण वारील कोणाला । येक नाही ॥ १७ ॥ पृथ्वीचा जाला गळाठा । येकाहून एक मोठा । कोण खरा कोण खोटा । कोण जाणे ॥ १८ ॥ आचार बहुकचित पडला । कित्येक पोटासाठी बुडाला । अवघा वरपगचि जाला । साभिमाने ॥ १९ ॥ देव जाले उदड । देवाचे माडले भड । भतादेवाचे थोताण्ड । येकचि जाले ॥ २० ॥ मुख्य देव तो कळेना । काशास काहीच मिळेना । येकास येक वळेना । अनावर ॥२१॥ ऐसा नासला विचार । कोण पाहातो सारासार । कैचा लाहान कैचा थोर । कळेचिना ॥ २२ ॥ शास्त्राचा बाजार भरला । देवाचा गलबला जाला । लोक कामनेच्या व्रताला । झोबोन पडती ॥ २३ ॥ ऐसे अवघे नासले । सत्यासत्य हरपले । अवघे अनायेक जाले । चहूकडे ॥ २४ ॥

दासबोध दशक ११, समास २–ओ. १६–२४

"घटासी आणावा घट" ही चळवळीतील धोरणाची रामदासी घोषणा महाराष्ट्रीय मनाच्या ठेवणीची उत्तम निदर्शक आहे :—

'चोर भांडारी करावा । घसरतांच सांभाळावा । गोवा मूर्खपणाचा काढावा । हळुहळु ॥९॥ या अवघ्या पहिल्याच गोष्टी । प्राणी कोणी नव्हता कष्टी । राजकारणें मंडळ वेष्टी । चहुंकडे ॥ १० ॥ नष्टासी नष्ट योजावे । वाचाळासी वाचाळ आणावे । आपणावरी विकल्पाचे गोवे । पडोंच नेदी ॥ ११ ॥ कांटीने काटी झाडावी । झाडावी परी ते कळो नेदावी । कळकटेपणाची पदवी । असो द्यावी ॥ १२ ॥ न कळतां करी कार्य जें तें । ते काम तत्काळचि होते । गचगचेत पडता तें । चमत्कारे नव्हे ॥ १३ ॥ ऐकोनी आवडी लागावी । देखोनी बळकटचि व्हावी । सलगीने आपली पदवी । सेवकामध्ये ॥ १४ ॥ कोणी येक काम करितां होते । न करिता ते मागे पडते । या कारणें ढिलेपण ते । असोचि नये ॥ १५ ॥ जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ॥ जो आपणचि कष्टत गेला । तोचि भला ॥ १६॥ अवघ्यास अवघे कळले । तेव्हां ते रिते पडिले । याकारणे ऐसे घडलें । न पाहिजे की ॥ १७ ॥ मुख्य सूत्र हाती घ्यावे । करणे ते लोकाकरवी करवावे । कित्येक खलक उगवावे । राजकारणामधे ॥ १८ ॥ बोलके पहिलवान कळकटे । तयासीच घ्यावे झटे । दुर्जनें राजकारण दाटे । ऐसें न करावें ॥ १९ ॥ ग्रामण्य वर्मी सांपडावे । रगडून पीठचि करावे । करुनि मागुती सावरावें । बुडऊ नये ॥ २० ॥ खळ दुर्जनासी भ्याले । राजकारण नाही राखलें । तेणें अवघें प्रगट जाले । बरें वाईट ॥ २१ ॥ समुदाव पाहिजे मोठा । तरी तनावा असाव्या बळकटा । मठ करुनी ताठा । धरु नये ॥ २२ ॥ दुर्जन प्राणी समजावे । परी ते प्रगट न करावे । सज्जनापरीस आळवावे । महत्त्व देउनी ॥ २३ ॥ जनामधे दुर्जन प्रगट । तरी मग अखंड खटखट । या कारणें ते वाट । बुझोनि टाकावी ॥ २४ ॥ गनीमाच्या देखता फौजा । रणशूराच्या फुर्फुरती भुजा । ऐसा पाहिजे की राजा । कैपक्षी परमार्थी ॥२५॥ तयास देखता दुर्जन धाके । बैसवी प्रचीतीचे तडाखे । बड पाषाडाचे वाखे । सहजचि होती ॥ २६ ॥ हे धूर्तपणाची कामे । राजकारण करावे नेमे । ढिलेपणाच्या सभ्रमे । जाऊ नये ॥ २७ ॥ कोठेच पडेना दृष्टी । ठाई ठाई त्याच्या गोष्टी वाग्विळासे सकळ सृष्टि । वेधिली तेणे ॥ २८ ॥ हुब्यासी हुबा लावून द्यावा । टोणप्यास टोणपा आणावा । लौंदास पुढे उभा करावा । दुसरा लौंद ॥ २९ ॥ घटासी आणावा घट । उत्धटासी पाहिजे उद्धट । खटनटासी ख टनट । अगत्य करी ॥ ३०॥ जैशास तैसा जेव्हा भेटे । तेव्हा मज्यालसी थाटे । इतुके होते परी धनी कोठे । दृष्टीस न पडे ॥ ३१ ॥

—दासबोध दशक १९ समास ९ ओ ९–३१

# हिंदु महासभेच्या कार्यकर्त्यांची यादी

## (सन १९२३ ते १९३५)

[ हिंदु महासभेच्या कार्यकर्त्यांत फक्त ब्राह्मणच आहेत असा काहीं लोक आक्षेप घेतात त्यानी ही यादी पहावी म्हणजे त्याचें उत्तर सांपडेल ]

### १९२३ व १९२४

| | नाव | प्रात | पोटजात |
|---|---|---|---|
| अध्यक्ष | पडित मदन मोहन मालवीय | स प्रात | ब्राह्मण |
| चिटणीस | पडित देवरतनजी शर्मा | पजाब | ,, |
| | प्रोफेसर गगाराम | ,, | ,, |
| | पडित दिनदयाळू शर्मा | ,, | ,, |
| उपाध्यक्ष | स्वामी शारधानदजी | ,, | क्षत्रिय |
| | लाला लजपतरायजी | ,, | बनिया |

### १९२५

| | | | |
|---|---|---|---|
| अध्यक्ष | लाला लजपतरायजी | पजाब | बनिया |
| उपाध्यक्ष | प मदन मोहन मालवीय | स प्रांत | ब्राह्मण |
| | प दीनदयाळू शर्मा | पंजाब | ,, |
| | ऑनरेबल राजा सर रामपाल सिंग, के सी आय ई | स. प्रात | क्षत्रिय |
| | स्वामी शारधानन्दजी | पजाब | ,, |
| चिटणीस | प. देवरतन शर्मा | पजाब | ब्राह्मण |
| | बाबू जगत्नारायणलाल | बिहार | कायस्थ |
| | श्री. जयरामदास दौलतराम | सिंध | ब्राह्मणेतर |
| | पं नेकीराम शर्मा | पजाब | ब्राह्मण |
| खजिनदार | शेठ लक्ष्मीनारायण गडोडिया | मारवाड | मारवाडी बनिया |

### १९२६

| | | | |
|---|---|---|---|
| अध्यक्ष | राजा नरेंद्रनाथ | पंजाब | ब्राह्मण (काश्मिरी) |
| उपाध्यक्ष | प. मदन मोहन मालवीय | सं. प्रांत | ब्राह्मण |
| | लाला लजपतरायजी | पंजाब | बनिया |
| | श्री. ऑनरेबल राजा सर रामपालसिंग | सं. प्रात | क्षत्रिय |
| | स्वामी शारधानन्दजी | पंजाब | ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| चिटणीस | श्री जयरामदास दौलतराम | सिंध | ब्राह्मणेतर |
| | बाबू जगत्नारायणलाल | बिहार | कायस्थ |
| | पं. नेकीराम शर्मा | पजाब | ब्राह्मण |
| | प. देवदत्तराम शर्मा | ,, | ,, |
| खजिनदार | शेठ लक्ष्मीनारायण गडोडिया | मारवाड | मारवाडी बनिया |

१९२७

| | | | |
|---|---|---|---|
| अध्यक्ष | डॉ बा शि मुजे | म. प्रात | महाराष्ट्रीय ब्राह्मण |
| उपाध्यक्ष | प एम् एम् मालवीयजी | स प्रात | ब्राह्मण |
| | लालालजपतरायजी | पजाब | बनिया |
| | डी डी राजा नरेन्द्रनाथ | ,, | ब्राह्मण (काश्मिरी) |
| | ऑनरेबरल राजा सर रामपाल सिग | स प्रात | क्षत्रिय |
| चिटणीस | प देवदत्तराम शर्मा | पजाब | ब्राह्मण |
| | प नेकीराम शर्मा | ,, | ,, |
| | एल् रामप्रसाद बी ए | ,, | रजपूत ठाकूर |
| | बी पद्मराज जैन | कलकत्ता | मारवाडी |
| खजिनदार | एल्. दिवाणचद | पजाब | क्षत्री |

१९२८

| | | | |
|---|---|---|---|
| अध्यक्ष | श्री. न. चि. केळकर | महाराष्ट्र | महाराष्ट्रीय ब्राह्मण |
| कार्याध्यक्ष | डॉ. बा. शि. मुजे | म प्रात | ,, |
| उपाध्यक्ष | प. एम् एम्. मालवीयजी | स प्रात | ब्राह्मण |
| | एल् लजपतरायजी | पजाब | बनिया |
| | राजा सर रामपालसिग | स प्रात | रजपूत ठाकूर |
| | प. नेकीराम शर्मा | पजाब | ब्राह्मण |
| खजिनदार | एल्. दिवाणचद | पजाब | क्षत्री. |

१९२९

| | | | |
|---|---|---|---|
| अध्यक्ष | श्री. रामानन्द चतर्जी | बगाल | ब्राह्मण |
| कार्याध्यक्ष | डॉ बा शि मुजे | म प्रात | महाराष्ट्रीय ब्राह्मण |
| उपाध्यक्ष | श्री न. चि. केळकर | महाराष्ट्र | ,, |
| | प. एम्. एम्. मालवीय | स. प्रात | ब्राह्मण |
| चिटणीस | पं. देवदत्त शर्मा | पजाब | ,, |
| | बी. पद्मराज जैन | कलकत्ता | मारवाडी |
| खजिनदार | शेठ जुगलकिशोर बिर्ला | जयपूर सस्थान | मारवाडी |

१९३०

| | | | |
|---|---|---|---|
| अध्यक्ष | श्री. सी विजयराघवाचार्य | मद्रास | ब्राह्मण |
| कार्याध्यक्ष | डॉ बा शि मुजे | म प्रात | महाराष्ट्रीय ब्राह्मण |
| उपाध्यक्ष | प एम् एम् मालवीयजी | स प्रात | ब्राह्मण |
| | श्री भाई परमानदजी | पजाब | ,, |
| | राजा नरेंद्रनाथ | ,, | काश्मिरी ब्राह्मण |
| | श्री रामप्रसाद चतर्जी | बगाल | ब्राह्मण |
| | श्री न चि केळकर | महाराष्ट्र | महा ब्राह्मण |
| चिटणीस | बी. जगत्नारायणलाल | बिहार | कायस्थ |
| | बी पद्मराजजैन | कलकत्ता | मारवाडी |
| | प गौरीशकर मिश्र | स प्रात | ब्राह्मण |
| | एल् गणपतराय | वा स प्रात | अडोरा |
| खजिनदार | एल् नारायणदत्त | पजाब | क्षत्री |

१९३२

| | | | |
|---|---|---|---|
| अध्यक्ष | श्री न चि केळकर | महाराष्ट्र | महा ब्राह्मण |
| कार्याध्यक्ष | डॉ बा शि मुजे | मध्य प्रात | ,, |
| उपाध्यक्ष | १९३१ सालाप्रमाणेच जास्त, एम् सी राजा | मद्रास | हरिजन |
| चिटणीस | १९३१ सालाप्रमाणेच | | |
| खजिनदार | ,, ,, | | |

१९३३

| | | | |
|---|---|---|---|
| अध्यक्ष | भाई परमानदजी | पजाब | ब्राह्मण |
| उपाध्यक्ष | १९३२ सालाप्रमाणेच पण मालवीयजी-जागी श्री राधा कुमुद मुकर्जी हे आले | बगाल | ,, |
| चिटणीस | १९३२ सालाप्रमाणेच | | |
| खजिनदार | ,, ,, | | |

१९३५

| | | | |
|---|---|---|---|
| अध्यक्ष | भिक्षू उत्तम | ब्रह्मदेश | बौद्ध |
| कार्याध्यक्ष | भाई परमानदजी | पजाब | ब्राह्मण |
| उपाध्यक्ष | प एम् एम् मालवीयजी | स प्रात | ,, |
| | श्री सी विजयराघवाचार्य | मद्रास | ,, |
| | डॉ बा शि मुजे | म प्रात | म ब्राह्मण |
| | राजा नरेंद्रनाथ | पजाब | काश्मिरी ब्राह्मण |
| | प्रो राधाकुमुद मुकर्जी | बगाल | ब्राह्मण |
| | कॅ. राजा दुर्गनारायणसिग ऑ. तिरवा | स. प्रात | |

| | | | |
|---|---|---|---|
| सर्वसाधारण चि. | श्री. पद्मराज जैन | कलकत्ता | मारवाडी |
| | श्री. आनंदप्रियजी | बडोदा | |
| | श्री. रा. गो. भिडे | महाराष्ट्र | म. ब्राह्मण |
| कचेरी चिटणीस | श्री. गणपतराय | वा. स. प्रांत | अडोरा |
| खजिनदार | एल् नारायणदत्त | पंजाब | क्षत्री |

## खास अधिवेशनें

(१९२५–२६ कॉंग्रेसच्या वेळी भरलेले, कलकत्ता).

अध्यक्ष जगद्गुरु शकराचार्य—करवीर पीठ

स्वागत समितीचे अध्यक्ष—सर पी. सी. रे कलकत्ता

(मद्रास कॉंग्रेसच्या वेळचे अधिवेशन)

| | | | |
|---|---|---|---|
| अध्यक्ष | सर शंकरन् नायर | मद्रास | ब्राह्मणेतर |

कार्यकारी मडळाचे प्रमुख सभासद (१९२६–२९ )

| | | | |
|---|---|---|---|
| (१९२६–२९) | श्री. मा. श्री. अणे | म. प्रात | महाराष्ट्रीय ब्रा |
| (१९२२) | बी राजेंद्रप्रसाद | बिहार | कायस्थ |
| | श्री. बिहारीलाल | डेहराडून (स. प्रात) | हरिजनाचे प्रतिनिधि |
| | श्री मु रा. जयकर | महाराष्ट्र | पाठारे प्रभू |

